# स्वातंत्र्य-दीप

अर्थात्

# जगांतील असहकारिता



रा. गो. भिडे.

पारतंत्र्यात्परं दुःखं न स्वातंत्र्यात्परं सुखम् ।

# स्वातंत्र्य-दीप.

अथवा

# जगांतील असहकारिता

रामकृष्ण गोपाळ भिडे

प्रस्तावना लेखक

श्रीयुत लक्ष्मण बळवंत भोपटकर,

एम्. ए., एल्.एल्. बी.

१९२४

किंमत १ रुपया।

मातृदेवतेच्या चरणीं अत्यंत

भक्तिपुरस्सर समर्पण.

# आत्मनिवेदन



राजकारणाचा रंग क्षणोक्षणीं इतक्या विलक्षण गतीनें पालटत आहे, कीं सामान्य मनुष्याची बुद्धि विचालितच व्हावी! अशा बिकट परिस्थितींतून योग्य मार्ग सांपडावा या हेतूनें हा 'स्वातंत्र्य-दीप' वाचकांपुढें ठेविला आहे. स्वातंत्र्य-दीपांत आलेल्या इतिहासापैकीं कांहीं भाग प्रस्तुत लेखकानेंच इतरत्र प्रसिद्ध केला होता. परंतु स्वातंत्र्य-दीपाच्या नववेषांत तो पुढें आणण्याचें ठरल्यावर मूळांत कांहीं भर घालून तो आजच्या स्वरूपांत वाचकांपुढें ठेवीत आहे. देशभक्त आण्णासाहेब भोपटकर हे अत्यंत कार्यमग्न असताहि त्यांनीं वेळांतवेळ काढून सुंदर व मार्मिक प्रस्तावना लिहून दिली याबद्दल लेखक त्यांचा अत्यंत ऋणी आहे. त्याप्रमाणें विजय छापखान्याचे मालक श्रीयुत आप्पासाहेब गोखले यांनीं पुस्तकाच्या छपाईचें काम सुबक करून दिलें याबद्दल त्यांचाहि मी फार आभारी आहें.

पुणें,
५ जानेवारी १९२४

रामकृष्ण गोपाळ भिडे.

# थोडक्यांत सार.

माझे मित्र दे० रामकृष्ण गोपाळ ऊर्फ बाबुराव भिडे यांनीं हें पुस्तक लिहून मराठी वाङ्मयांत एका उत्तम ग्रंथाची भर टाकलेली आहे, यांत संशय नाहीं. राजकारणाच्या क्षेत्रांतील घडामोडींचें अध्ययन करणाऱ्या लोकांच्या विचारसरणीस दररोज नवीन नवीन धक्के बसून ती विशिष्ट ध्येयापासून अगर तें संपादन करण्याच्या सर्वमान्य मार्गापासून पराङ्मुख होते कीं काय, अशा भीतीच्या व अनात्मविश्वासाच्या काळांत ती विचारसरणी दृढ व स्थिर होण्याच्या दृष्टीनें या पुस्तकाची फारच मदत होईल, अशी मला खात्री वाटते.

दे० बाबुराव भिडे यांनीं आपल्या पुस्तकास "जगांतील असहकारिता" असें नांव देण्याऐवजीं जर दुसरें एखादें नांव दिलें असतें, तर माझ्या मतें बरें झालें असतें. स्वातंत्र्येच्छु राष्ट्रानें स्वातंत्र्यप्राप्तीच्या लालसेनें केलेले प्रयत्न—मग ते राज्यकर्त्यांच्या पायधरणीचे असोत वा पाय ओढणीचे असोत—हे एक प्रकारें असहकारितात्मकच असतात; असा सामान्य विचार केल्यास, "जगांतील असहकारिता" हें नांव देण्यांत दे० भिडे यांच्या हातून औचित्याचा भंग झालासें म्हणवणार नाहीं. परंतु गेल्या दोन तीन वर्षांत प्रतिपादिलीं गेलेलीं तत्त्वें हीच असहकारितेची चळवळ होय, अशा विशिष्ट अतएव कोत्या दृष्टीनें पाहिल्यास, या पुस्तकास "जगांतील असहकारिता" म्हणून संबोधणें अनन्वर्थक आहे, असेंच म्हणावें लागेल.

दे० भिडे यांनीं आपल्या पुस्तकांतील विषयांची निवड व रचनाही योग्य रीतीनें केलेली आहे. अमेरिका, हंगेरी, आयर्लंड, इजिप्त व कोरिया या पांच देशांतील चळवळींचा संकलितपणें इतिहास देऊन, व प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं त्यांची व येथील चळवळींची तुलना करून दोहोंमधील साम्य व वैषम्य त्यांनीं स्पष्टपणें नमूद केलें आहे. सहाव्या प्रकरणांत हिंदुस्थानांतील चळवळींचा थोडक्यांत इतिहास सांगून, त्या चळवळींनीं स्वातंत्र्याच्या मार्गांत कोठपर्यंत मजल गांठलेली आहे, व अद्याप त्यांना किती पल्ला गांठावयाचा शिल्लक राहिलेला आहे, याबद्दलचा आपला अंदाज दे० भिडे यांनीं वाचकास सादर केलेला आहे. 'पांचा-

मुखीं परमेश्वर' या न्यायानें, पांच राष्ट्रांतील राजकीय चळवळींचा इतिहास वाचकांपुढें मांडून, त्यांतील तत्त्वास व धोरणास अनुसरूनच हिंदुस्थानचा राजकीय इतिहास घडला जात आहे व घडला गेला पाहिजे, तरच हिंदी लोकांचे स्वातंत्र्याचे प्रयत्न फलद्रूप होतील, एरव्हीं होणार नाहींत, असा दे० भिडे यांचा उद्देश स्पष्टपणें दिसून येत आहे. त्यांनीं वरील पांच राष्ट्रांचा इतिहास आणखी जरा विस्तारानें दिला असता, तर दुधांत साखर पडल्याप्रमाणें हें पुस्तक जास्त मधुर व चविष्ट झालें असतें, असें मला वाटतें.

अमेरिकेसंबंधाच्या पहिल्या प्रकरणाच्या पहिल्या पानाच्या वाचनास प्रारंभ केला कीं किती तरी कल्पनांचें काहूर मनांत उसळलें जातें आणि पुस्तकाचीं पानें वाचीत वाचीत कोरियासंबंधाचा इतिहास वाचूं लागलों कीं उद्वेगाच्या भरांत " मनुष्य जात तेवढी सारी हराम " हे शब्द न कळत तोंडावाटे निघूं लागतात ! सर्व प्रकरणांमध्यें कोरियाबद्दलचें प्रकरण फारच सुरेख साधलेलें आहे. कोरियाची करुणकहाणी वाचूं लागल्यापासून तों ती संपेपर्यंत प्रत्येक सहृदय वाचकाच्या अश्रूंस खळ पडणार नाहीं, अशी माझी खात्री आहे.

कोणी कांहींही म्हणो, परंतु मनुष्यस्वभाव पूर्णपणें स्वार्थी असावा, असाच परमेश्वराचा संकेत दिसतो. या विश्वाचें आदितत्त्व मानवी स्वभावाचा स्वार्थीपणा व तज्जन्य सैतानीपणा होय, यांत तिळमात्र संशय नाहीं. पुराणांतरीं वर्णन केला गेलेला काल्पनिक सैतान कोठें नांदत असेल तो असो; पण प्रत्यक्ष व्यवहारांत प्रत्येक मानवी प्राणी हा मूर्तिमंत सैतानच होय, असें म्हटल्यास खास अत्युक्ति होणार नाहीं. हा सैतान कोठें आपल्या एकट्या कुटुंबाचेंच कल्याण करण्यासाठीं दुसऱ्या अनेक कुटुंबांची राखरांगोळी करण्यांत गढून गेलेला दृष्टीस पडेल; तर कोठें तो देशभक्तीचा बुरखा घेऊन आपल्या एकट्या देशाचें हित साधण्यासाठीं दुसऱ्या अनेक देशांच्या नरडीचे घोट घेत असतांना दृष्टोत्पत्तीस येईल. कोठें तो निरुपद्रवी लोकांच्या प्रेतांचे ढीग रचतांना आढळून येईल; तर कोठें तो मेलेल्या वीरांचे मुडदे उकरून त्यांची विचक्षणा करीत असतांना सांपडेल. कोठें तो निरपराध आयाबायांची अब्रू घेत असेल; तर कोठें तो कोंवळ्या अर्भकांवर गोळ्या झाडण्यांत गुंग झालेला असेल. कोठें तो आकाशांतून पृथ्वीवर बाँब गोळे टाकीत असेल; तर कोठें तो पृथ्वीवरील घरेंदारें त्याच बाँब गोळ्यांनीं वर आकाशांत उडवून देत असेल ! सारांश, असलीं एक ना दोन, इकडा

आसुरी व अमानुष कृत्यें करण्यांत मानवी स्वरूपरूपी सैतान चूर होऊन गेलेला आहे. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, एका विशिष्ट कौटुंबिक हितासाठीं वरीलप्रमाणें कृत्यें घडवून आणणारा हा सैतान निंदिला जाऊन, एका विशिष्ट प्रांतासाठीं अगर देशासाठीं तसलींच कृत्यें करणारा तोच सैतान वंदिला जाऊन त्याचा जयजयकार होत आहे! परमेश्वरी करणी म्हणतात ती हीच!

देशभक्तीच्या भावनेची छाननी केल्यास तिजमध्यें व्यापक प्रमाणावर कां असेना, परंतु स्वार्थ, संपूर्ण स्वार्थ, याशिवाय दुसरी कोणतीच भावना दृग्गोचर होत नाहीं. जोंपर्यंत देशभक्तांची दिशा, आपण सुखासमाधानानें नांदावयाचें व इतरांसही नांदूं द्यावयाचें, या प्रकारची असते, तोंपर्यंत ती स्वार्थी असली तरी आक्षेपार्ह नसते. परंतु जेव्हां या भावनेस, आपण सुखासमाधानानें नांदण्यासाठीं दुसऱ्यांच्या संसाराचें वाटोळें झालें तरी बेहत्तर आहे, असें स्वरूप प्राप्त होतें, तेव्हां ती भावना सर्वथैव त्याज्य ठरते व ठरली पाहिजे. या स्वरूपांमधील लढयाचा जो इतिहास तोच प्रस्तुत पुस्तकांत सारांशानें देण्यांत आलेला आहे.

मनुष्यप्राणी हा परमेश्वराचा अंश व त्याची प्रतिमा होय, आणि परमेश्वर हा स्वतंत्रच नव्हे तर मूर्तिमंत स्वातंत्र्य होय, हीं तत्त्वें जर यथार्थ असतील, तर मनुष्यस्वभावांतील प्रकट अगर प्रच्छन्न स्वातंत्र्येच्छा परमेश्वरप्रेरित होय, हेंही तत्त्व सत्य आहे, व याबद्दल कोणीही वास्तविकपणें कुरकूर करावयास नको. या तत्त्वांविरुद्ध वर्तन करणारा इसम केव्हांही परमेश्वरद्रोही असाच ठरला जाणार. आपण स्वतः मात्र स्वातंत्र्याचा यथेच्छ उपभोग घ्यावयाचा, परंतु दुसऱ्यानें मात्र त्याविषयीं इच्छा व्यक्त केली, कीं लगेच ती दडपून टाकण्याबद्दल अट्टाहास करावयाचा, हा शुद्ध विसंगतपणा होय. अमेरिकेचेंच उदाहरण घेतल्यास, ज्या प्रतिनिधित्वाच्या तत्त्वाबद्दल व इतर राजकीय हक्कांबद्दल इंग्लंडांतील लोकनायकांनीं त्या वेळच्या राज्यकर्त्यांस सळो कीं पळो करून सोडलें; एवढेंच नव्हे तर, आपल्या एका राजाची मुंडी मुरगळण्यासही कमी केलें नाहीं, त्यांनींच किंवा त्यांच्या राजकीय वंशजांनींच तेच हक्क अमेरिकन लोकांना देण्यास कांकूं करावी, किंबहुना ते मागणाऱ्यांच्या माना चिरण्यासही उद्युक्त व्हावें, हें नवल नव्हे काय? पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मगरमिठींत न पडण्यासाठीं ज्या जपाननें आपल्या सत्पुत्रांच्या रक्ताचे पूर वाहविले, त्यानेंच कोरियन देशभक्तांनीं आपला मायदेश

जपानच्या तावडींतून सोडविण्याच्या प्रयत्नास प्रारंभ केल्याबरोबर पिसाळून जाऊन कोरियावर न भूतो न भविष्यति असा कहर उसळून द्यावा, हें जितकें मानवी स्वभावांतील उपजत सैतानीपणाचें, तितकेंच परमेश्वराच्या अगाध व अतर्क्य लीलेचें खास लक्षण होय !

या जगांत स्वातंत्र्यहानीसारखी दुसरी कोणतीही हानी नाहीं. बाकीच्या आपत्ति कमजास्त प्रयत्नांनीं निवारतां येतात. परंतु स्वातंत्र्यनाशाचें संकट दूर करण्यासाठीं जित राष्ट्रांना दीर्घकालपर्यंत अत्यंत कसोशीचे व चिकाटीचे प्रयत्न करावे लागतात. मनुष्याच्या रक्ताचा एकच बिंदु जिभेस लागल्याबरोबर ज्याप्रमाणें एखाद्या हिंस्र पशूस त्याच्या रक्ताचें प्राशन करण्याची वांच्छा उत्पन्न होते, व ती त्या मनुष्याची नरडी फोडून तृप्त करण्यासाठीं तो त्याच्यावर झडप घालतो, त्याचप्रमाणें एखाद्या राष्ट्रास दुसऱ्या राष्ट्राचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याची एकदां कां चटक लागली कीं, तें राष्ट्र त्या दुसऱ्या राष्ट्रास पूर्णपणें परतंत्र बनविण्यासाठीं आटोकाट श्रम व साहस करण्यास चुकत नाहीं. आणि याचप्रमाणें एखाद्या परतंत्र राष्ट्राचे डोळे उघडले जाऊन त्यास एकदां कां स्वातंत्र्याची अपूर्व लज्जत व माधुरी कळूं लागली, कीं तें राष्ट्र पूर्ण स्वातंत्र्य कमाविण्यासाठीं असामान्य स्वार्थत्याग करण्यास व अनन्वित हालअपेष्टा सोसण्यासही तयार झाल्याशिवाय राहत नाहीं. या स्वार्थत्यागाचा व हालअपेष्टांचा जो इतिहास तोच स्वातंत्र्यप्राप्तीचा उज्ज्वल इतिहास होय ! अंतःकरणास रिझविणारीं व दुष्ट भावनांना विझविणारीं इतिहासांतील अत्यंत रम्य स्थळें याच स्वार्थत्यागांत व याच हालअपेष्टांत पदोपदीं दृग्गोचर होतात !

वैवाहिक बाबतींत इतर कितीही विधी उत्तम रीतीनें पार पडले, तरी सप्तपदी झाल्याविना विवाहग्रंथि कायम झाली असें ज्याप्रमाणें आपण समजत नाहीं, त्याचप्रमाणें परतंत्र राष्ट्रानें आपला व स्वतंत्रतेच्या ध्येयाचा एकजीव करून घेऊन स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गीतील सप्तपदी केल्याशिवाय स्वतंत्रतादेवी त्या राष्ट्रास कधींही कायमची माळ घालीत नाहीं. एखाद्या विशिष्ट राष्ट्राकडून या सप्तपदींतील एखादें पाऊल झपकन् पडलें जाईल, किंवा कदाचित् पडलें नाहीं असा आभासही होईल; परंतु सर्व पाउलें अत्यंत व्यक्त वा अव्यक्त रीतीनें पडल्याशिवाय मात्र कदापिही राहणार नाहींत. जगाच्या सुरवातीपासून आतांपर्यंत अनेक राष्ट्रांनीं अनेकदां आपलें स्वातंत्र्य गमाविलेलें आहे, व अनेकदां तें कमा-

विलेंहा आहे; व जगाच्या अंतापर्यंत हा क्रम असाच चालूही राहील. परंतु स्वातंत्र्य मिळण्याचे व मिळविण्याचे भूतकालांतील जे प्रयत्न तेच वर्तमानकाळां-तील प्रयत्न होत व तेच भविष्यत्कालांतील प्रयत्न असावयाचे आहेत. सर्व प्रयत्नांची दिशा एकच व त्यांतील बीजभूत तत्त्वेंही एकच. फरक काय तो काल, देश व नाम यांपुरताच आहे व असूं शकणार. पूर्वी हे प्रयत्न जर पश्चिम दिशेस झालेले असतील, तर हल्लीं ते पूर्व दिशेस चाललेले असतील, व पुढें दुसऱ्याच एखाद्या दिशेस चालू होतील. पूर्वीच्या प्रयत्नांचे पुरस्कर्ते जर अमेरिकेचा जॉर्ज वाशिंग्टन, हंगेरीचा फ्रांसिस डीक व आयर्लंडाचा डी व्हॅलेरा असतील, तर हल्लींच्या प्रयत्नांचे पुढारी इजिप्तचा झगलूल पाशा व कोरियाचा सिंगमन री असे असतील. औट हात लांबीच्या मर्त्य कुडीचा विचार सोडून देऊन तिजमध्यें सळसळणाऱ्या अमर्त्य तत्त्वांचाच जर विचार केला, तर वाशिंग्टन तोच झगलूल व डीक तोच डी व्हॅलेरा होय, असेंच म्हटलें पाहिजे. वॉशिंग्टनच्याच पावलांवर पावलें टाकून डी व्हॅलेरानें आयर्लंडास स्वराज्य संपादन करून दिलें, आणि व्हॅलेराचेंच देशकाल परिस्थित्यनुरूप अनुकरण करून सिंगमन री आपल्या मातृभूमीस स्वातंत्र्य प्राप्त करूं इच्छित आहे. जगांतील स्वातंत्र्यवीर हे एकाच तत्त्वाचीं केवळ भिन्न भिन्न स्वरूपें व एकाच स्वतंत्रताज्योतीचे नानाविध स्फुलिंग होत! स्वतंत्रता देवीच्या मंदिराकडे जाणारी एकच सोपानपरंपरा स्वतंत्र राष्ट्रांनीं चढलेली आहे व स्वातंत्र्येच्छु राष्ट्रांना चढावी लागणार आहे. या सोपानपरं-परेंतील सात पायऱ्याच उपरिनिर्दिष्ट सप्तपदी होय!

स्वातंत्र्य गमाविण्याचे व कमाविण्याचे मार्ग आतां ठराविक व कायम ठशाचे बनून गेलेले आहेत. स्वातंत्र्याच्या शुद्ध व पोषक वातावरणांत वावरणारीं जीं राष्ट्रें कालवशात् अगर करनशिबानें परतंत्रतेच्या कुजट व मारक गर्तेंत येऊन पडतात, तीं या सोपानपरंपरेंतील उच्च पायऱ्यांवरून घरंगळत येऊनच पडत असतात; आणि जीं वर स्वातंत्र्याच्या वातावरणांत जाऊं इच्छितात त्यांना याच पायऱ्या धैर्यानें व धडाडीनें चढून वर जावें लागतें. या सात पायऱ्यांवरून खालीं घसरणें म्हणजेच स्वातंत्र्य गमाविणें होय व या सात पायऱ्या चढून वर जाणें याचाच अर्थ स्वातंत्र्य संपादन करणें होय! या घसरण्याचा इतिहास जितका उद्वेगकारक असतो, तितकाच आल्हादकारक चढण्याचा इतिहास वाटतो; आणि पहिल्या इतिहासामुळें जर मानवी मन खचत जातें, तर दुसऱ्या इतिहासामुळें तेंच मन

वर खेंचलें जातें. पहिला इतिहास जर अंतःकरण रोषावितो; तर दुसरा इतिहास अंतःकरण तोषवितो; आणि पहिला जर सद्भावना उणावतो, तर दुसरा त्या भावना दुणावतो !

या सप्तपदींत एक शारीरिक व दुसरा मानसिक असे दोन टप्पे आढळून येतात. दुसऱ्या राष्ट्राचें स्वातंत्र्य हरूं इच्छिणारें राष्ट्र प्रथम त्या राष्ट्राचें शरीर काबीज करतें, व नंतर त्याचें मन जिंकण्याच्या मार्गास लागतें. रणांगणावर त्या राष्ट्रास पराभूत करून, वीर उत्पन्न करणाऱ्या सर्व संस्थांचा व समाजांचा विध्वंस करण्यांत येतो; आणि अशा रीतीनें तें राष्ट्र हतबल झाल्यानंतर, त्यांतील स्वतंत्र कल्पनांचा कोंडमारा करीत करीत शेवटीं त्याचें मन दुबळें व कमकुवत बनविण्याच्या खटाटोपास लागतें. लढाऊपणाच्या अत्युच्च पायरीवरून ढकलून देऊन, मग तो सद्गुण प्रसवणाऱ्या सर्व संस्थांचा व संस्कृतीचा उच्छेद करण्यांत येतो; आणि शारीरिक दृष्ट्या पारतंत्र्य स्थापन झाल्या-नंतर, स्वतंत्रतेच्या कल्पनांचा कोंडमारा, सार्वत्रिक निराशा व नाउमेद, राज्यकर्त्यांची पायधरणी केल्याविना स्वोन्नतीविषयींचा नाइलाज, अधोगतीबद्दलच्या स्पष्ट विचारांची गळचेपी, व शेवटीं तिजबद्दलच्या अस्पष्ट कल्पनांचा देखील अभाव, अशा प्रकारेंच कोणतेंही जयिष्णु राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचें स्वातंत्र्य हिरावीत असतें.

स्वातंत्र्य संपादन करूं इच्छिणाऱ्या राष्ट्राचा मार्ग हा केव्हांही स्वातंत्र्य हिरावूं इच्छिणाऱ्या राष्ट्राच्या उलट दिशेनें असतो. पहिल्या राष्ट्राचे पुढारी जर त्यास वर उचलीत असतात, तर दुसऱ्याचे पुढारी त्यास खालीं ढकलून देत असतात. दोघेही त्या राष्ट्रास सात पावलें टाकण्यास भाग पाडतात. पण पहिले जर तीं टाकण्यास लावून त्यास स्वातंत्र्याची जोड करून देतात, तर दुसरे तीं टाकण्यास भाग पाडून त्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याची मोडतोड करतात. ज्या सात पायऱ्यां-वरून घसरत जाऊन एखादें राष्ट्र आपलें स्वातंत्र्य गमावून बसतें, त्याच पायऱ्या धिम्मेपणानें चढत जाऊन त्याला स्वातंत्र्याची पैदास करावी लागते. एक वरून खालीं पडतें, तर दुसरें खालून वर चढतें. अधोगतीच्या अस्पष्ट कल्पनेच्या पहिल्या पायरीवरून, तिजबद्दलच्या स्पष्ट कल्पनेची दुसरी पायरी, नंतर पायधरणी-ची व मनधरणीची तिसरी पायरी, निराशेची चवथी पायरी, निष्क्रिय प्रति-काराची पांचवी पायरी, गुप्त मंडळ्यांची सहावी पायरी व सशस्त्र बंडाची सातवी पायरी, अशा रीतीनें पायरीपायरीनें चढत जाऊन परतंत्र राष्ट्राला स्वातंत्र्याचें

शिखर गाठावें लागतें. वरील सोपानपरंपरेंतील शेवटल्या दोन पायऱ्या चढण्याची त्याला मोठीशी हौस वाटते, अशांतली गोष्ट नव्हे. परंतु त्या त्याला चढाव्या लागतात मात्र खास. पांचव्या पायरीवर अधिष्ठित झाल्यानंतर वरील दोन पायऱ्यांवरून एकदम उड्डाण करून स्वतंत्रतेच्या प्रदेशांत जाणें कोणालाही हवें असतेंच; परंतु राज्यकर्त्यांचा लोभीपणा त्यांस तसें करूं देत नाहीं, असें जगाचा इतिहास स्पष्ट सांगत आहे.

अमेरिकेच्या वॉशिंग्टनाची किंवा हंगेरीच्या डीकची अशी कोठें इच्छा होती कीं, स्वातंत्र्याच्या जन्मसिद्ध हक्कासाठीं मनुष्यप्राण्यांनीं एकमेकांस मारावें व मरावें? बिचाऱ्यांनीं कैक वेळां तरी आपल्या राजकर्त्यांची अशी काकुळतीनें विनंति केली होती कीं, स्वातंत्र्य प्रत्येक मानवी प्राण्याच्या हृदयाचा कलिजा असल्यामुळें त्याच्या प्राप्तीच्या बाबतींत त्यांनी स्वतःवर प्रसंग ओढून घेऊं नयेत, व दुसऱ्यांवरही गुदरूं नयेत. पण तें लक्षांत घेतो कोण? राज्यकर्त्यांची नेहमीं-चीच अशी घमेंड असते कीं, आपल्या हातांतील पाशवी सामर्थ्यानें आपण आपल्या प्रजाजनांच्या सर्व महत्त्वाकांक्षा सहज चिरडून टाकूं; आणि नेहमींचाच असा अनुभव आहे कीं, ही त्यांची रग व घमेंड त्यांचे प्रजाजन सपशेल जिरवून टाकतात. याचें ढळढळीत उदाहरण म्हटलें म्हणजे आयर्लंडाचा १९२० ते १९२२ पर्यंतचा इतिहास होय. महायुद्धांतील जयामुळें मदांध बनलेल्या ब्रिटिश राजसत्तेस अशी मोठी घमेंड वाटत होती कीं, जर्मनी, ऑस्ट्रिया इत्यादि बलाढ्य राष्ट्रांचा चक्काचूर उडवून देणारें ब्रिटिश साम्राज्याचें पाशवी सामर्थ्य आयर्लंडा-सारख्या चिमुकल्या राष्ट्राची हड्डी क्षणार्धांत नरम केल्याशिवाय राहणार नाहीं. ब्रिटिश मुत्सद्यांची कोण ती आढ्यता व ताठरपणा? परंतु अखेरीस त्याच टीच-भर लांबीरुंदीच्या आयर्लंडानें इंग्लंडास जर्जर करून त्यास दातीं तृण धरावयास लाविलें. आजकाल जपानचा बेफाम उन्मत्तपणा कोरियांत धुमाकूळ घालीत आहे; परंतु सरतेशेवटीं हाच कोरिया जपानला खडे चारण्यास खचित कमी करणार नाहीं स्वातंत्र्यदिनास प्रतिबंध केल्याबरोबर कोरियांतील थोरांनीं जरी तो मान्य केला, तरी पोरांनीं तो केला नाहीं, हें जपाननें विसरतां कामा नये. सशस्त्र लष्करी अधिकारी समोर उभे असतांना निर्भयपणानें आपल्या खिशांतील स्वातंत्र्याचें निशाण झटकन् बाहेर काढून फडफडविणारा तो अवघा तेरा वर्षांचा कोरियन विद्यार्थी आगेंमागें जगाच्या भर चव्हाट्यावर जपानची अब्रू घेण्यास

आतां खास चुकणार नाहीं. कोरियाचें स्वातंत्र्य त्या लहान विद्यार्थ्यांच्या त्या लहानग्या निशाणावर भावि कोरियन देशभक्तांनीं आपल्या रक्तानें ठळठळीत लिहून ठेविलेलें आहे. धरणीकंपरूपी परमेश्वरी कोपानें विदीर्ण झालेला जपान असतें.दरूपी मानवी रोषानें आज नाहीं उद्यां छिन्नविच्छिन्न होणार, यांत मुळींच शंका नाहीं. तरी पण जपानचा खुनशी उर्मटपणा अद्याप रेसभरानेंही कमी होत नाहीं, हें कोरियाचें नव्हे तर जपानचेंच दुर्भाग्य होय.

अमेरिका, हंगेरी, आयर्लंड, इटाली, ग्रीस इत्यादि राष्ट्रांतील राजकर्त्यांना तीच तीच अद्दल घडलेली असतांनासुद्धां इजिप्त व हिंदुस्थान यांतील राजकर्त्यांनीं तिजपासून अजूनही योग्य बोध घेऊं नये, हें त्यांचें दुर्दैव होय. इजिप्त व हिंदुस्थान स्वतंत्र होणार व लवकरच होणार, याबद्दल मुळींच संशय बाळगावयास नको. चित्रगुप्ताच्या जमाखर्चांत प्रत्यक्ष परमेश्वरी हात तो जमाखर्च लिहूं लागलेले आहेत. दिल्ली-सिमल्याचीं शिखरें गदगदां हलावयास लागलीं असून तीं केव्हां कोसळून खालीं पडतील, याचा मुळींच नेम नाहीं. राज्यकर्ते त्या शिखरांना कितीही नवीन धिरे देण्याचा उद्योग करोत; परंतु या कामीं शेवटीं त्यांची फसगत होण्यास खास चुकणार नाहीं. एक वेळेस असंभाव्य गोष्टी संभाव्य होऊं शकतील; पण स्वातंत्र्याची जळती ज्योत अरेरावीनें व दडपशाहीनें विझली जाणार नाहीं, हें उमजण्यांतच राज्यकर्त्यांचा शहाणपणा दिसून येत असतो. स्वातंत्र्य-लालसेवर उत्कृष्ट मारक चीज म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीच होय, दडपशाही खचित नव्हे.

दे॰ बाबुराव भिडे यांच्या पुस्तकाचें वरीलप्रमाणें थोडक्यांत सार देतां येईल. प्रत्येक महाराष्ट्रीयानें हें पुस्तक एकदां तरी लक्षपूर्वक वाचावें, म्हणजे त्याच्या मनांत पसरत चाललेलें भ्रामक समजुतींचें धुकें पार वितळून जाईल, अशी मला उमेद वाटते. हिंदुस्थानच्या सध्यांच्या हलाखीच्या व हताशपणाच्या स्थितींत त्याच्या मनावर एखाद्या चकाकणाऱ्या तत्त्वज्ञानाची मोहनी पडणें साहजिक आहे, व त्याबद्दल कोणासही दोष देतां येणार नाहीं. परंतु या मोहपाशांत न सांपडणें व कदाचित् सांपडल्यास त्यांतून निसटून बाहेर पडणें अशा उद्देशानेंच हें पुस्तक लिहिलेलें असावें असा माझा समज आहे; व तो खरा असल्यास, तो उद्देश पुष्कळ अंशांनीं साध्य होईल व होवो, अशी आशा व्यक्त करून मी हें सार संपवितों.

ता. २ जानेवारी १९२४
पुणें, पेठ सदाशिव,
बलवंताश्रम.

**ल. ब. भोपटकर.**

# जगांतील असहकारिता

## —१—

## लोकसत्ताक--अमेरिका.



We hold these truths to be self-evident, that all men are created equal, that they are endowed by their Creator with certain inalienable Rights, that among these are Life, Liberty, and the pursuit of happiness. That to secure these rights, Governments are instituted among men, deriving their just powers from the consent of the governed, that whenever any Form of Government becomes destructive of these ends, it is the Right of the People to alter or abolish it and to institute new Government.

—*American Declaration of Independence.*

कोणत्याही स्वातंत्र्येच्छु राष्ट्राला स्वातंत्र्य कथांचा इतिहास मार्गदर्शक झाल्यावांचून राहत नाहीं. व ते इतिहास वाचीत असतांना कित्येक ठिकाणीं हिंदुस्थानांत घडत असलेल्या गोष्टींचें वर्णन आपण वाचीत आहों कीं काय, असाही भास होतो. स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत एक प्रकारचें विलक्षण साम्य असतें व हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या झगड्याशीं अशा प्रकारचें विशिष्ट साम्य असणाऱ्या देशांचा इतिहास आम्हां हिंदी स्वराज्याच्या झगड्यांत मार्गदर्शक व्हावा म्हणून वाचकांच्या सोयीसाठीं क्रमशः देण्याचें योजिलें आहे.

आयर्लंड झालें, अमेरिका झाली किंवा हिंदुस्थान झाला, तरी प्रत्येकाच्या स्वातंत्र्याच्या चळवळींत एक प्रकारचें विलक्षण साम्य आढळतें. 'Histroy is philosophy teaching examples' हें इंग्रजी मुत्सद्दी बोलिंगब्रोक याचें विधान किती अर्थपूर्ण आहे ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत येईल. गतइतिहासांत घडलेल्या गोष्टी केवळ इतिहासांत नमूद करून ठेवण्यासाठीं नसतात; परंतु गतकालीन पुरुषांनीं केलेल्या चळवळींत त्यांची प्रगति अगर परागती कशी

झाली याचें ज्ञान भावी पिढीस व्हावें, हाच इतिहास लेखनाचा प्रमुख उद्देश असतो. याच दृष्टीनें अमेरिकन राज्यक्रांतीचा इतिहास प्रत्येक स्वातंत्र्येच्छु मनुष्यानें मननपूर्वक वाचण्यासारखा आहे.

इंग्लंडनें आपला खर्च भागविण्याकरितां ज्या वेळीं केवळ अन्यायानें अमेरिकेवर नानाप्रकारचे कर लादण्यास सुरवात केली व अमेरिकन लोकांनीं मोठ्या स्वाभिमानानें अशा अन्यायापुढें मान लवविण्याचें नाकारलें, तेव्हां इंग्लिशांनीं आपलें दडपशाहीचें अमोघ अस्त्र तेथें सोडून कित्येक संस्था बेकायदेशीर म्हणून बंद केल्या, सरकारी कामावर असतां ब्रिटिश अधिकाऱ्यांचा खून करण्यांत आला व अमेरिकन प्रजेंत असंतोष उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला; वगैरे नाना आरोपांवरून अनेक अमेरिकन देशभक्त केवळ 'न्यायासाठीं' हद्दपार करण्यांत आले. ठिकठिकाणीं राजद्रोहाचें भूत वावरत असल्याचा ब्रिटिश अधिकाऱ्यांस संशय येऊं लागला.

या सर्व जुलुमांना उत्तर म्हणून अमेरिकन लोकांनीं जी स्वावलंबनाची चळवळ सुरू केली व ब्रिटिश मालावर कडकडीत बहिष्कार घालून ब्रिटिश सरकारच्या नाकीं नव आणिले, तो इतिहास आजच्या हिंदुस्थानांतील स्वावलंबनाच्या चळवळीला पोषक होण्यासारखा आहे.

अमेरिकन-स्वातंत्र्य इतिहासावरून एका त्रिकालाबाधित सिद्धान्तास बळकटीच येते. तो सिद्धान्त म्हणजे स्वातंत्र्यपथ हा अत्यंत दुर्गम व संकटमय आहे. तो आक्रमण करणारांमध्यें अत्यंत चिकाटी, विलक्षण उत्साह व सर्वांत विशेष म्हणजे अलोट धैर्य पाहिजे. स्वातंत्र्यावर काल्पनिक विश्वास असल्यानें कोणास स्वातंत्र्य मिळत नसतें. स्वातंत्र्याभिलाषी मनुष्यांत एक गोष्ट प्रामुख्यानें लागते, ती म्हणजे निष्कारण वाचाळतेपेक्षां प्रचंड आत्मविश्वास लागतो व त्याच्या जोरावर त्याच्या हातून महत्कृत्यें होत असतात. स्वातंत्र्याचा अमूल्य ठेवा हा धीर, वीर, उत्साही व उद्योगी पुरुषांसाठीं आहे.

अमेरिकन इतिहासावरून एक गोष्ट प्रामुख्यानें नजरेस येते, ती ही कीं, देशांतील प्रत्येक मनुष्य स्वातंत्र्यासाठीं तळमळणारा सांपडेल अशी अपेक्षा करणेंच वेडपणाचें होईल. अमेरिकन लोकांस पदोपदीं त्यांच्या स्वदेशबांधवांकडूनच विरोध झाला व जनरल लाफायेट यासारखा वीरपुरुष एके वेळीं अगदीं निराश झाला असतां वॉशिंग्टननें त्याला दिलेलें उत्तर प्रत्येक देशभक्तानें ध्यानांत ठेवण्या-

सारखें आहे. तो म्हणाला, 'We must not in so great a cause, expect to meet with nothing but sunshine.' अमेरिकन स्वातंत्र्याचा उद्दीपक इतिहास सांगण्यापूर्वी त्याचा

## थोडा पूर्वेतिहास

येथें सांगितला पाहिजे.

युरोपांतील धर्मवेडास गांजून देशत्याग केलेल्या स्वाभिमानी अशा लोकांनीं मूळ अमेरिकेंत वसाहत केली. इंग्लंडांतील धार्मिक जुलुमास वैतागून मातभूमीस अखेरचा रामराम ठोकलेल्या पिलग्रिम फादर्स या सुप्रसिद्ध लोकांकडे मॅसॅच्यूसेटस, कनेक्टीकट्ट, न्यू हॅम्पशायर व ऱ्होड बेट येथील मूळ वसाहती स्थापण्याचा मान आहे. क्रमशः मॅसॅच्युसेटस् संस्थानांची भरभराट होत जाऊन इतर बरींच संस्थानें त्यापासूनच निर्माण झालीं. या नवीन वसाहत करणारांतील मूळ प्यूरिटन पंथाविषयींचा उत्साह कालमानानें कमी होत गेला तरी प्यूरिटन पंथांतील जें स्वाभिमानाचें असें लोकसत्तेचें तत्त्व त्यामुळेंच अमेरिकन राज्यक्रांतीला एक प्रकारचें विशिष्ट वळण मिळालें.

न्यू यॉर्क व न्यू जर्सी या संस्थानांत मूळ डचांनीं वसाहत केली. डिलावेयर हें स्वीडिश लोकांनीं वसविलें; परंतु हीं सर्व दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दींत इंग्लंडच्या ताब्यांत आलीं. उदारचरित विलियम पेन यानें पेन्सिलव्हॅनिया हें संस्थान वसविलें. या संस्थानांत ज्यांना आपल्या स्वतंत्र व निर्भीड मतांसाठीं म्हणून छळ सोसावा लागला त्यांना आश्रयस्थान मिळे. रॅलेनें नामकरण केलेल्या व्हर्जिनियांत क्रॉमवेलच्या भयानें पळालेल्या बऱ्याच राजपक्षीय लोकांनीं वसाहत केली असून सर्वांत जुनें म्हणजे १६०७ मधील पहिलें संस्थान हेंच होय! मॅसॅच्युसेटस् संस्थानांतील उदारमतवाद्यांनीं ज्याप्रमाणें राज्यक्रांतींत प्रमुख्यानें भाग घेतला, त्याचप्रमाणें व्हर्जिनियानेंही अमेरिकन स्वातंत्र्य-झगड्यांत अमोलिक मदत केलेली आढळते. मेरीलॅन्ड, बॉल्टिमोर वगैरे वसाहती धार्मिक छळामुळें मायभूमीस पारख्या झालेल्या लोकांनींच वसविल्या. उत्तर व दक्षिण कॅरोलिना हीं संस्थानें सन १६०७ च्या सुमारास व्हर्जिनियन लोकांनीं वसविलीं.

निरनिराळ्या कारणांसाठीं ज्यांना आपली मातृभूमि सोडावी लागली असे युरोपांतील अनेक देशांतील लोक अमेरिकेंत येऊन राहिले. इंग्लिश, डच, स्वीड, जर्मनी, मोरव्हियन्स, स्कॉट्स्, ह्यूगोनॉट्स् वगैरे अनेक लोकांनीं तेथें वसाहत केली.

त्या वेळीं युरोपांत फ्रेंच व इंग्लिश या दोन्ही सत्ता तुल्यबल असून उभयतांत सतत युद्धें चालत असत. याच लडाक्यांत फ्रान्सनें या नव्या तेराही वसाहती आपल्या सत्तेखालीं आणल्या. या वसाहतींच्या मालकीसाठीं इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें सतत एक शतकभर सारखा झगडा चालू होता. अखेर सन १७६३ सालीं पारीसचा तह होऊन कानडा व मिसीसिपी खोऱ्यांतील विस्तीर्ण मुलूख इंग्लिश राजछत्राखालीं आला. फ्रान्सच्या अंमलाखालीं लोकसत्तेचे अंकूर फोफावण्यास बिलकूलच वाव नसल्यानें फ्रान्सचें वर्चस्व नाहींसें होतांच संस्थानांना स्वाभाविकच जरा हायसें वाटलें.

पारीसच्या तहानें फ्रेंचांना ब्रिटिशांच्या सर्व अटींना मान्यता द्यावी लागली. त्यामुळें ब्रिटिश साम्राज्यांत हजारों चौरस मैलांचा विस्तृत मुलूख समाविष्ट झाला. परंतु एवढा विजय मिळविण्याला इंग्लंडला आपल्या तिजोरींतून सुमारें चौदा कोटी पौंड खर्ची टाकावे लागले व त्या वेळीं एवढी रक्कम म्हणजे इंग्लंडच्या डोक्यावरून पाणी जाण्यासारखी होती. त्यामुळें विजयाचा पहिला भर ओसरल्यावर ह्या प्रचंड खर्चामुळें सारखा ताण पडूं लागला व ब्रिटिश मंत्री ग्रेनव्हिल याची दृष्टि स्वाभाविक अमेरिकेकडे वळली. वसाहती म्हणजे मातृभूमीस द्रव्य पुरविण्याचे खजिने अशी तत्कालीन मुत्सद्यांची दृष्टि असल्यानें त्यांनीं अमेरिकेचा याचसाठीं उपयोग करून घेण्याचें ठरविलें; व अमेरिकेसंबंधीं जे जे कायदे करण्यांत येत, त्या सर्वांचा एकच हेतु, अमेरिकन उद्योगधंद्यांना प्रतिरोध व तेथून निघेल तेवढा पैसा काढणें हा असे. याच उद्देशानें तारीख १० मार्च १७६४ रोजीं ग्रेनव्हिल यानें कॉमन्स सभेंत असा ठराव आणला कीं, ब्रिटिश वसाहतींचें संरक्षण करण्यासाठीं अमेरिकन वस्तूंवर कर बसविण्यांत यावेल व त्या कराची उभारणी 'स्टॅंप ड्यूटी' नांवाचा कर बसवून करण्यांत यावी.

आपल्या देशांतील अन्यायास वैतागून जेथें अन्यायाचें, जुलुमाचें वारेंही लागणार नाहीं व आपल्या इच्छेप्रमाणें पूर्ण स्वातंत्र्य उपभोगितां येईल या इच्छेनें मातृभूमीपासून हजारों कोस दूर अशा ठिकाणीं येऊन वसाहत केली, व तो देश भरभराटीस आणला; स्वातंत्र्याचें सुख आपणांस आतां तरी कांहीं व्यत्यय न येतां मनमुराद अनुभविण्यास सांपडेल अशी वसाहतवाल्यांची अपेक्षा दुर्दैवानें खोटी ठरली.

मॅसॅच्यूसेटस्, चार्लसटन्, ॲनॅपोलिस, फिलाडेल्फिया, ॲल्म्बी वगैरे कित्येक संस्थानांनीं इंग्लिश पार्लमेंटच्या धर्तीवर आपापल्या छोटेखानी पार्लमेंटा स्थापन केल्या होत्या; व अत्यंत उत्साहानें तेथें कामकाजही चाले, भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, हीं सर्व स्वातंत्र्यें तेथें असून सर्वांत महत्त्वाचें म्हणजे आपला कर आपणच बसविण्याचा हक्कही तेथें जनतेस सरसहा होता. इंग्लिश पार्लमेंटचें अनुकरण करण्यांत या छोटेखानी पार्लमेंटांस मोठी प्रौढी वाटे.

अशा स्थितींत इंग्लिश पार्लमेंटच्या एका लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं एकदम प्रचंड क्रांति घडून आली. अमेरिकेंतून शक्य तितका पैसा काढण्याचें इंग्लिश पार्लमेंटनें ठरविलें. त्यांना अमेरिका म्हणजे सोन्याचें अंडें घालणारी हंसीच वाटली. व पैसा वसूल करण्यासाठीं नाना प्रकारचे कर अमेरिकेवर लादण्याचें त्यांनीं ठरविलें. या सर्वांत नॅव्हिगेशन ॲक्टानें जास्त प्रलय केला. अमेरिकन लोकांना हा कायदा अत्यंत दुस्सह वाटला. जे लोक आपल्या देशाचें संरक्षण करण्यासाठीं सदैव सज्ज व जे युद्धकर्मांत इंग्लिशांइतकेच निपुण त्यांजवर अशा प्रकारचा कायदा लादलेला त्यांना सहन झाला नाहीं. अमेरिकन राज्यक्रांतीस जे अनेक अन्याय कारणीभूत झाले त्या सर्वांत नॅव्हिगेशन ॲक्टाची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. 'अमेरिकेंतील वसाहतींचें संरक्षण करण्यासाठीं, तेथें कांहीं सैन्य ठेवणें अत्यावश्य वाटून व त्या सैन्याचा खर्च भागविण्यासाठीं अमेरिकेंतील कांहीं वस्तूंवर कर बसविण्यांत येऊन इंग्लंडशिवाय त्या वस्तु दुसऱ्या कोणत्याही देशांत पाठविण्यास या कायद्यानें मनाई केली होती; व असा कायदा पसार झाल्याबरोबर जें इंग्रजी आरमार अमेरिकेंत होतें त्यावरच अमेरिकन माल बाहेर कोणत्याही देशीं न पाठविण्यांत येईल अशी खबरदारी घेण्याचें काम सोंपविलें.

याच कायद्याच्या जोडीला स्टँप ॲक्ट नांवाचा कायदा आणून बसविला. कोणत्याही प्रकारचें कायदेशीर कृत्य करावयाचें असल्यास त्याची—लग्नविधीसुद्धां—स्टँप ॲक्टाप्रमाणें ग्रेटब्रिटनच्या सिंहमुद्रांकित छापाच्या निळ्या कागदावर नोंद करावी लागे. म्यूटिनी ॲक्टाची आणखी एक भर यांत पडली. या कायद्यानें, प्रधानमंडळाला अमेरिकेंत वाटेल तितकें सैन्य पाठवितां येत असून त्या सैन्याला अमेरिकन लोकांनीं राहण्यास जागा, अन्नपाणी, आंथरूण-पांघरूण, लांकूड-फांटा, साबण, पेयें, मेणबत्त्या वगैरे गोष्टी पुरविल्या पाहिजेत, अशी योजना केली होती.

असल्या जुलुमी कायद्यांची बातमी अमेरिकेंत पोहोंचतांच अमेरिकन लोकांनीं या अन्यायाच्या कायद्यांचा तीव्र निषेध केला व हे कायदे दूर व्हावे यासाठीं कॉमन्स सभा व राजेसाहेब यांजकडे शिष्टमंडळें पाठविलीं, अर्ज केले, विनंत्या केल्या, लंडन येथील अमेरिकेशीं व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांनींही हे अन्याय दूर व्हावे म्हणून आपली पराकाष्ठा केली; परंतु अशा प्रकारच्या निषेधपत्रिका स्वीकारतांच येऊं नयेत असा एक सोईस्कर नियम ग्रेनव्हिल साहेबांनीं करून आपलें काम तसेंच नेटानें चालविलें. अमेरिकेनें या अन्यायाबद्दल तीव्र निषेध केला. त्याचप्रमाणें इंग्लंडमध्येंही बर्क, चॅथॅम व लॉर्ड कॅम्डन यांनीं दूरदर्शीपणें इंग्रजांनीं या कृत्यापासून परावृत्त व्हावें अशी बरीच खटपट केली. चॅथॅमनें इंग्लंडला स्पष्ट बजावलें, "इंग्लंडांत शिपमनी कराच्या वेळीं जसा नेटाचा प्रतिकार झाला त्याच स्वरूपांत अमेरिकेंतील प्रतिकार आहे. अमेरिकन लोक स्वातंत्र्यासाठीं दारिद्र्यही पत्करण्यास तयार झाले आहेत, व त्याचें संरक्षण करण्यासाठीं ते स्वातंत्र्यवीर आत्मसमर्पणही करतील. मला थोडेंबहूत इतिहासाचें जें ज्ञान आहे त्यावरून मी असें स्पष्ट विधान करतों कीं, या झगड्यांत शेवटीं अमेरिकाच विजयी होईल. अशा स्वातंत्र्योत्सुक राष्ट्रांवर वाटेल तसे अन्यायाचे कर लादणें केव्हांही यशस्वी होणार नाहीं. या कामांत शेवटीं आपणांसच माघार घ्यावी लागेल. पण ती वेळ आली नाहीं तों आतांच माघार घेण्यांत शहाणपणा आहे." चॅथॅमच्या बुद्धिवादाकडे लक्ष देण्यास ब्रिटिश लोकांस त्या वेळीं सवडच नव्हती. कॉमन्स सभेनें, राजानें सर्वांनीं या ठरावास संमति दिली.

याच सुमारास व्हर्जिनिया संस्थानची बैठक विलियम्सबर्ग येथें भरली होती. तथें हेनरी पॅट्रिक नांवाच्या देशभक्त तरुणानें खालील आशयाचे ठराव मंजूर करून घेतले:—

१. राजेसाहेबांच्या या वसाहती अत्यंत जुन्या असून येथें मूळ वसाहत करणारांनीं इंग्लंडहून येतांना, ग्रेटब्रिटनमधील प्रजाजनांना जे हक्क उपभोगतां येतात त्या हक्कांचा ठेवा आम्हां त्यांच्या वंशजांच्या स्वाधीन केलेला आहे.

२. पहिल्या जेम्सनें दोन सनदा देऊन इंग्लंडच्या प्रजाजनांस जे हक्क आहेत तेच येथील प्रजाजनांस असल्याचें मान्य केलें आहे.

३. लोकांवर कर बसविणें ते लोकांचें सामर्थ्य पाहून लोकांच्या योग्य प्रतिनिधींनींच बसवावे हें ब्रिटिश स्वातंत्र्यांतील वैशिष्ट्य येथेंही रूढ आहे.

४. व याच हक्कांचा उपभोग सरकारची ही वसाहत फार प्राचीन काळा-पासून घेत आहे. व इंग्लंडचे राजे व जनता यांना ती गोष्ट आजपर्यंत सम्मत अशीच होती.

५. ज्या अर्थी कोणत्याही प्रकारचे कर बसविणें वगैरेचा हक्क हा वसाहतींचाच आहे त्या अर्थी त्यांत कोणी ढवळाढवळ करूं लागल्यास ब्रिटिश व अमेरिकन स्वातंत्र्याचा नाश करण्याचा त्याचा हेतु आहे असें मानण्यांत येईल.

६. या वसाहतींतील सरकारचे राजनिष्ठ प्रजाजन, वसाहतीच्या योग्य प्रतिनिधींनीं केलेल्या कायद्यांखेरीज इतरांचे कायदे मानण्यास बिलकुल तयार नाहींत.

७. म्हणून या प्रतिनिधीमंडळाखेरीज इतर कोणासही या वसाहतीवर कर लादण्यास हक्क आहे असें कोणी भाषणद्वारा अगर लेखनद्वारा म्हणेल तर तो सरकारच्या वसाहतींचा शत्रु मानण्यांत येईल.

अशा प्रकारचे स्पष्ट ठराव आणल्याबद्दल हेनरी पॅट्रिक याजवर गहजब उडाला. त्यांना उत्तर देतांना तो म्हणाला, " सीझरला ब्रूटस भेटला, पहिल्या चार्लसला क्रॉमवेल भेटला व तिसऱ्या जार्ज—" एवढे शब्द उच्चारतांच 'राजद्रोह ! राजद्रोह !' म्हणून सभेंत आरडाओरड झाली, परंतु तो वीरपुरुष किंचितही विचलित न होतां म्हणाला, " तिसऱ्या जॉर्जनें त्यांचीं उदाहरणें डोळ्यासमोर टेवावींत असें म्हणण्यांत राजद्रोह होत असेल तर मला त्याची पर्वा नाहीं ! "

मॅसॅच्युसेटस् प्रतिनिधीसभाही आपल्या हक्कांस पूर्ण जागृत होती. तिनें सर्व वसाहतींस पत्रें पाठवून न्यू यॉर्क येथें भरणाऱ्या कॉंग्रेसला आपले प्रतिनिधी पाठविण्याबद्दल विनंति केली. अमेरिकेवर इंग्लिशांनीं कर लादणें यांत युक्ता-युक्तता किती आहे याबद्दल लंडन, बोस्टन, न्यू यॉर्क, फिलाडेल्फिया वगैरे ठिकाणीं खूप चर्चा सुरू होऊन या प्रश्नावर अरित व नारती दृष्टीनें टीका करणारीं हजारों हस्तपत्रकें, पुस्तकें दररोज प्रसिद्ध होत होतीं.

न्यू यॉर्कच्या परिषदेला एकंदर नऊ प्रांतांचे प्रतिनिधी आले व तीन आठवडे-पर्यंत सतत वाटाघाट करून त्यांनीं लोकांच्या हक्कांसंबंधीं व तक्रारींसंबंधीं एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. व अमेरिकन लोकप्रतिनिधींच्या सभेखेरीज इतर कोणासही कर बसविण्याचा हक्क नाहीं हें स्पष्ट शब्दांत नमूद केलें व इंग्लिश पार्लमेंटास जर आम्हांवर कायदेच लादावयाचे असतील तर योग्य प्रमाणांत

आमचे प्रतिनिधी ब्रिटिश पार्लमेंटांत निवडण्याचा आम्हांस हक्क असला पाहिजे अशी त्यांनीं मागणी केली.

ही निषेधाची चळवळ फक्त वसाहतींच्या काँग्रेसांमधूनच चालली होती असें नसून काँग्रेसच्या बाहेर सामान्य जनतेनेंही या चळवळींत भाग घेतला होता. व्यापारी वर्गानें इंग्लंडवर आर्थिक बहिष्कार घालण्याची योजना तयार करून त्याप्रमाणें ती प्रत्यक्ष सुरू केली; व अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धांत ही चळवळ अति यशदायी झाली.

न्यू यॉर्कच्या व्यापारी वर्गानें इंग्लंडवर आर्थिक बहिष्कार घालण्याची चळवळ सुरू केली. व त्याप्रमाणें आपल्या विलायतेंतील गुमास्त्यांना आमच्या तक्रारी दूर झाल्याखेरीज कोणताही माल पाठवूं नये अशा सक्त ताकिदी पाठविल्या. ही बहिष्काराची चळवळ तावडतोब सर्व अमेरिका खंडभर पसरली व केवळ या चळवळीनें इंग्रजांच्या दडपशाहीस थोडासा आळा पडला. परंतु एवढ्यानें अमेरिकेनें आपली चळवळ थांबविली नाहीं. इंग्लंडनें अमेरिकेच्या हक्कासंबंधीं ढवळाढवळ करण्याचें थांबवीपर्यंत ही बहिष्काराची चळवळ अशीच नेटानें चालविण्याचें त्यांनीं ठरविलें.

सर्व लोक इंग्लंडच्या वर्तनानें अगदीं चिडून गेले होते. त्यामुळें त्यांनीं एकदिलानें ही बहिष्काराची चळवळ चालविली. अमेरिकेंत अल्पावधींत चहाचा अत्यंत सुळसुळाट झाला होता. जिकडे तिकडे चहाचीं दुकानेंच दुकानें स्थापन झालीं होतीं. परंतु बहिष्काराची चळवळ सुरू होतांच जिकडे तिकडे चहाविरुद्ध मोहीम सुरू झाली. चहापाननिषेधमंडळ्या स्थापन झाल्या. चहा पिणें हें देशद्रोहाचें चिन्ह मानण्यांत येऊं लागलें. बेंजामिन फ्रँक्लीनसारख्यांनीं या बहिष्काराच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला. हजारों हस्तपत्रकें, पुस्तकें, व्याख्यानें या बहिष्कारासंबंधीं धुमधडाक्यानें सुरू झालीं. सर्व अमेरिकेंत विलक्षण हालचाल सुरू झाली. विलायती कापडावर त्यांनीं पूर्ण बहिष्कार घातला, व कापडाची उणीव दूर करण्यासाठीं लोकरीची पैदास वाढविण्याकडे विशेष लक्ष दिलें. लोकरीसाठीं मेंढरें पाहिजेत, तीं मारूं नयेत असें त्यांनीं ठरविलें. लोकरीचे चरखे सर्व देशभर फिरूं लागले. विलायती कापड वापरणें ही मोठ्या सभ्यतेची गोष्ट मानण्यांत येत होती, पण आतां ओबडधोबड लोकरीचें देशी वस्त्र वापरण्यांत लोकांना भूषण वाटूं लागलें. इंग्लंडचा कोणताही माल घ्यावयाचा नाहीं असें ठरतांच

देशांतील शेती स्वाभाविक वाढूं लागली. सर्व प्रकारचे घरगुती धंदे सुरू झाले. खाणींचें काम लोकांनीं अजिबात सोडून दिलें होतें; परंतु आतां शिसें, लोखंड यांच्या खाणींचीं कामें जोरानें सुरू झालीं व बंदुकीची दारू करण्याचे जुने दाखले पुनः हुडकून काढून तीही तयार होऊं लागली.

कोणत्याही वकीलानें इंग्लिश मनुष्याचा खटला चालवूं नये, कोणत्याही अमेरिकन मनुष्यानें इंग्लंडमध्यें कोणत्याही स्वरूपांत पैसा पाठवूं नये, याप्रमाणें चौफेर बहिष्काराचा मार्ग करण्यांत आला. अशा प्रकारच्या सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली; परंतु यापेक्षांही जोराचे व नेटाचे प्रयत्न झाले पाहिजेत असें म्हणणारा एक वर्ग निर्माण झाला. 'स्वातंत्र्यपुत्र' नांवाचा तरुणांचा एक संघ देशांत उत्पन्न झाला व त्याचें अस्तित्व लोकांस भासूंही लागलें होतें. आपल्या देशाच्या शत्रूसंबंधीं लोकमत तयार करण्याचें काम स्वातंत्र्यपुत्रांनीं उत्तम प्रकारें बजाविलें. स्टँप कागदाच्या लायसेन्सदारांना त्यांनीं प्रसंगीं दंडावर्णानें प्रसंगीं विनवणीनें त्या कामापासून परावृत्त केलें, व त्यांजपासून स्टँपचे कागद घेऊन ते अग्निसात करण्यांत आले. हळुहळू घासाघाशीचा प्रसंग येऊं लागला. स्वातंत्र्यपुत्र इंग्लिशांच्या या जुलुमाचा निषेध करण्यासाठीं मोठमोठ्या मिरवणुकी काढूं लागले. रागाच्या भरांत सेक्रेटरी ऑलिव्हर, गव्हर्नर हचिन्सन, वगैरेंचीं घरें उध्वस्त करण्यांत आलीं. सरकारी अधिकाऱ्यांदेखत स्टँपचे कागद जाळण्यांत येऊं लागले.

तारीख १ नोव्हेंबर रोजीं स्टँप ॲक्ट लागू करण्याचा दिवस ठरला होता; त्या दिवशीं तर या निषेधास पूरच लोटला. लोकांच्या प्रचंड मिरवणुकी निघाल्या. निषेधाच्या जाहिराती सर्व शहरभर लागल्या गेल्या व स्टँप घेणारांस शासन करण्यांत येईल अशा धमक्या देण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं. चिटणीस ऑलिव्हर याला तर त्याच्या घरांतून ओढून काढून त्याच्याकडून जागेचा राजीनामा देण्याबद्दल शपथ घेवविली. न्यू यॉर्कमध्यें यापेक्षांही जोरानें चळवळ सुरू होती. तेथील व्हाइस गव्हर्नर कोल्डन् हा अत्यंत अप्रिय मनुष्य होता. स्टँपचे कागद लोकांच्या हाता लागूं नयेत म्हणून त्यानें तिजोरींत मोठ्या बंदोबस्तानें ठेविले होते. तो गाडींतून जात असतां लोकांनीं त्याची गाडी पकडून त्याच्या देखत स्टँप ॲक्ट जाळून टाकला. नंतर त्याच्या कचेरींत जाऊन स्टँपचे कागद द्या म्हणून मागणी केली. कोल्डननें प्रथम ते देण्याचें नाकारून तोफा डागीन म्हणून लोकांस धमकी दिली. परंतु

खवळलेल्या लोकांनीं तिकडे लक्ष न देतां स्टँपचे कागद त्याजकडून हिसकावून घेऊन त्याच्यासमोर त्यांची होळी केली.

लोकांनीं या कायद्याविरुद्ध चालविलेली चळवळ सारखी नेटानें सुरूच होती, व त्यांचें बहिष्कारअस्त्र इतकें यशस्वी ठरलें कीं, सरकारला नमविण्याचें तें एक उत्तम साधन लोकांस मिळाल्यासारखें झालें. हा कायदा निर्माण करण्यास इंग्लंडला एकंदर १२ हजार पौंड खर्च लागला. परंतु त्यापासून उत्पन्न फक्त एक हजार पौंड झालें. शिवाय न्यूफौंडलंड, नोव्हास्कॉशिया, क्वेबेक, फ्लॉरिडा, वेस्ट इंडीज यासारख्या ठिकाणांतून कोट्यावधी पौंडाचा इंग्रजांचा व्यापार साफ बसला. इंग्रजांच्या कर्जाची फेड करावयाची नाहीं, व त्यांच्या मालावर पूर्ण बहिष्कार घालावयाचा या दोन अस्त्रांनीं इंग्लंड अगदीं मेटाकुटीस आलें, शेंकडों इंग्रज व्यापाऱ्यांचीं या बहिष्कारानें दिवाळीं वाजलीं व ते अगदीं हवालदील झाले. व त्यांचे हितसंबंध अशा प्रकारें बुडूं लागल्याचें पाहतांच त्यांनीं अर्ज, विनंत्या यांचा धुमधडाका चालविला व ग्रेनव्हिल मंडळावर अशा प्रकारें सर्व बाजूंनीं मारा होऊं लागल्यानें त्यास राजीनामा द्यावा लागला.

अमेरिकन लोकांची बाजू घेणारे पिट, कॉनवे, बर्क वगैरे गृहस्थ होते: त्यांनीं वेळोवेळीं ग्रेनव्हिलच्या धोरणाचा निषेध केला होता. जनरल कॉनवेनें हा दुष्ट कर रद्द व्हावा म्हणून ठरावच आणला व तो बहुमतानें पसारही झाला. पिट, कॉनवे, बर्क यांचे जयजयकार झाले. व अशा रीतीनें 'आई व लेक' यांमधील झगड्याचा पहिला प्रसंग समाप्त होऊन अल्पकाळ तरी पूर्ववत् संबंध पुनः सुरू झाले.

ग्रेनव्हील मंडळानें राजीनामा देतांच त्याच्या जागीं रॉकिंगहॅम यांचें मंत्रिमंडळ आलें. परंतु त्यांच्या मंत्रिमंडळांतच ऐकमत्य नसल्यामुळें अल्पावधींतच त्यास राम म्हणावें लागून ग्रॅफ्टन् मंडळ त्या जागेवर आलें. ग्रीनव्हील अद्यापिही विरुद्ध बाजूस असून अमेरिकन धोरणाबद्दल या नव्या मंत्रिमंडळास तो नेहमीं चिडवी. अमेरिकेवर कर बसविण्यास भिण्याइतके तुम्ही नामर्द आहांत असें त्यांस वेळोवेळीं डिंवची. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यानें एक नवें बिल पार्लमेंटपुढें मांडलें. त्या बिलान्वयें चहा, कांच, कागद, रंग व शिसें या सर्व पदार्थांवर जादा कर आकारण्यांत आले असून त्यांची वसुली अमेरिकन कस्टम अधिकाऱ्यांनीं करावी असें ठरविलें व तो एवढ्यावरच थांबला नाहीं.

क्वार्टरिंग ॲक्टला न्यू यॉर्कमंडळानें पूर्वींच धाब्यावर बसविलें होतें. तो कायदा त्यानें पुन: अंमलांत आणण्याचें ठरविलें. ही बातमी अमेरिकेंत कळतांच तेथें अत्यंत अस्वस्थता उत्पन्न झाली. स्वातंत्र्ययुद्धांत मॅसॅच्युसेट्स् प्रांत नेहमींच अग्रस्थानीं असे. त्यानें या कृत्याचा अत्यंत तीव्र निषेध करून इतर संस्थानांसही या जुलमी कायद्याचा प्रतिकार करण्यास सुचविलें.

सरकार बाजूनेंही प्रतिकार अस्त्र सोडण्यांत आलें. मॅसॅच्युसेटस्‌चा गव्हर्नर बर्नार्ड यानें सरकारी हुकुमावरून मॅसॅच्यूसेटस्‌च्या प्रतिनिधीमंडळास ठराव परत घेण्याबद्दल हुकूम सोडला. मंडळानें अर्थात् हा अन्यायाचा हुकूम धाब्यावर बसविला. बोस्टनमध्यें तर सर्व प्रकारास तीव्र स्वरूप आलें. तेथें जमलेल्या सर्व प्रतिनिधीमंडळानें या अन्यायाचा तीव्र निषेध केला.

सरकारनें यास उत्तर म्हणून शहरांत चार लष्करी पलटणी आणून ठेवल्या. क्वार्टरिंग ॲक्टप्रमाणें शहरांतील रहिवाशांनीं लष्करची सर्व प्रकारची बरदास्त ठेवावयास पाहिजे होती; परंतु जनतेनें त्यांच्याशीं सर्व बाजूंनीं पूर्ण बहिष्कार घातला. त्यानंतर उघडलेल्या पार्लमेंटास इंग्लंडच्या राजानें अमेरिकेच्या बंडाळीबद्दल दुःख प्रदर्शित करून अमेरिकेला ताळ्यावर आणण्यासाठीं तीव्र उपाय योजावे लागतील अशी धमकीही दिली, व त्याप्रमाणें अत्यंत कडक कायदेही पसार करण्यांत आले. जॉर्ज वॉशिंगटन आतांपर्यंत पोटामॅकतीरीं आपल्या घरीं सुखासनावर बसून होता तोही खडबडून जागा झाला. व म्हणाला, "ग्रेट-ब्रिटनमधील आमच्या यजमानास आमच्या स्वातंत्र्याचें अपहरण करावयाचें आहे. परंतु माझ्या मतानें स्वातंत्र्यरक्षणासाठीं प्रत्येक मनुष्य हातांत शस्त्र घेण्यास तयार होईल. परंतु सर्व उपाय संपल्यावरच अगदीं अखेर नाइलाज म्हणून शस्त्र ग्रहण करावयाचें आहे."

व्हर्जिनिया प्रतिनिधीमंडळानें राजाकडे अत्यंत सौम्य प्रकारची निषेधपत्रिका पाठविली. या आरोपावरून तेथील गव्हर्नर लॉर्ड बोटेटॉर्ट यानें तेथील प्रतिनिधी-मंडळच उधळून लावलें. व्हर्जिनियानें विलायती मालावरील बहिष्काराची चळवळ इतक्या जोरानें चालविलें होती होती कीं, बहिष्कार सर्वव्यापी व्हावा म्हणून ठिकठिकाणीं गांव कमिटया स्थापन केल्या व जो कोणी ब्रिटिश माल घेईल त्याला कडक शिक्षा देण्यांत येईल असें फर्माविलें यासंबंधीं मि. जॉर्ज मॅसन यानें वॉशिंगटनला लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे, "आमच्या सर्वस्वाचा

नाश होण्याची वेळ आली आहे. अशा वेळीं आम्हीं आपली थोडीशी चैन व ऐट कमी केलीच पाहिजे. स्वातंत्र्य संपादनासाठीं अशीं संकटें व दुःखें आनंदानें सोसण्यास आपण तयार झालें पाहिजे.''

सर्व देशभर बहिष्काराची चळवळ पुनः जोरानें सुरू झाली व या चळवळींत स्त्री-वर्गानें विशेष प्रामुख्यानें भाग घेतला. 'स्वातंत्र्य-पुत्रा'प्रमाणें त्यांनीं 'स्वातंत्र्य-कन्या' मंडळ स्थापन केलें. देशांतील उद्योगधंद्यांची वाढ करून सूत काढणें, लोंकर पिंजणें, कपडे शिवणें, कापड विणणें वगैरे त्यांनीं सुरू करून चळवळीची एक बाजू संभाळली. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत तेथील स्त्री-वर्गानें अत्यंत अमोलिक अशी मदत केली आहे. त्यांचा त्याग अत्यंत अवर्णनीय असा होता.

सन १७६९ मध्यें मॅसच्युसेटस् प्रतिनिधीमंडळानें ठराव केला कीं, स्वदेश परकी लष्करानें व्यापला असतां कोणत्याही स्वाभिमानी राष्ट्रास पूर्ण सनदशीर रीतीनें तेथील कारभार करतां येणेंच अशक्य आहे. दक्षिण कॅलोनिनानेंही असाच एक ठराव पास केला. हीं दोन्ही मंडळें सरकारनें लष्करी जोरावर उधळून लावलीं! व इतकें करून इंग्लंडनें फक्त सोळा हजार पौंड कर वसूल केला व तो वसूल करण्यास खर्च आला एक लक्ष सत्तर हजार पौंड! इंग्लिश व्यापाऱ्यांनीं बहिष्काराविरुद्ध खूप कारडाओरड केली. बोस्टन येथें जवळ जवळ सतरा महिने लष्करी तळ पडला होता. परंतु सर्व शहर त्यांस अस्पृश्याप्रमाणें लेखी. तरीही मधून मधून कटकटीचे प्रसंग येत व अशाच एका प्रसंगीं कॅप्टन प्रेस्टन नांवाच्या एका लष्करी अधिकाऱ्यानें चार इसम गोळ्या घालून मारले व दुसरे कित्येक जाया केले. यानंतर लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें. भडका केव्हां उडेल याचा नेम नाहीं अशी स्थिति प्राप्त झाली तेव्हां सॅम्युअल ॲडॅम्स यानें व्हाईस गव्हर्नरला भेटून त्याकडून लष्कराचा शहरांतील तळ हलविला.

परंतु लोक यामुळें शांत झाले नाहींत. आमच्या निरपराधी देशबंधूंचें खून करून आमची मातृभूमि तिच्याच लेकरांच्या रक्तानें माखली, ही गोष्ट हजारों हस्तपत्रकें, जाहिराती, मिरवणुकी, सभा यांद्वारें लोकांपुढें वरचेवर ठेवण्यांत येऊं लागली.

या दरम्यान विलायतेंत प्रधानमंडळांत पुनः घडामोड होऊन ड्यूक ऑफ ग्रॅफ्टनच्या जागीं लॉर्ड नार्थ यांचें प्रधानमंडळ अधिष्ठित झालें. त्यानें अधिकार-

सूत्रें हातीं घेतांच फक्त चहावरील कराखेरीज सर्व कायदे रद्द करण्याबद्दल बिल पसार करून घेतलें. हा कायदाही रद्द व्हावा अशी पुष्कळांची इच्छा होती; परंतु त्याप्रमाणें न होतां चहावरील कर कायमच राहिला. परंतु अमेरिकन लोकांस त्यामुळें जरासें बरें वाटून त्यांनीं चहा मागविण्याखेरीज सर्व प्रकार पूर्ववत् सुरू केले.

अमेरिकेंतील चळवळ जरा शांत झाली असें पाहतांच तेथील इंग्रजी अधिकाऱ्यांस वाटलें, आपल्या लष्करी अंमलास नमून यांची चळवळ बंद पडली आहे व त्याप्रमाणें ग्रेनव्हिलला त्यांनीं मोठ्या प्रौढीनें कळविलें कीं, "अराजकतेचें बीज पार नाहींसें होऊन सर्व चळवळ थंड झाली.

परंतु हा त्यांचा भ्रम लवकरच दूर झाला. मॅसॅच्युसेटस् संस्थान या युद्धांत नेहमींच पुढाकार घेणारें, त्यानें इतर संस्थांनाबरोबर ब्रिटिश मालावरील बहिष्कार काढून टाकण्यास मान्यता दिली असली, तरी ब्रिटिश चहावर बहिष्कार घातलाच पाहिजे असा त्याचा दृढ निश्चय होता. तेथील मुत्सद्दी सॅम्युअल ॲडॅम्स यानें तर पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचा निश्चयच केला होता. त्यानें लोकांच्या या उत्साहाचा पुरापूर फायदा घेतला. त्यानें सर्व संस्थांचें एकीकरण करून ठिकठिकाणीं मंडळें स्थापन केलीं व त्यांच्याद्वारें सर्व सार्वजनिक गोष्टी घडवून आणूं लागला.

या धांदलींत मि. हॅचिन्सन हा मॅसॅच्युसेटस्‌चा गव्हर्नर नेमला गेला. हचिन्सन हा राजसत्तानुवादी मनुष्य होता. त्याची नेमणूक होतांच मॅसॅच्युसेटस् प्रतिनिधी मंडळींत प्रथम त्याच्या पगाराचा प्रश्न निघाला. हचिन्सननें सांगितलें, "यापुढें माझा पगार खुद्द सरकारकडून मला मिळणार असल्यानें मंडळाकडून मला पगाराची अगर भत्त्याची अपेक्षा नाहीं." मंडळानें हा त्याचा डाव ओळखला. त्यानें पगार घेण्याचें नाकारलें म्हणजे अर्थात् याच्यावरील आपली सत्ता कमी होईल ही गोष्ट मंडळानें ओळखून त्यानें या गोष्टीस संमति दिली नाहीं. परंतु यापेक्षांही पुढील गोष्टीनें लोकमत जास्तच खवळलें.

हचिन्सन व त्याचा मदतनीस ऑलिव्हर यानें विलायतेंत मंत्रिमंडळास पत्रें पाठवून लोकांबद्दल, लोकांच्या पुढाऱ्यांबद्दल भलभलताच मजकूर कळविला व सरकारनें आपलें धोरण जरा कडक ठेवावें अशी सूचनाही केली. कर्मधर्मसंयोगानें हा सर्व पत्रव्यवहार डॉ॰ फ्रँक्लीन-अमेरिकेचा वकील म्हणून तेथें होता

त्याच्या हातीं पडला. त्यानें तो सर्व पत्रव्यवहार बोस्टनला परत पाठविला व बोस्टन येथें प्रतिनिधीमंडळांच्या सभेंत तो सर्व वाचून दाखविण्यांत आला. यामुळें लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें; व लोकांनीं राजाला अर्ज करून हचिन्सन व ऑलिव्हर येथून कायमचे कमी करावें म्हणून मागणी केली.

असा प्रकार इकडे चालला आहे तों ऱ्होड बेटांतील 'स्वातंत्र्य-पुत्रांनीं' दुसरी एक घटना बनवून आणली. तेथें कर वसूल करणारीं सरकारी जहाजें होतीं तीं काबीज करून तीं जाळून टाकिलीं. हें काम कोणी केलें तें कळविणारांस सहाशें पौंडाचें बक्षीस लावण्यांत आलें. परंतु गुन्हेगारांचा पत्ता लागला नाहीं. तेव्हां सरकारनें रागानें एक कायदा पसार करून घेतला कीं, या गुन्ह्यांत जे कोणी अपराधी असतील ते सर्व पकडून चौकशीसाठीं इंग्लंडला त्यांची रवानगी करण्यांत यावी.

इकडे बहिष्कार-अस्त्राचा इतका विलक्षण परिणाम झाला कीं, ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार अजिबात बसून एक कोटी सत्तर लक्ष पौंड चहा नुसता वखारींत पडून राहिला. कंपनीनें सरकारकडे पुष्कळ तक्रारी केल्यामुळें सरकारनें इंग्लंडची चहावरील निर्गतीचा कर माफ केला व अमेरिकेंत जाणाऱ्या चहावर एका पौंडास तीन पेन्स याप्रमाणें कर लादला.

सरकारला अमेरिकन प्रकृतीचें योग्य निदान झालें नव्हतें. यासंबंधानें डॉ. फ्रँक्लिन एके ठिकाणीं म्हणतो, " ब्रिटिश मंत्रिमंडळास असा भ्रम आहे कीं, अमेरिकन स्वातंत्र्य चहावरील तीन पेन्सांनीं आपणांस मिळविता येईल. पण लोकांच्या मनोवृत्ति त्यांना बरोबर समजल्याच नाहींत ! " याच धामधुमींत चहाचीं जहाजें बोस्टन बंदरांत येऊन दाखल झालीं. देशांत पुनः खळबळ सुरू झाली. हस्तपत्रकांना पूर लोटला. ' देशबंधू मित्र हो, अत्यंत तुच्छ चहाचा रोग पुनः येऊं घातला आहे. या जुलुमाचा प्रतिकार करण्यास सिद्ध व्हा ! अशा प्रकारचीं हजारों हस्तपत्रकें प्रसिद्ध होऊं लागलीं. आणि शेंकडों जाहीर सभा भरूं लागल्या.

चहा उतरूंच द्यावयाचा नाहीं असें एकमतानें ठरलें. ज्यांनीं माल मागविला होता त्यांस तो परत करण्याविषयीं कळकळीच्या विनंत्या करण्यांत आल्या। लोकमत असें विरुद्ध असतांच सरकारनें तारीख १७ रोजीं जबरदस्तीनें बंदरांत

चहा उतरविण्याचें ठरविलें असल्याची बातमी उठली. त्याबरोबर लोकांनींहि आपला निश्चित मार्ग ठरविला.

तारीख १६ रोजीं रात्रीं पंचवीस तरुण इंन्डियन्ससारखा वेष धारण करून जहाजावर गेले व शांतपणानें माल उतरूं लागले. सर्व माल उतरला व तेथेंच स्वच्छ चंद्रप्रकाशांत समुद्रास अर्पण केला. सर्व संस्थानांनीं कमी अधिक प्रमाणांत हाच धडा गिरविला.

इंग्लंडमध्यें ही बातमी समजतांच राजापासून रंकापर्यंत सर्व देश खवळून गेला. अत्यंत कडक स्वरूपाचे पांच कायदे ताबडतोब पसार करण्यांत आले. विरोध फक्त बर्कनें केला. परंतु त्याच्या म्हणण्याकडे लक्ष देण्यास क्रोधांध राष्ट्रास सवडच नव्हती! ईस्ट इंडिया कंपनीचें सर्व नुकसान भरून मिळेपर्यंत बोस्टनचें बंदर बंद करण्यांत आलें. मॅसॅच्युसेटस्ला दिलेले हक्क रद्द करण्यांत आले; व यापुढें राजानें नेमलेल्या अधिकाऱ्यांनीं तेथील राज्यव्यवस्था पहावी असें ठरविण्यांत आलें. गांवचे शेरीफ वाटेल तेव्हां बदलणें, काढून टाकणें याबद्दल सर्व अधिकार या सरकारनियोजित अधिकाऱ्यांच्या हातीं देण्यांत आले. सभाबंदीचा कायदा पसार करण्यांत आला. सर्व मॅसॅच्यूसेटस् संस्थानभर लष्करी छावण्यांचे तळ पडले. या सर्वांवर कडी म्हणजे तेथील मुलकी गव्हर्नर काढून त्याच्या जागीं जनरल गेज नांवाचा लष्करी मनुष्य गव्हर्नर नेमण्यांत आला.

मे १७७४ मध्यें जनरल गेज हा पुष्कळसें सैन्य घेऊन बोस्टन येथें उतरला व कायद्यांची बजावणी करण्यास त्यानें एकदम सुरुवात केली. लोकांनीं एकदम संप पुकारून बोस्टनमधील सर्व व्यवहार बंद पाडला. त्यांनींही प्रतिकार करण्यासाठीं कमर कसून इतर सर्व संस्थानांस मदत करण्याबद्दल विनंति केली व सर्व संस्थानांनींही मॅसॅच्युसेटसूला सर्व प्रकारें मदत करण्याचें अभिवचन दिलें.

या सर्व प्रकाराचें जेफरसन् यानें थोडक्यांत पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:— "वसाहतींवर सर्व बाजूंनीं कर लादण्यांत आले, सनदा रद्द करण्यांत आल्या, कायदेमंडळें उध्वस्त केलीं; व्यक्तिगत स्वातंत्र्य हिरावलें गेलें, ज्यूरीची पद्धत बंद केली, लोकांस वाटेल तेव्हां हद्दपार करण्यांत येऊं लागलें, व त्यांचा न्याय परकीय न्यायाधिशांपुढें होऊं लागला. त्यांच्या न्यायाभिक्षेकडे सर्वतोपरी दुर्लक्ष करण्यांत आलें. सर्व जगभर नादान, नामर्द म्हणून त्यांची दुष्कीर्ति करण्यांत

आली, व सैन्याच्या जोरावर राजनिष्ठा स्थापन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला, अशा स्थितींत लोकांनीं काय करावें ? त्यांनीं अर्थातच शस्त्रग्रहण केलें, व सर्व संस्थानांची संघटना करून आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें.

या सर्व परिस्थितीचा विचार करून काय धोरण स्वीकारावें हें ठरविण्यासाठीं फिलाडेल्फिया येथें एक कॉंग्रेस भरविण्याचें ठरविण्यांत आलें. गव्हर्नरला ही हकीगत समजतांच त्यानें कॉंग्रेस उधळून लावण्यासाठीं आपला हस्तक तेथें पाठविला. परंतु अत्यंत धूर्त सॅम ॲडॅम्सच्या युक्तीमुळें हाही डाव फसला. कॉंग्रेसनें सरकारच्या सर्व जुलुमी कृत्यांचा निषेध करून या सरकारची जो कोणी नोकरी करील तो देशाचा, देवाचा व स्वातंत्र्याचा शत्रू समजण्यांत येईल असा ठराव पास करण्यांत आला.

या कॉंग्रेससंबंधानें लंडनमध्यें दार्टमौथच्या अर्लनें एका अमेरिकन गृहस्थाला विचारलें, " काय हो, कॉंग्रेसला किती सभासद जमले होते ? " तो म्हणाला, " बावन. " सरदार म्हणाला. " हा तर पत्त्यांचा एक डाव झाला. त्यांत गुलाम किती आहेत ? " अमेरिकन म्हणाला, " आमच्यांत गुलाम तर कोणीच नाहींत. दरबारी पत्त्यांत गुलाम असतात. " कॉंग्रेसनें राजाला अत्यंत नम्रतापूर्वक पुनः एक अर्ज पाठविला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां कॉंग्रेसनें निर्गत प्रतिबंधकमंडळ स्थापन करून तें काम व्यवस्थित करण्यासाठीं एक कमिटी नेमली. सर्व सभासदांनीं या योजनेवर सह्या केल्या. देशांतून कोणी चोरून बाहेर माल पाठविलो कीं काय हें पाहण्यासाठीं नेमलेल्या कमिटीनें आपलें काम अत्यंत चोख रीतीनें बजावलें. लवकरच कमिटीचा व्याप सर्व देशभर पसरून तिच्यांत एक प्रकारचें सामर्थ्य उत्पन्न झालें.

सर्व प्रकारच्या चैनीच्या गोष्टींना उदाहरणार्थ नाटकें, नाच-खेळ, घोड्यांच्या शर्यती वगैरेंना फांटा देण्यांत आला. स्वातंत्र्यासाठीं आपल्या सुखोपभोगांचा त्याग करणारा मनुष्य देशभक्त समजला जाऊं लागला.

लोकांनीं अशा प्रकारानें सर्व प्रकारच्या योग्य, कायदेशीर व सनदशीर मार्गांचें अवलंबन केलें; परंतु त्याचा कांहीं एक उपयोग होत नाहीं, असें सिद्ध झाल्या-वरच त्यांस नाइलाज त्यानां म्हणून शस्त्रधारण करावें लागलें.

अमेरिकन देशभक्तांनीं अन्यायाचा व जुलुमाचा अशा प्रकारें विरोध चालविला असतां बिलायतसरकारनें तेथें कशा प्रकारची दडपशाही चालविली, हें आतांपर्यंत

उद्धृत केलेल्या हकीगतीवरून दिसून येईलच. अमेरिकन देशभक्तांस अशा प्रकारचा प्रतिकार फक्त बाहेरूनच होता असें नाहीं, त्यांच्या खुद्द घरांतही कित्येक घरभेदे होतेच. त्यानां स्वातंत्र्य वगैरे कल्पनाच हास्यास्पद वाटत होत्या. आपणांस इंग्रजांच्या साहाय्याशिवाय स्वतंत्र रीतीनें राज्यकारभार करतांच येणें शक्य नाहीं, अर्थात् ते सांगतील त्याप्रमाणें वागणें हेंच आपणांस इष्ट आहे व त्यांस सर्वतोपरी मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे, अशाबद्दल त्यांनीं उघड उघड चळवळ चालविली. इतकेंच नव्हे तर जनरल गेज ज्या वेळीं ससैन्य बोस्टन येथें उतरला, त्या वेळीं या मवाळ मंडळीनें त्यांचें मोठ्या समारंभानें स्वागत करून त्यांस एक मानपत्र अर्पण केलें, व त्याजकडून ग्रेटब्रिटनशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवूं नये व जीं संस्थानें तसा संबंध ठेवतील त्यांच्यावर बहिष्कार घालावा, अशा सॉलेम लीग ॲण्ड कॉव्हेनंटनें केलेल्या ठरावावर कोणीही सही करूं नये, केल्यास तो राजद्रोही समजला जाईल, असा जाहीरनामा काढविला. परंतु अमेरिकन देशभक्तांनीं याला उत्तर म्हणून ज्या मवाळांनीं गेजच्या मानपत्रावर सह्या केल्या होत्या त्यांचीं नांवें प्रसिद्ध केलीं व त्यांचा जाहीरनामा धाब्यावर बसविला. यामुळें मवाळांची स्थितिमात्र अत्यंत शोचनीय झाली, सर्व लोकांनीं त्यांच्यावर बहिष्कार घातला. त्यांना मजूर मिळेना, त्यांचें धान्य कोणी दळीना, त्यांस परीट मिळेना, न्हाव्यांनीं त्यांच्या हजामती करण्याचें सोडलें, बाजारांत त्यांना एक पैचाही माल मिळेना. सर्व लोकमत त्यांच्याविरुद्ध खवळलें. यानंतर मवाळांनींही आपल्या स्वभावाचें चांगलेंच प्रदर्शन केलें. त्यांनीं बोस्टन येथील लष्करी तळावर हजारों हस्तपत्रकें वांटलीं, व त्यांत लष्करी लोकांना चिथावणी देऊन बंड करण्यास कोण लोक प्रवृत्त झाले त्यांची नांवनिशीवार यादी देऊन बंडास सुरुवात होतांच या लोकांना कंठस्नान घालून त्यांचीं घरेंदारें उध्वस्त करा अशी त्यांस विनंति केली.

अमेरिकन देशभक्तांस त्यांच्या घरच्याच मंडळींकडून कसा प्रतिकार होत होता याची कल्पना वाचकांस वरील हकीगतीवरून येईल. परंतु अमेरिकन देशभक्त अशा प्रतिकारानें कर्तव्यच्युत झाले नाहींत. त्यांस खराखुरा राष्ट्रोद्धार करावयाचा होता; व म्हणूनच देशांतील सर्व मनुष्यांनीं अमुक एक अटी पाळल्या तर मी स्वातंत्र्ययुद्ध पुकारीन तोंपर्यंत स्वस्थ बसेन अशी कर्तव्यशून्यता दर्शविणारी वल्गना त्यांनीं केली नाहीं. व्यक्ति तितक्या प्रकृति या

मनुष्यस्वभावाची पारख त्यांना पूर्ण झालेली होती. मनुष्यस्वभाव पूर्ण लक्षांत घेऊन मगच त्यांनीं कार्यास हात घातला. देशांतील बहुजनसमाज आपल्या उद्दिष्टास अनुकूल झाल्यास तो अवश्य पाहिजे, परंतु तसा तो होईपर्यंत वाट पहात बसणें ही गोष्ट कर्तव्यशून्यतेचें एक लक्षण असें इतिहासकारांनीं ठरविलें असून, अमेरिकेचा इतिहास अशीच साक्ष देत आहे. अमेरिकन देशभक्त सर्व अमेरिका खंड आपल्या मताचें झाल्यानंतर मग आपण स्वातंत्र्ययुद्ध पुकारूं अशा कल्पनेंत बसले असतें, तर त्यांची स्वातंत्र्य इच्छाही कल्पनासृष्टींतच राहिली असती. मनुष्यस्वभाव लक्षांत घेऊनच मग कार्यकर्त्यानें अशा प्रचंड कार्यांत हात घालावयाचा असतो, अशा अडचणींतून मार्ग काढून आपलें उद्दिष्ट साध्य करणारा मनुष्यच महत्पदास पोहोंचतो, व स्वातंत्र्यपथ अत्यंत बिकट समजला जातो तोही या कारणासाठींच! सर्व जग माझ्या मताचें झाल्यावर मग मी अमुक करीन ही बढाई अगदीं पोकळ, अर्थहीन व कर्तव्यशून्यता दर्शविणारी आहे. अमेरिकन इतिहासानें या विधानास सर्वथैव अनुकूल अशी साक्ष दिली आहे.

अमेरिकेनें स्वातंत्र्ययुद्ध पुकारतांच, खुद्द स्वातंत्र्ययुद्धांत अमेरिकेच्या बाजूनें लढणाऱ्या देशभक्तांपेक्षां, शत्रुसैन्याच्या बाजूनें लढणाऱ्या देशद्रोही अमेरिकनांची संख्याच जास्त होती, असें खुद्द इंग्लिश इतिहासकार सांगतात. अशा सर्वथैव प्रतिकूल परिस्थितींतून मार्ग काढून अमेरिकन देशभक्तांनीं स्वराज्यसंस्थापना केली, म्हणूनच त्याचें महत्त्व!

कितीही अर्ज केले, शिष्टमंडळें पाठविलीं, तरी त्यांचा कांहीं एक उपयोग होत नाहीं. दिवसेंदिवस जुलुमाची चढतीच कमान होत आहे असें पाहून या सर्व परिस्थितीचा विचार करून एकदां सोक्षमोक्ष लावण्यासाठीं फिलाडेल्फिया येथें दुसरी कॉंग्रेस बोलाविली. निर्गतप्रतिबंधकमंडळानें ठरावाची जास्त कडक रीतीनें बजावणी करावी व कोणत्याही ब्रिटिश सैनिकाला अगर अधिकाऱ्याला कोणी कसलीही मदत केल्यास तो मनुष्य देशद्रोही समजण्यांत यावा, अशा प्रकारचे ठराव पास करून स्वयंसैनिकांच्या सैन्याचा मुख्याधिपति व्हर्जिनियाचा जॉर्ज वॉशिंग्टन यास नेमण्यांत आलें.

सर्व देशभर स्वदेशाभिमानाची ज्योत पेटविण्यास 'स्वातंत्र्यपुत्रां'नीं अमोलिक मदत केली. टॉमस पेन या सुप्रसिद्ध लेखकानें 'कॉमन सेन्स' या नांवाचें पुस्तक लिहून इंग्लंडपासून विभक्त होणें हेंच इष्ट कसें आहे, हें मुद्देसूदपणें लोकां-

पुढें मांडलें. लोकमत स्वातंत्र्यवादी मतांना अनुकूल होऊं लागलें. अशा प्रकारची अनुकूल स्थिति उत्पन्न होऊं लागली असें पाहतांच, अमेरिकन वसाहतींनीं ग्रेटब्रिटनशीं आपला संबंध तोडून स्वातंत्र्य जाहीर करावें असा ठराव कॉंग्रेसपुढें आला. या ठरावास पहिल्यानें बहुमत अनुकूल होईना. अशा स्थितींतच व्हर्जिनियानें तारीख ७ जून १७७६ रोजीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. व्हर्जिनियाचें हें धाडस पाहतांच दुसरीं बारा संस्थानें त्याला अनुकूल झालीं; व सर्वांनीं मिळून एक स्वातंत्र्याचा जाहीरनामा काढण्याचें ठरवून त्यासाठीं एक कमिटी नेमली. कमिटीनें तयार केलेला जाहिरनामा 'अमेरिकन स्वातंत्र्याचा जाहीर-नामा,' म्हणून स्वतंत्रतेच्या इसिहासांत सुप्रसिद्ध आहे. तारीख ४ जुलै १७७६ रोजीं हा जाहिरनामा कॉंग्रेसनें मान्य केला व बारा संस्थानच्या प्रतिनिधींनीं अत्यंत गंभीरपणानें त्यावर सह्या करून 'अमेरिका स्वतंत्र झाली' हें जगास जाहीर केलें!

अमेरिकेनें हा कागदी ठराव केला असला, तरी खरें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांस रक्ताच्या नद्याच वाहवाव्या लागल्या आहेत, व खऱ्या झट-पटीस येथपासूनच सुरुवात झाली. स्वातंत्र्यपुत्रांच्या अश्रांत खटपटीनें शेंकडों स्वयंसैनिक गोळा होऊं लागले. परंतु त्यांजवळ ना हत्यार, ना दारूगोळा, ना धड अंगावर वस्त्र, कीं पोटभर अन्न! अशा सैनिकांच्या बळावर हे स्वातंत्र्य-वादी ओर देश स्वतंत्र करणार! अशी मवाळ लोक हेटाळणी करूं लागले. इंग्रज सैनिक अतुल पराक्रमी, त्रिखंडांत लढाया मारून तयार झालेला, त्याच्याशीं हीं कोंवळीं पोरें लढणार! ही कल्पनाच त्यांना हास्यास्पद वाटली. कॉर्नवालिस, होवे यांसारखे कसलेले ग्रेटब्रिटनचे वीर व युद्धसामुग्रीही मनमुराद अशा स्थितींत अमेरिकन देशभक्तांचा टिकाव लावणेंही कठिण, असाच लोक-समज त्या वेळीं प्रचलित होता. इंग्लिश सैनिकांशिवाय अमेरिकन मवाळांचें सैन्य पंचवीस हजार, युरोपांतून आलेले हेसियन्स नांवाचे तीस हजार भाडोत्री सैनिक व याखेरीज तेथील रहिवाशी इंडियन्स यांचें व वसाहतवाल्यांचें सख्य कधींच नव्हतें, तेही ब्रिटिशांना सामील झाले. इतक्या विरुद्ध परिस्थितींत अमे-रिकनांनीं स्वातंत्र्ययुद्ध पुकारलें, व अल्पावधींतच युरोपच्या कसलेल्या वीरांना अमेरिकेच्या कच्च्या सैनिकांनीं असा खरपूस चोप दिला कीं, सर्व युरोपभर त्यांची नाचक्की होऊं लागली. लेक्सिंगटन येथें अगदीं प्रथमच अमेरिकन शेतकऱ्यांनीं या कसलेल्या वीरांचा असा धुव्वा उडविला कीं, ज्या वेळीं ते पळत

आपल्या तळावर गेले त्या वेळीं त्यांचीं तोंडें वासून त्यांतून जिभा बाहेर लोंबू लागल्या होत्या, असें इतिहासकारांनीं वर्णन केलें आहे.

या स्वातंत्र्ययुद्धांत स्वातंत्र्यपुत्रांप्रमाणेंच स्वातंत्र्यकन्यामंडळानेंही अमोलिक मदत केली. दारुगोळा पाडणें, अन्नसामुग्री पोहोंचविणें, जखमी वीरांची शुश्रूषा करण हीं कामें त्यांनीं अत्यंत मनोभावें केलीं. अमेरिकेच्या या स्वातंत्र्ययुद्धांत, इंग्लंडच्या जुलुमास व अन्यायास वैतागून देशत्याग केलेल्या आयर्लंडच्या देशभक्तांची फारच मदत झाली. त्याचप्रमाणें कित्येक स्वयंसैनिक आपण होऊन या युद्धांत दाखल झाले. अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध-कथा सर्वच रमणीय व स्फूर्तिदायक असली, तरी ती आज येथें द्यावयाची नसून हिंदुस्थानांत आज सुरू असलेल्या चळवळीशीं तिचें कोठें साम्य आहे, हेंच प्रामुख्यानें दाखविण्याचा मानस होता. यापुढील युद्धकांड रमणीय असल्यानें वाचकांनीं इतिहासाची मदत घेऊन आपली जिज्ञासा तृप्त करून घ्यावी. अमेरिकेवर अत्यंत जुलमाचे व अन्यायाचे कायदे लादल्यानें ग्रेटब्रिटनला तीस लक्ष चौरस मैल मुलूख सोडावा लागला, हजारों लोकांचें रक्त खर्ची घालावें लागलें लागलें, व अलोट पैशाचा चुराडा करावा लागून शेवटीं अमेरिकेचें स्वातंत्र्य मान्य करावें लागलें व जगभर नाचक्की झाली ती वेगळीच.

भरती-ओहोटीच्या नियमाप्रमाणें अमेरिकन देशभक्तांस कधीं जय तर कधीं पराजय सोसावे लागले. तथापि शेवटीं ते विजेते होऊन ता. ३ सप्टेंबर १७८३ रोजीं व्हर्सेलिस येथील तह होऊन 'अमेरिका' स्वतंत्र झाली. या गोष्टीस जगानें संमति दिली.

---

## हिंदुस्थान व अमेरिका.

अमेरिकन राज्यक्रांतीचा इतिहास हिंदी राजकारणाच्या अभ्यासकांना अनेक प्रकारें मार्गदर्शक होणारा आहे व त्याचा त्रोटक इतिहास आतांपर्यंत निवेदन केला लोकांचे जन्मसिद्ध हक्क पायाखालीं तुडवून त्यांच्या संमतीखेरीज त्यांच्यावर जे कर लादले जातात, त्या अन्यायाचा प्रतिकार करणें हें सर्व राज्यक्रान्त्यांच्या इतिहासांतील मूळ बीज आहे. अमेरिकन लोक आपला मायदेश सोडून दूर देशीं आले. तेथें सुखानें कालक्रमणा करितां येईल, ही त्यांची अपेक्षा इतक्या दूर ठिकाणीं गेले तरीही सिद्धीस न जातां, इंग्लंडचा खर्च

भागविण्यासाठीं जेव्हां अमेरिकेवर कर लादण्यांत आले, तेव्हां असंतोषानें पेट घेऊन त्यांत इंग्लंडच्या साम्राज्यसत्तेची आहुति पडली. अमेरिकेच्या अभ्युदयाचा सर्वच इतिहास जित राष्ट्रांना सदैव मार्गदर्शक होण्यासारखा आहे. विशेषतः अमेरिकन लोकांनीं इंग्लंडला वठणीवर आणण्यासाठीं प्रथम जे उपाय योजिले त्यांचें आपल्या येथील प्रचलित असहकारितेच्या चळवळीशीं पुष्कळ अंशीं साम्य आहे.

अमेरिकन लोकांनीं प्रथम अर्ज केले, जाहीर सभांतून निषेध केले, इंग्लंडला शिष्टमंडळें पाठविलीं, परंतु इंग्लंडाची द्रव्यतृष्णा शांत होण्याचें किंचितही चिन्ह न दिसल्यानें, व दिवसेंदिवस जुलमी कर लादण्याचें काम जोरानें व लष्करी अंमलाखालीं सुरू झाल्याचें पाहतांच, अमेरिकन लोकांनीं प्रथम निःशस्त्र चळवळ हातीं घेऊन, विलायती मालावर कडकडीत बहिष्कार "even at sacrifice" घालण्याचें ठरविलें. त्यांनीं बहिष्कार हा राजकीय अस्त्र म्हणून उपयोगांत आणिला. त्यांच्या भाषेंत बहिष्कारासंबंधीं 'as far as possible' हे शब्दच नव्हते. इतकेंच नव्हे, परंतु इंग्लंडनें चालविलेले जुलूम व अन्याय दूर करण्यासाठीं ज्या वेळीं त्यांनीं हें बहिष्कार अस्त्र हातीं घेतलें, त्या वेळीं तें अत्यंत परिणामकारी कसें होईल व त्यांची चोंहोंकडून नाकेबंदी कशी करतां येईल, अशा धोरणानें त्यांनीं त्याचा उपयोग केला. विलायती मालावरील बहिष्कारांत त्यांना अहिंसेची हिंसा झाली असें कोठेंही आढळून आलें नाहीं. उलट निःशस्त्र-प्रतिकाराचें युद्ध करणें असल्यास प्रजेच्या हातीं एकटें एकच उरलेलें बहिष्कार अस्त्र, त्याचा पूर्णपणें उपयोग केल्यास तें परिणामकारक ठरलेंच पाहिजे असें अमेरिकेनें स्वतःच्या उदाहरणानें जगाच्या निदर्शनास आणून दिलेलें आहे अमेरिकेच्या बहिष्कारानें इंग्लंडच्या व्यापाऱ्यांचीं तोंडें वांसून गेलीं. कित्येकांचीं दिवाळीं वाजलीं. देशांत हाहाःकार उडाला. तेव्हां तात्पुरता कां होईना पण स्टँप ॲक्ट रद्द करण्यांत आला. या अल्प विजयानें अमेरिकन लोक उगाच फुशारून मात्र गेले नाहींत. त्यांच्या-वर नवा लादण्यांत आलेला चहावरील कर याची त्यांनीं काय स्थिति केली ती पाहण्यासारखी आहे. त्यांनीं चहावर पूर्ण बहिष्कार तर घातलाच; पण देशांत चहा उतरूंही दिला नाहीं. स्वदेशीची चळवळ चालवितांना अमेरिकन लोकांनीं अत्यंत कष्ट सोसले आहेत. लोंकरीचे कपडे तयार करण्यास मुबलक लोंकर पाहिजे, यासाठीं त्यांनीं मेंढरें मारण्याचें सोडून दिलें. देशांत सर्वत्र चरखे सुरू झाले, व या स्वदेशी व्रताचा प्रसार करण्यासाठीं, स्वातंत्र्य-पुत्र व स्वातंत्र्य-कन्या

या दोन स्वयंसेवक मंडळांनीं अतिशय परिश्रम केले. त्यांनीं या बहिष्काराच्या कामासाठीं स्थापन केलेल्या संघाचा उपयोग, त्यांना स्वातंत्र्ययुद्धाचे वेळीं फारच झाला. स्वदेशी व बहिष्कार प्रसारार्थ अमेरिकेनें केलेलें प्रयत्न आजच्या आपल्या चळवळींत पुष्कळ उपयोगी पडण्यासारखे आहेत. नसत्याच गोष्टींत हिंसा—अहिंसा वाद उत्पन्न करणें, कांहींच काम न करण्याचें-न करत्याचा वार शनिवार या म्हणीप्रमाणें-एक लक्षण आहे इतकेंच. व्यावहारिकदृष्ट्या बहिष्कारांत अहिंसा-वाद उत्पन्न करणें ही गोष्ट अत्यंत हास्यास्पद आहे

कडकडीत बहिष्काराप्रमाणेंच हिंदी लोकांनीं दुसरीही एक गोष्ट करावयास पाहिजे. ती ही कीं, अमेरिकन लोकांनीं विलायती मालावर नुसता बहिष्कारच घातला नाहीं, तर अमेरिकेंतून इंग्लंडला कसलाही माल, धान्य वगैरे, पाठवावयाचा नाहीं असें ठरवून त्या कामासाटीं ( Anti-exportation league ) निर्यात-प्रतिबंधक मंडळ, नांवाचा एक संघ स्थापन करून त्याच्या शाखा सर्व अमेरिकाभर पसरविल्या. कसल्याही प्रकारचा माल परदेशांत पाठवावयाचा नाहीं हा त्यांनीं निर्बंध घालून, एकादें संस्थान या टरावाच्या विरुद्ध गेल्यास त्याच्यावरही या ठरावाची अंमलबजावणी करण्यांत येऊन, त्याचीही नाकेबंदी करण्यात येईल, असें जाहीर करण्यानें हा ठराव अत्यंत सुपरिणामी झाला. हिंदुस्थानांत आज विलायती मालावर बहिष्कार घालण्याची भाषा बोलण्यानेंही अहिंसेचे खून पडूं लागले आहेत, तेथें हा दुसऱ्या प्रकारचा बहिष्कार किती पसंत पडतो हा प्रश्नच आहे. परंतु हा अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे. हिंदुस्थानांत अद्यापिही अशा दुष्काळाच्या स्थितींत तेथल्या लोकांस पुरेसें अन्न पिकतें. परंतु तें हिंदी लोकांच्या तोंडीं न पडतां दुसऱ्या लोकांच्या तोंडीं जाऊन पडतें व येथील लोक मात्र भुकेनें व्याकूळ होऊन पटापट प्राण सोडीत आहेत. विलायती मालावरील बहिष्काराप्रमाणेंच निर्यात प्रतिबंधाची चळवळ हातीं घेतल्यास खेडे-गांवापर्यंत काम करण्याची संधी येऊन, अगदा सामान्य लोकासही चळवळीचे अनुकूल परिणाम प्रत्यक्ष अनुभवण्यास सांपडतील. हें कामच असें व्यापक व इष्ट फलदायी आहे. हा प्रश्न काँग्रेसनें हातीं घेतल्यास देशांत हल्लींच्या स्थितींत फारच उपकारक ठरणार आहे.

देशांतील प्रत्येक मनुष्य कांहीं विवक्षित अटी पाळून तयार झाला म्हणजे मग स्वातंत्र्याच्या गोष्टी बोलूं या गोष्टीस जगांतील कोणत्याही इतिहासानें

संमति दिली नाहीं; पण हिंदुस्थानांत मात्र अशा गोष्टी बोलल्या जात आहेत. रक्तमांसानें बनलेल्या मनुष्य प्राण्याशीं, त्याची एकंदर मनोरचना लक्षांत घेऊन वागलें पाहिजे, ही गोष्टच आमच्यांतील कित्येक पुढारी विसरतात. व्यक्ति तितक्या प्रकृति! प्रत्येकांत कांहींना कांहीं मतभिन्नता येणारच. अशा स्थितींत देशांतील सर्व मनुष्यें तयार झाल्याखेरीज अमुक कार्य करतां येणें शक्य नाहीं, असें ठरल्यास पृथ्वीच्या अंतापर्यंत वाट पाहिली पाहिजे. प्रतिकार होणारच. घरून होणार, बाहेरून होणार, हें लक्षांत ठेवून कार्यकर्त्यानें आपला मार्ग आंखावा लागतो. व या सर्व मनुष्यप्रकृतीचें योग्य निदान लक्षांत घेऊन जो मार्ग आंखतो तोच खरा पुढारी समजला जातो. अमेरिकेंत स्वातंत्र्य-युद्धाच्या वेळीं खुद्द अमेरिकन मवाळ इंग्लंडच्या वतीनें स्वातंत्र्यभक्तांशीं लढण्यास, तयार झाले, व त्यांची संख्या अमेरिकन देशभक्तांच्या तिप्पट होती असें इतिहासकारांनीं लिहून ठेवलें आहे. जनरल लाफयर यांनीं जनरल वॉशिंग्टनला एका पत्रांत लिहिलें कीं: "अमेरिका तिच्या पुत्रांच्या हातूनच बुडणार: मी युरोपमध्यें असतांना मला वाटे, प्रत्येक अमेरिकन मनुष्य स्वातंत्र्यासाठीं प्राण-समर्पण करण्यास सिद्ध झालेला आहे. पण वस्तुस्थिति मात्र निराळीच दिसते." वॉशिंग्टननें त्याला पाठविलेलें उत्तर संस्मरणीय आहे. तो लिहितो, "एवढ्या प्रचंड कार्यांत कवडाशाखेरीज जास्त कांहीं प्राप्त होईल अशी अपेक्षाच करणें कामां नये.

अमेरिकेच्या स्वातंत्र्य-इतिहासानें एकच गोष्ट शिकविली. स्वातंत्र्य-पक्ष अत्यंत निरुद्ध, अडचणीचा, कांटेरी असून मध्यंतरीं नाना संकटेंही कोसळून पडतील; त्यावरून जाऊं इच्छिणाऱ्या मनुष्यांत चिकाटी, उत्साह व अलौकिक धैर्य पाहिजे. स्वतंत्र्याच्या नुसत्या व्याख्येवर विश्वास असल्यानें देश स्वतंत्र होत नसतो. उगाच वाष्कळ वल्गना करण्यापेक्षां प्रचंड आत्मविश्वास असला म्हणजे हातून मोठमोठीं कार्यें घडून येतात. स्वातंत्र्याचा ठेवा हा धीर वीर व उद्योगी पुरुषांसाठीं आहे.

—२—

# हंगेरीचें पुनरुत्थान.

Woe to the nation who raises no protest when its law is outraged! It contributes to its own slavery by its silence. The Nation which submits to injustice and oppression without protest is doomed.

*Francis Deak.*

तुर्की साम्राज्याच्या अर्धचंद्राची युरोपांतून हकालपट्टी अठराव्या शतकाच्या प्रारंभापासून होऊं लागली. त्याच वेळीं ऑस्ट्रिया व हंगेरी यांनीं एकजूट करून या वरचेवर होणाऱ्या मुसलमानी स्वाऱ्यांचा प्रतिकार केला व तुर्कांचा पराभव करून आपलें स्वातंत्र्य संपादन केलें. ऑस्ट्रिया व हंगेरी यांनीं या परकीयांच्या त्रासांतून मुक्त होण्यासाठीं जेव्हां ऐक्य घडवून आणलें त्या वेळीं उभयतांचे असे सरळ व स्पष्ट करार झाले होते कीं, स्वातंत्र्यसंपादनानंतरही दोन्ही देश एकाच बादशहाच्या छत्राखालीं राहिले; तरी उभयतांचा दर्जा समानतेचा समजून आपला अंतस्थ कारभार आपल्या सोईप्रमाणें करण्यास प्रत्येकास पूर्ण मुभा असावी. म्हणजे ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींचें मध्यवर्ती इंग्रजी सत्तेशीं जें आज नातें आहे, त्याप्रमाणें परस्पराचा संबंध असावा. परन्तु अशा शर्तीनें करारमदार ठरले तरी युरोपखंडांत राष्ट्र या नात्यानें ऑस्ट्रियाला जें महत्त्व होतें, त्याच्या शब्दाला जी किंमत होती ती हंगेरीला नव्हती; याचें कारण हेंच कीं, हंगेरीला स्वतःचा असा राजा नसून साम्राज्याची राजधानी जी व्हिएन्ना तेथून सर्व राज्यकारभार चालविला जाई. याचा स्वाभाविक असा परिणाम झाला कीं, कालांतरानें हंगेरीचें नांव कोठेंही ऐकूं येईनासें झालें. ऑस्ट्रियाच्या दरबारशीं संबंध असलेले हंगेरियन सरदार, जहागिरदार, जमीनदार हे अगदीं स्वाभिमानशून्य हांजीहांजीखोर बनून गेले होते. व या गोष्टीचा फायदा घेऊन ऑस्ट्रियन बादशहा हंगेरीच्या हक्कांकडे सहजिकच दुर्लक्ष करूं लागले. परंतु हंगेरींतील स्वातंत्र्यलालसा सर्वतोपरी नष्ट झाली नव्हती. कांहीं देशभक्तांनीं ऑस्ट्रियाचें वर्चस्व झुगारून

देण्याचा एक कट उभारला. परंतु ऐन वेळीं तो उघडकीस येऊन ऑस्ट्रियन सरकारनें या कटाचीं पाळेंमुळें खणण्याच्या उद्देशानें त्यांतील पुढाऱ्यांस फांशी-सारख्या कडक शिक्षा ठोठावल्या.

अशा रीतीनें हंगेरीच्या स्वातंत्र्याचा पहिला प्रयत्न सफल झाला नाहीं तरी ऑस्ट्रियन सरकारच्या हेतूप्रमाणें स्वातंत्र्याचे अंकुर मात्र नाहींसे न होतां हंगेरियन देशभक्तांनीं स्वातंत्र्याची ज्योत अखंड तेवत ठेविली. त्या वेळीं ऑस्ट्रियन बादशहाला युरोपांत आपल्या शेजारच्या देशाशीं हमेषा युद्धें करावीं लागत, व त्यासाठीं मनुष्यबलाचा जिवंत झरा त्यास पाहिजे असे. तेव्हां स्वाभाविकच आपल्या अंमलाखालीं असलेल्या हंगेरीनें हें मनुष्यबल पुरवावें ही ऑस्ट्रियाची अपेक्षा! जेते लोकांची ही नेहमींच अपेक्षा असते व आपली साम्राज्यलालसा तृप्त करण्याच्या कामीं जित राष्ट्रांचा ते नेहमींच असा उपयोग करीत असतात. परंतु हंगेरीची स्वातंत्र्यवृत्ति कायमची नष्ट झाली नव्हती, कांहीं स्वातंत्र्यप्रेमी लोकांनीं "हंगेरी हें राष्ट्र आहे." ही भावना जागृत ठेविली होती; व ज्या वेळीं ऑस्ट्रियन बादशहानें हंगेरींत सैन्य उभारण्याबद्दल हुकूम सोडला त्या वेळीं हंगेरियन देशभक्तांनीं लोकमत जागृत करून हा हुकूम झिटकारून लाविला व बादशहास स्पष्टपणें कळविलें कीं, 'सैन्य उभारण्याचा अधिकार फक्त आमच्या डाएटला ( लोकसभा ) आहे, इतरांचा हुकूम आम्ही मानीत नाहीं.' सतत पांच वर्षे असा झगडा चालल्यानंतर बादशहा नरम येऊन त्यानें हंगेरियन लोकसभेची निवडणूक करण्याबद्दल हुकूम दिला.

या लोकसभेच्या उद्घाटन प्रसंगीं एक अननुभूत असा प्रकार घडून आला. व त्यामुळें हंगेरियन लोकांची 'स्वाभिमानवृत्ति' जोमास लागली. अनेक वर्षे परदास्यीं कुचंबलेल्या स्वाभिमानशून्य, हांजीहांजीखोर, राष्ट्रीयत्वाला पारख्या झालेल्या, साम्राज्य सत्ताधाऱ्यांचें सर्व कांहीं उत्तम, त्यांचे आचार, त्यांचे विचार, त्यांचे पोषाक, त्यांची बोली, त्यांचे सर्व कांहीं अनुकरणीय, अशी वृत्ति असणाऱ्या लोकांस सदर प्रकार अक्षम्य राजद्रोहाच्या स्वरूपाचा वाटला. तो प्रकार म्हणजे काँन्ट झेकेनी या तरुण व श्रीमान् सरदारानें या लोकसभेंत आपल्या मातृभाषेंत भाषण केलें हा होय! व्हिएन्नाच्या दरबारांत प्रतिष्ठा मिळत असलेले हंगेरियन सरदार झेकेनीवर अगदीं रागावून गेले. हा तरुण, अप्रबुद्ध पोर अगदीं बहकला असेंच त्यांस वाटलें. मातृभाषेशीं वंचना करणें हाच गुण समजला जाई, त्या

लोकांस हा प्रकार कसा आवडावा ? परंतु त्या स्वाभिमानी वीरानें पुन्हां दुसऱ्या प्रसंगींही तोच गुन्हा ( ! ) केला. त्या प्रसंगाचें वर्णन करितांना मि. ऑर्थर ग्रिफिथ लिहितोः—

" एक क्षणमात्रच तो तरुण सरदार सभागृहाच्या मध्यभागीं तटस्थ उभा राहिला. नंतर मातृभाषेंत न बोलण्याबद्दल उपदेश करणाऱ्या सभासदांकडे नजर रोखून त्यानें आपलें तोंड उघडलें; पण काय ! त्या मुखांतून हंगेरियन भाषेचा अस्खलित प्रवाह सारखा सुरू झाला. ते दिङ्मूढ झालेले सरदार मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें मुकाट्यानें बसले तसतसा याचा आवाज चढत जाऊन सभागृहाच्या कानाकोंपऱ्यांत घुमूं लागला. तुच्छ मानलेल्या हंगेरियन भाषेंत हंगेरीच्या दुर्दैवाची कहाणी व भावी आशापट इतक्या सुंदर रीतीनें त्यानें रंगविला कीं, हंगेरियन वृद्ध गृहस्थ चकित झाले, नवयुवकांचीं अंतःकरणें त्यानें हालविलीं. आणि सर्वत्रांनीं एकमुखानें त्याचा जयजयकार केला." या प्रकारानें तरुण हंगेरियनांच्या अंतःकरणांत विलक्षण खळबळ उडून गेली. त्यांच्यांत उत्साह उत्पन्न झाला व आपलें नेतृत्व झेकेनीनें पत्करावें असे त्यांनीं प्रयत्नही केले. परंतु झेकेनीनें त्यांचें राजकीय पुढारीपण स्वीकारण्याचें नाकारलें.

झेकेनी हा खराखुरा देशभक्त होता. प्रचलित शिक्षणपद्धतीनें जनता आपलेपणास पारखी होत चालली आहे, तिच्यांत स्वाभिमान उत्पन्न करण्यास राष्ट्रीय शिक्षणाशिवाय दुसरा उपायच नाहीं, हें ओळखून त्यानें हंगेरीचें शिक्षण, वाङ्मय, शेती व उद्योगधंदे यांचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं नेटानें स्वार्थत्यागपूर्वक सुरुवात केली. राष्ट्रीय भाषेची उन्नति व अभिवृद्धि कशी करावी यासंबंधानें एकदां वादविवाद चालला असतां एक सभासद म्हणाला, ' हंगेरियन भाषावृद्धीची गोष्ट बोलणें व्यर्थ आहे व हंगेरियन युनिव्हर्सिटी काढणें तर त्याहून अशक्य आहे; या कामास पुष्कळ द्रव्यबळ लागेल, आपणाजवळ तें कोठें आहे, व शिक्षणासाठीं नवा करही सरकार बसवूं देणार नाहीं.' इतर सभासदांनाही ही गोष्ट सत्य वाटली व ते हताश झाले. इतक्यांत झेकेनी उठला व त्यानें एक मिनिट बोलण्याची परवानगी मागितली. ती मिळतांच त्यानें हंगेरींत भाषण केलें. त्याचें तात्पर्य इतकेंच कीं, ' मी एक जहागिरदार आहे, राष्ट्रीय विद्यालय स्थापन करण्यासाठीं मी आपलें एक वर्षाचें उत्पन्न देतों.' त्याचें हें भाषण ऐकतांच सभागृहांत उत्साहाची लाट उसळली. एक म्हणाला मी एक हजार

फ्लॉरिन्स देतों. दुसरा म्हणाला मी दोन हजार, मी अमुक, मी अमुक अशी अहमहमिका लागून एक लक्ष पन्नास हजार फ्लॉरिन्सची रक्कम जागच्याजागीं गोळा झाली. झेकेनीच्या या स्वाभिमानाचा व स्वार्थत्यागाचा परिणाम हंगेरियन जनतेवर बिलक्षण होऊन हंगेरियन राष्ट्रीयपक्ष दिवसानुदिवस बळावत चालला. त्याच्या प्रयत्नानें उभारलेलें राष्ट्रीय विद्यापीठ आजतागायतही अत्यंत श्रेष्ठ व महत्त्वाचें गणलें जात आहे.

या राष्ट्रीय जागृतीच्या लाटेंत राजकीय पुढारी म्हणून, फ्रॅन्सिस डीक नांवाचा एक कॅथॉलिक जमीनदार व लुईस कोसूथ म्हणून एक प्रॉटेस्टंट बॅरिस्टर असे दोघे पुढें आले. साम्राज्यांतर्गत स्वराज्य हें डीकचें ध्येय होतें. कोसूथ हा पूर्ण लोकसत्तावादी होता, व मॅझिनीच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें सर्व युरोपांतील राजसत्ता नाहींशी करून सर्वत्र लोकसत्ता स्थापतां येणें शक्य आहे असें त्यांस वाटे. डीकची विचारसरणी व्यवहार्य व हंगेरियनांच्या मनोभावनेशीं पुष्कळ मिळती असे. आस्ट्रियनांच्या वर्चस्वाबद्दल व हंगेरीच्या गुलामगिरीबद्दल तो अत्यंत सणसणीत शब्दांत निषेध करी. त्यावेळीं हंगेरींतही मवाळांचा असा एक वर्ग होताच. डीकची ऑस्ट्रियाच्या जुलुमाविरुद्ध एकदां सरबत्ती सुरू झाली कीं त्यांची मात्र अगदीं घाबरगुंडी उडे व अगदीं गयावया येऊन म्हणत, 'आपण करणार तरी काय? ऑस्ट्रियाशीं युद्ध करून स्वातंत्र्य मिळविणें ही गोष्ट शक्य नाहीं मग आहे या स्थितीपुढें नेमण्याशिवाय आपण करणार तरी काय?' डीक यावर म्हणे, 'ज्या राष्ट्राचे कायदे व हक्क तुडवले जात असतां त्याच्या निषेधार्थ एक शब्दही न उच्चारतां स्वस्थ बसतां त्याचा धिक्कार असो. अशा स्थितींत मौन धरणें म्हणजे दास्याची शृंखला पायांत जास्त दृढ बसवून घेणें आहे. जें राष्ट्र अन्यायापुढें मान नमवितें व जुलुमाचा निषेधही करीत नाहीं, त्या राष्ट्राचा अवतार संपलाच म्हणून समजावें.'

यानंतर लोकसत्तेची नवी निवडणूक झाली. तींत बहुतेक सभासद राष्ट्रीय पक्षाचे निवडून आले व त्यांनीं राष्ट्रीय शिक्षणाची निकरानें मागणी केली. ऑस्ट्रियन सरकारनें ती झिटकारून लाविली. परंतु सरकारनें ही लोकपक्षाची मागणी फेटाळून लाविली तरी लोक मात्र निराश झाले नाहींत. कोसूथनें लोकसभेंतील वादविवादाची हकीगत छापून सर्व देशभर पसरविली, त्यामुळें लोकमताचा पाठिंबा सर्वतोपरी लोकसभेला मिळाला व त्याचा परिणाम असा झाला

कीं, लोकपक्षाच्या कोसूथ वगैरे कांहा पुढाऱ्यांना लांच, मानाच्या जागा वगैरे देण्याचा प्रयत्न सरकारनें चालविला. परंतु सुदैवानें तेथें लोकपक्षांत तरी स्वदेशद्रोह करणारे लोक नसल्यामुळें सरकारचा हाही डाव फसला. हा प्रयोग फसल्यावर सरकारनें आपलें नेहमींचें दडपशाहीचें अस्त्र उपसलें. लोकपक्षाचे पुढारी, कोसूथ, झेकेनी, वसेल व जॉन बलोघ यांस पकडून मोटमोठ्या शिक्षा ठोठावल्या.

सरकारच्या या जुलमी कृत्यामुळें लोक जास्त चिडले मात्र. व लोकसभेंतील बलोघच्या रिकाम्या जागेकरितां पुन्हां निवडणूक झाली तरी लोकांनीं पुन्हां त्यासच निवडलें. या जागेकरितां सरकारनें आपला एक हस्तक उभा केला असून त्यास मत देणारांस पन्नास फ्लॉरिन्स बक्षीस लावलें होतें. तरींही प्रचंड बहुमतानें बलोघ हाच निवडून आला. लोकांनीं त्याची मिरवणूक काढली व सभागृहांत जाऊन सरकारी अधिकाऱ्यांची अत्यंत निर्भत्सना केली, व त्यांच्या लांचांच्या नोटा फाडून त्यांचे तुकडे त्यांच्यावर तोंडावर फेंकले.

यानंतर लोकसभेची पहिली बैठक भरली. त्यांत कोसूथ वगैरे पुढाऱ्यांस बिनशर्त सोडून द्यावें हीच सभेनें पहिली मागणी केली. आम्ही सर्व राजकीय कैद्यांना सोडून देतों, पण ही चळवळ तुम्ही बंद करा, असें सरकारनें सांगतांच डीकनें सरकारास उत्तर दिलें, “राष्ट्रीय जागृतीच्या चळवळींत व्यापारी देव-घेवीची भाषा नसते. माझ्या मित्रांपेक्षांही राष्ट्रकार्य अधिक महत्त्वाचें व पवित्र आहे, व अशा रीतीनें विकत घेतलेलें त्यांचें स्वातंत्र्य त्यांच्या तुरुंगांतील हालअपेष्टेपेक्षांही त्यांस दुःसह वाटेल.” डीक कोणताही तऱ्हेनें नरमत नाहीं असें दिसून येतांच, सरकारच वरमून त्यांनीं कोसूथ वगैरे पुढाऱ्यांची बिनशर्त मुक्तता केली. कैदेंतून मुक्त होतांच कोसूथनें जास्त विस्तृत प्रमाणावर वर्तमान-पत्रद्वारां लोकमत तयार करण्याचें काम हातीं घेतलें. त्याचें ‘पेस्त ग्याझेट’ हें लोकपक्षाचें मुखपत्र होऊन बसलें व तें इतकें लोकप्रिय झालें कीं, कोसूथचें मत तें जनतेचें मत ही गोष्ट अगदीं सर्वमान्य होऊन बसली.

राष्ट्रीयपक्षानें यानंतर आपल्या दोन मागण्या पुढें केल्या; (१) ऑस्ट्रियन लोकांइतकेच कर, व (२) हंगेरियन भाषेस साम्राज्यसरकारांत मान. सरकारनें ही दुसरी मागणी ताबडतोब कबूल केली; परंतु पहिली साफ नाकारली. समान हक्कानें वागवावयाचें तर मग तें जित राष्ट्र कसलें, याच भावनेनें ही मागणी

नाकारली गेली. लोकमत यामुळें जास्तच क्षुब्ध झालें; व सरकारच्या या उत्तरावर तोड म्हणून कोसूथनें स्वदेशीची चळवळ सुरू केली. देशी उद्योगधंद्यांचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं हंगेरियन औद्योगिक व व्यापारी संघ स्थापन केला; व या संघामार्फत इतकी प्रचंड चळवळ करण्यांत आली कीं, ऑस्ट्रियन नोकरशाहीच्या छातींत धडकीच भरली. व आपल्या नेहमींच्या व 'हुकुमी' दडपशाहीच्या अस्त्रानें सर्व हंगेरियन व्यापारी संघच बेकायदा ठरवून टाकले. परंतु लोकांनींही या दडपशाहीला उत्तर म्हणून ५५ जिल्हा कौन्सिलांनीं या व्यापारी संघासच पाठिंबा दिला. यावर तोड म्हणून ऑस्ट्रियानें त्या जिल्हा कौन्सिलाचें अध्यक्ष बडतर्फ करून त्या जागीं ऑस्ट्रियन अधिकारी नेमले. पण यामुळें कोसूथला इष्ट असाच कार्यभाग घडून आला; तो असाः—

आतांपर्यंत हंगेरीच्या या स्वातंत्र्ययुद्धांत तेथील सरदार जमीनदार, वर्ग फारसा पडत नसे. परंतु कोसूथनें सुरू केलेल्या औद्योगिक चळवळीनें देशी उद्योगधंद्यांत या वर्गानें आपलें बरेंच भांडवल घातलें, त्यांची शेती सुधारली व कौन्सिलचे अध्यक्ष या नात्यानें ते या चळवळीस मदतही करूं लागले व त्यांस अकल्पनीय असा फायदाही होऊं लागला, यामुळें सहाजिकच ही स्वदेशीची चळवळ त्यांस फार मानवली. परंतु ऑस्ट्रियन सरकारनें हे औद्योगिक संघच बुडविल्याकारणानें त्यांसही परसत्तेचा वरवंटा किती जाचक असतो याची पूर्ण कल्पना येऊन, या राष्ट्रोद्धाराच्या चळवळींत ते सामील झाले. एकंदरीनें ही स्वदेशीची चळवळ आर्थिकदृष्ट्या जरी फसली तरी देशांतील एक धनिकवर्ग यामुळें राष्ट्राचा झाला. कोसूथनें त्यांना स्पष्टपणें सवाल टाकला कीं, 'अद्याप तरी तुमच्यांत कांहीं माणुसकी आहे कीं नाहीं ?" त्याचा जबाब कोसूथला अनुकूल असाच आला, शेंकडों सरदार कोसूथला येऊन मिळाले, व कित्येकजण आपली सरदारकीही सोडून देण्यास तयार झाले.

यानंतर लोकसभेची निवडणूक सन १८४७ मध्यें झाली. त्यांतही लोकपक्षाचाच जय झाला. ऑस्ट्रियनसरकारचें पूर्ण खात्रीचें ठिकाण पेस्त येथें सरकारनें नानाप्रकारची लांच लुचपत, धाकदपटशा वगैरे प्रयोग केले, तरीही कोसूथचा जय झाला व ही नवी लोकसभा सर्वस्वीं त्याची झाली. या स्थितीचा कोसूथनें पुरापूर फायदा घेऊन हंगेरीच्या स्वातंत्र्याची मागणी केली. त्याच्यामागें लोकमताचा प्रचंड पाठिंबा असल्यामुळें ऑस्ट्रियन सरकारास पडतें घ्यावें लागून त्यांची ही

मागणी कबूल करावी लागली; व सन १८४८ मध्यें फर्डिनंड बादशहा स्वतः हंगेरीस येऊन त्यानें स्वराज्याची सनद लोकसभेच्या स्वाधीन केली. जे पुढारी कैदेंत किंवा हद्दपार झाले होते ते परत आले व मोठमोठ्या अधिकारांच्या जाग्यांवर त्यांच्या नेमणुका करण्यांत आल्या. परकीय अंमलांत जे लोक राजद्रोही ठरले गेले होते ते स्वराज्यांत मंत्रिपदासारख्या जबाबदारीच्या पदावर आरुढ झाले. राजनीतीचा हा असा विचित्र खेळ आहे ! या स्वराज्यप्राप्तीमुळें हंगेरींत आनंदीआनंद पसरला. पण दुर्दैवानें तो फार काल टिकला नाहीं.

बादशहानें हंगेरीला दिलेल्या स्वराज्याविरुद्ध ऑस्ट्रियन नोकरशाही पूर्वी-पासून होतीच. 'स्वतंत्र हंगेरी' ही कल्पनाच त्यांना सहन होईना. तेव्हां हा कांटा परस्पर निघाला तर अनायासें बरेंच होईल. या हेतूनें त्यांनीं हंगेरीच्या भोंवतालील वालेशियन्स, सर्वियन्स, क्रोटस् वगैरे राष्ट्रांना हंगेरीविरुद्ध उठवून त्यांजकडून हल्ला कराविला. हेतू हा कीं, इतक्या राष्ट्रांपुढें हें नुकतेंच जन्माला आलेलें पोर तेव्हांच चुरडून जाईल, व कदाचित् आपणाकडे मदत मागितलीच तर त्यांच्या स्वातंत्र्याचा मोबदला अनायासें घरीं चालत येईल. परंतु हा त्यांचा अंदाज सपशेल चुकला. हंगेरींत खराखुरा स्वाभिमान जागृत झाला होता, लोकांनीं स्वातंत्र्याची किंमत जाणली होती, स्वाभाविक त्यांच्यांत वीरवृत्तीचा संचार होऊन हजारों तरुणांनीं स्वयंसेवक पथकांत नांवें दाखल केलीं व नव-शिक्या परंतु देशाभिमानानें प्रेरित झालेल्या वीरांनीं हीं स्वातंत्र्यापहरणास आलेलीं पिशाच्चें पार गाडून टाकलीं. आम्ही गेल्यावर तुमची काय स्थिति होईल असा जित राष्ट्रांना प्रश्न विचारणाऱ्या मदांध राष्ट्रांनीं हंगेरीचें हें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवावें. ऑस्ट्रियानें आमच्याविरुद्ध या भुरट्यांना उठविलें, हें हंगेरीला कळतांच त्यास ऑस्ट्रियाचा मनस्वी संताप झाला. नोकरशाहीचा हा डाव उलटा आल्यावर तिनें हंगेरीच्या स्वातंत्र्याची सनद रद्द करावी असा बादशहामागें तगादा लाविला. व त्याप्रमाणें बादशहानें कौन्ट लेंबर्ग यास व्हॉइसरॉय म्हणून हंगेरींत रवाना केलें. लोकसभेनेंही आम्हीं लेम्बर्ग यास मानीत नाहीं असें स्पष्ट कळविलें. व जो कोणी लेम्बर्ग यास कसलीही मदत करील तो हंगेरीचा शत्रु समजण्यांत येईल असे जाहिरनामे काढले. बादशहाच्या या कृत्यामुळें लोक अत्यंत चिडले लेम्बर्ग हंगेरींत येतो तोंच त्याचा खूनही झाला.

या गोष्टींची बादशहास चीड येऊन त्यानें जेलाफिक नांवाच्या एका क्रोशियन मनुष्यास व्हॉइसरॉय नेमून ससैन्य हंगेरींत पाठविलें. हंगेरीशीं यानेंच मागें युद्ध केलें होतें. हंगेरीही संतप्त झालाच होता. ऑस्ट्रियन सैन्य बुडापेस्टचा कबजा घेण्यास येणार हें ऐकून लोकसभा किंचितही घाबरली नाहीं. याच संधीस ऑस्ट्रियांत एक बंड उठलें होतें. या संधीचा आपण फायदा घ्यावा या हेतूनें कोसूथनें लोकसभेचें मन वळवून ऑस्ट्रियन बंडखोरांस मदत करण्याबद्दल एक ठराव पास करून घेतला राजकारणाच्या दृष्टीनें कोसूथच्या हातून ही अक्षम्य अशी चूक घडून आली. ऑस्ट्रियानें बंडखोरांचा व त्यांस मदतीस गेलेल्या हंगेरियन्सचा पूर्ण पराजय करून त्यांचा पार धुव्वा उडविला, व ऑस्ट्रियन सेनापति विंडिग्राझ हा मोठ्या विजयानें बुडापेस्तमध्यें शिरला.

हंगेरियन वीर आर्थर जिऑर्जी यानें कांहीं वेळ ऑस्ट्रियन्सशीं चांगल्या टकरा दिल्या व कित्येक प्रसंगीं त्यांचा धुव्वाही उडविला. परंतु ऐन वेळीं ऑस्ट्रियाला रशियानें मदत केल्यामुळें हंगेरींचा पुरा मोड होऊन जिऑर्जी ऑस्ट्रियांच्या हातीं सांपडला व हंगेरी पुन्हां ऑस्ट्रियाच्या जुवाखालीं सांपडलें. आर्थर जॉर्जसारखा कसलेला सेनापती मिळतांच राजसत्तेचें निर्मूलन करण्याच्या कोसूथच्या कल्पनेस जोर येऊन त्यानें जॉर्ज सारखा जय मिळवीत आहे तोंच, हंगेरियन लोकसत्तेची द्वाही फिरविलीही व ऑस्ट्रियाचा जय होतो असें वाटतांच रशियाचा एकादा राजपुत्र हंगेरीच्या गादीवर बसविण्याच्या प्रयत्नास लागला. एवढ्या अवधींत हंगेरीचा पुरा पराजय होऊन आर्थर जॉर्ज हा ऑस्ट्रियास शरण गेला. कोसूथचे सर्व मनोरथ ढांसळले; एवढेंच नव्हे, तर या त्याच्या चुकीमुळें हंगेरीचें स्वातंत्र्यही नष्ट झालें. ऑस्ट्रियाला सर्व रान मोकळेंच सांपडलें. त्यानें लोकसभा नाहींशी केली. राष्ट्रीय संस्थांना तिलांजलि दिली, हंगेरियन भाषेस बहिष्कृत केली, जिल्ह्याचीं, तालुक्याचीं कौन्सिलें नष्ट केलीं; सर्व अधिकारांच्या जागेवर ऑस्ट्रियन नेमून टाकले, जवळ जवळ युरोपच्या नकाशा-वरून हंगेरीचें नांव पुसून टाकल्यासारखें केलें.

हंगेरी नामशेष झाला असें युरोपांतील मुत्सद्दीही म्हणूं लागले. पण वस्तु-स्थिति तशी नव्हती. तेथील राष्ट्रीय चळवळीचा आत्म फ्रान्सिस डीक विद्यमान होता व त्यानें हंगेरीयन स्वातंत्र्याची ज्योत जागृत ठेवली होती. वरील दंग्या-नंतर हंगेरींत शांतता पसरल्यासारखी दिसत होती. परंतु फ्रान्सिन डीक पेस्त

येथें येऊन राहिल्यावर त्याच्या बिऱ्हाडीं हंगेरीच्या उद्धाराची अखंड चर्चा चालू असे. डीक हा सर्व लोकांस मिळे. त्याच्याजवळ गुप्त असें कांहींच नव्हतें. यामुळें सरकारची स्थिति मात्र अस्वस्थ झाली. त्यांना याचा कांहीं उलगडाच होईना. तेव्हां हंगेरियन लोकांना खूष करण्याकरितां डीकला मुख्य न्यायाधिशाची जागा देऊं केली. "माझ्या देशाचें स्वातंत्र्य तुम्ही मान्य केलें म्हणजे मग मी तुमच्या म्हणण्याचा विचार करीन;" असा डीकनें रोखठोक जबाब दिला. डीक आपल्या अलोट स्वार्थत्यागानें, उज्ज्वल देशभक्तीनें इतका लोकप्रिय झाला होता कीं, त्याचें दर्शन होऊन त्याच्या तोंडून एखादा शब्द ऐकण्यास सांपडावा म्हणून हजारों लोकांची यात्रा त्याच्या घरीं लोटत असे. "हंगेरी जिवंत आहे; कारण डीक जिवंत आहे व स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क मी मिळविणारच." हा डीकच्या दर्शनानें मिळालेला उत्साहाचा संदेश हंगेरीच्या कानाकोंपऱ्यांत निघूं लागला. डीकची लोकप्रियता दिवसानुदिवस वाढूं लागली. त्याबरोबर नोकरशाहीनें दडपशाहीसही नेटानें सुरुवात केली. त्यामुळें पूर्वीचे राजनिष्ठ लोकही बेदील झाले. डीकचें लोकांवर वाढत चाललेलें वजन नोकरशाहीस सहन होईना; पण त्याला चिरडून कसा टाकावा हें तीस समजेना. तेव्हां ऑस्ट्रियाचा मुख्य प्रधान बॅक यानें त्याच्याशीं बोलणें लावलें कीं, डीकनें हंगेरीच्या वतीनें व्हिएन्ना येथें येऊन वाटाघाट करावी. त्यावर डीकनें खडखडीत जबाब दिला कीं, "हंगेरीचा स्वराज्याचा कायदा तुम्ही बेकायदा रद्द करून हंगेरीचें राजकीय स्वातंत्र्य नाहींसें केलें आहे. अशा स्थितींत मी कोणाचा प्रतिनिधी म्हणून तुमच्याशीं वाटाघाट करूं! अगोदर हंगेरीचें स्वराज्य; मग वाटाघाट."

अशा रीतीनें कांहींच कार्यभाग होईना व हंगेरीचा प्रश्न तर शक्य तितक्या लवकर सोडविणें अगदीं जरूर होऊन बसलें. तेव्हां ऑस्ट्रियानें वेगळाच डाव खेळण्याचें ठरविलें. हंगेरीला जर्मन संस्थानांत समाविष्ट करण्याचा घाट घातला. उद्देश असा कीं, हंगेरी गडबड करूं लागलाच तर त्याच्या उरावर ऑस्ट्रियाखेरीज, प्राशिया, सॅक्सनी, बव्हेरिया हीं संस्थानें बसतील. पण या बाबतींत फ्रान्सनें ऑस्ट्रियाला चांगलीच तंबी दिल्यामुळें हा डाव फसला.

राजकीय चळवळी उघडपणें चालविणें अशक्य झाल्यामुळें डीकनें राष्ट्रीय शिक्षण व स्वदेशी या चळवळी नेटानें सुरू केल्या. कोसूथ व इतर हद्दपार

करण्यांत आलेले हंगेरियन देशभक्त यांनीं परदेशांत हंगेरियन मालाचा खप वाढविण्याची खटपट केली. या योगानें उद्योगधंद्यांची वाढ होऊन या राष्ट्रीय चळवळीस परदेशांतही सहानुभूति मिळविली. अशी चळवळ सतत सन १८५७ पर्यंत सुरू होती. पण त्यामुळें ऑस्ट्रियाचें मात्र धाबें दणाणलें. लोकांत राष्ट्रीयत्वाची भावना जास्तच वृद्धिंगत होत चालली. ऑस्ट्रियन बादशहा अप्रिय झाला तेव्हां हंगेरीची प्रीति संपादन करण्यासाठीं ऑस्ट्रियानें आपलें अस्त्र बाहेर काढलें. बॅक या ऑस्ट्रियाच्या मुख्य प्रधानानें उपाय सुचविला कीं, बादशहानें हंगेरीवर आपली पदधूलि झाडावी, म्हणजे तेथील लोकांतील सर्व असंतोष पार नाहींसा होऊन सर्व अराजक चळवळी नाहींशा होतील. ही सूचना बादशहालाही पटली व त्यानें हंगेरींत प्रयाण करण्याची तयारी सुरू केली. आजपर्यंत जगांतील नोकरशाही जे जे उपाय योजिते ते ते सर्व येथेंही केले गेले. बादशहांच्या शुभागमनाचीं मोठमोठीं चित्तवेधक वर्णनें पेस्त येथील पत्रांत यावी अशी खास व्यवस्था करण्यांत आली. हंगेरींत नवयुग प्रस्थापित करण्यासाठीं बादशहा येत असून सर्व राजकीय गुन्हेगारांच्या जप्त केलेल्या मिळकती त्यांस परत बहाल करण्याचा त्यांचा इरादा आहे, जनतेला शुभाशिर्वाद देण्यासाठीं ते मुद्दाम येत असून लोकांनीं त्यांचें अंतःकरणपूर्वक मोठें थाटाचें स्वागत करावें असे जाहिरनामेही प्रसिद्ध करण्यांत आले. कांहीं हंगेरियन त्या लोभानें हुरळले; परंतु लोकपक्ष अर्थात् डीक मात्र तटस्थ राहिला. 'मी फक्त हंगेरीच्या राजाला मानतों, ऑस्ट्रियाच्या बादशहाला ओळखीत नाहीं. ज्या वेळीं फ्रान्सिस जोसेफ हंगेरीचें स्वराज्य मान्य करून आपणांस पेस्त येथें राज्याभिषेक करून घेईल त्या वेळीं आम्हीं त्याचा सत्कार करूं; तत्पूर्वी नाहीं;' असें डीकनें आपलें मत जाहीर केलें.

सन १८५७ च्या मेमध्यें बादशहांची स्वारी पेस्त येथें आली. लोकांनीं त्यांचें स्वागत करून या समारंभांत सामील व्हावें, म्हणून नोकरशाहीकडून सर्व प्रकारचे उपाय करण्यांत आले. मोठमोठे समारंभ, नाच मेजवान्या, दारुकाम, देवळांतून प्रार्थना करविण्यांत आल्या. या वेळीं बादशहाला जणूं काय हंगेरीच्या प्रेमाचा ऊतच आला होता. हंगेरियन पोषाक, हंगेरियन भाषा, हंगेरियन गाणीं, हंगेरियन नाच हींच त्याला आवडूं लागलीं. या त्याच्या ढोंगानें मवाळ मात्र फसले, व बादशहाला मानपत्र देण्याचा विचार त्यांनीं सुरू केला. तेव्हां

डीकनें त्यांना स्पष्ट बजविलें, 'फ्रान्सिस जोसेफनें तुमच्या स्वराज्याचा अपहार केला आहे, त्याचा तुम्हीं सत्कार करतां कामा नये.' परंतु मवाळांनीं बादशहाची आरती केलीच. बादशहानें त्यांचा मोठा बडेजाव केला, त्यांच्याशीं गोडगोड बोलला, माझ्या साम्राज्याचे तुम्ही आधारस्तंभ आहांत असेंही म्हणाला; परंतु प्रत्यक्ष वस्तुदर्शन मात्र त्यांस घडलें नाहीं. हंगेरींत एकतंत्री राज्यपद्धति कायमच राहिली व असंतोषही कमी झाला नाहीं.

यानंतर १८५९ सालीं ऑस्ट्रियाचें फ्रान्सशीं युद्ध सुरू झालें व त्यांत ऑस्ट्रियाचा पूर्ण पराजय झाला. बादशहानें बॅकच्या जागीं बॅरन जोसिका नांवाच्या हंगेरियन मनुष्याची मंत्र्याच्या जागेवर नेमणूक करण्याचें ठरविलें. त्या वेळीं जोसिका म्हणाला, 'महाराज मी हंगेरियन आहे. हंगेरियन लोकांच्या मनोवृत्ति मी पूर्ण जाणतों, तशा ऑस्ट्रियन लोकांच्या जाणत नाहीं. हंगेरियन लोकांवर ज्याप्रमाणें ऑस्ट्रियन मनुष्य अधिकारी नेमून उपयोग नाहीं, त्याप्रमाणेंच ऑस्ट्रियन लोकांवरही हंगेरियन मनुष्य उपयोगी नाहीं. त्यानंतर गोलेचेकी नांवाचा एक पोल मनुष्य प्रधान झाला, त्यानें प्रधानमंडळाच्या मंत्रिगणांत सहा हंगेरियन गृहस्थांस घेण्याचें ठरविलें. व त्याप्रमाणें सहाजणांस निमंत्रण करण्यांत आलेंही. निमंत्रण येतांच त्यांनीं डीकला आम्ही पुढें काय करावें अशी पृच्छा केली. डीकनें सांगितलें. 'तुम्ही जाऊं नका. फ्रान्सिस जोसेफला जर हंगेरीचा सल्ला हवा असेल तर त्यानें पेस्त येथें यावें व आमच्या लोकसभेमार्फत आमच्याशीं वाटाघाट करावी.' त्यांतील तिघांस हा सल्ला पटला. यानंतर तडजोडीचें धोरण म्हणून हंगेरीचीं जिल्हा कौन्सिलें पुन्हां सुरू करण्याचें ठरवून त्यासाठीं चार हंगेरियन लोकांचें एक रॉयल कमिशन नेमिलें. डीकचें याबद्दल काय मत आहे, अशी लोकांस स्वाभाविक उत्कंठा लागली. परंतु डीक यामुळें फसला नाहीं. त्यानें कमिशनर्सनां सांगितलें, "हंगेरीच्या राजाशिवाय, हंगेरियन रॉयल कमिशन कोणासही नेमतांच येत नाहीं. तुम्ही आपलीं कमिशनें परत करा." याप्रमाणें कमिशनचा शेवट लागला. स्वराज्याशिवाय सहकार्य नाहीं, हा डीकचा निश्चय होता, व प्रत्येक ठिकाणीं आपलें स्वराज्याचें घोडें तो पुढें दामटीत होता.

शेवटीं १८६१ मध्यें ऑस्ट्रियन सरकारनें जिल्हा-कौन्सिलें व लोकसभा पुन्हां बोलाविली. त्या सभेनें पहिल्या तडाक्यांतच जिल्हा-कौन्सिलवरचें सर्व

ऑस्ट्रियन अधिकारी काढून टाकून ऑस्ट्रियन सैन्यासाठीं जे कर लादण्यांत आले होते, ते गोळा करण्याचें व देण्याचेंही साफ नाकारिलें. सभेच्या या कृत्यामुळें ऑस्ट्रियन अधिकारीवर्ग चिडून गेला. बादशहानें गोलेचेकीस मंत्रिपदावरून पदच्युत करून फॉन श्मेरहिंग यास त्याच्या जागीं नेमिलें. त्यानें आपलें नवीन धोरण पुकारलें. त्यांत ऑस्ट्रियाच्या हातीं मुख्य मुख्य खातीं राखून ठेवून कांहीं थोडीशीं हंगेरियन लोकांकडे सोंपविण्यांत आलीं. यामुळें लोक फारच असंतुष्ट होऊन राष्ट्रीय पक्षानें विलक्षण चळवळ सुरूं केली व त्याचा असा परिणाम झाला कीं, लोकसभेची पुन्हां निवडणूक होऊन त्यांतील तीनशें प्रतिनिधींपैकीं २७० जागा डीकच्या पक्षानें जिंकल्या. परकीय सत्तेच्या हातून स्वराज्य मिळेपर्यंत कौन्सिलांत घुसून त्यांचा देशाच्या हिताकडे शक्य तो उपयोग करून घ्यावयाचा असें धोरण डीकचें अर्थात् राष्ट्रीय पक्षाचें होतें; व याच तत्त्वानुरूप ते कौन्सिलांत घुसून त्यांनीं ऑस्ट्रियन नोकरशाहीला अगदीं पुरेपुरेसें केलें. कौन्सिलें ही विरोधासाठीं आहेत, अशी त्यांची ठाम समजूत होती. बाहेर दडपशाहीचे कायदे, सभाबंदीचे कायदे, मुद्रणस्वातंत्र्याला बंदी वगैरे स्वातंत्र्याचा अपहार करणारे नानाप्रकारचे, कायदे असल्यामुळें बाहेर जें बोलतां येत नाहीं तें कौन्सिलमध्यें स्पष्ट व निर्भीडपणें बोलतां येऊन परकीय सत्तेच्या सदोष राज्यपद्धतीवर टीका व विरोध करण्यास कौन्सिलांत चांगली संधी मिळते व या संधीचा फायदा डीकच्या पक्षानें पुरापूर घेतला.

हंगेरीची लोकसभा बुडा येथें भरावी असें बादशहानें ठरविलें होतें. त्यावर लोकप्रतिनिधींनीं बादशहास स्पष्ट कळविलें कीं, 'सन १८४८ च्या स्वराज्याच्या घटनेप्रमाणें लोकसभा पेस्त येथेंच भरली पाहिजे. तेव्हां आम्ही पेस्त येथें जमूं; बुडा शहरीं जमत नाहीं. ऑस्ट्रियन सरकारनें आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली, परंतु लोकप्रतिनिधी आपल्या निश्चयापासून किंचितही ढळले नाहींत. तेव्हां सरकारासच नमतें घ्यावें लागलें व लोकसभेची बैठक पेस्त येथेंच भरली.

हंगेरियन लोकसभा उघडण्याचा ज्या दिवशीं समारंभ होता, त्या दिवशीं सर्व देशभक्तांनीं सर्वस्वी हंगेरीचा पोषाक केला होता. व सभागृहांत प्रवेश करतांच सर्व सभासदांना हंगेरीचा मृत प्रधान कौन्ट लुई बॅथिआनी–राजद्रोहाच्या आरोपावरून सन १८४९ सालीं ऑस्ट्रियाकडून याचा वध करण्यांत आला होता–याच्या मरणसमयींच्या उद्गारांचें स्मरण होऊन सर्वांनीं एकसमयावच्छेदेंकरून

'माझ्या मातृभूमीचा सदैव विजय असो' ( Eljen a Haza ) या शब्दांचा जयजयकार केला.

पार्लमेंट उघडतांच राजप्रतिनिधीनें बादशहाचा म्हणून जो निरोप वाचून दाखविला, त्यांत हंगेरियन लोकसभेकडे कांहीं सटरफटर खातीं सोंपवून दिलीं असून पार्लमेंटांत व्हिएन्ना येथें कांहीं प्रतिनिधी पाठवावे; यापेक्षां महत्त्वाचें कांहीं नव्हतें. असल्या फुसक्या स्वराज्यामुळें हंगेरियनांचें बिलकुल समाधान न होतां त्यांनीं भर सभेंत त्याचा धिक्कार केला. डीकनें लोकांना शांत केलें. तो म्हणाला, ' आमच्या मुलांबाळांकरितां परकी देशांत, परकी लोकांनीं कायदे करावे ही बादशहाची इच्छा दिसते व ती आम्हांला कधींही मान्य होणार नाहीं. हंगेरीचें राजकारण ऑस्ट्रियांत चालावें ही योजनाच मानहानीची असल्यामुळें आम्हांला ती स्वीकारतां येत नाहीं.' बादशाही निरोपास उत्तर म्हणून डीकनें लोकसभेच्या संमतीनें एक खलिता तयार केला. खलित्यांतील प्रत्येक शब्दांत देशाभिमान, स्वातंत्र्यप्रीति, दृढनिश्चय ओतप्रोत भरला होता. फ्रान्सिस जोसेफला हंगेरीचा राजा म्हणवून घ्यावयाचें असेल, तर त्यानें प्रथम हंगेरीचें स्वराज्य मान्य केलें पाहिजे, व बुडा येथें आपणास अभिषेक करून घेतला पाहिजे. बादशहानें उद्धटपणानें हा खलिता फेंटाळून लावून ऑस्ट्रियन पार्लमेंटमध्यें पाठवावयाच्या प्रतिनिधींची निवड करण्याबद्दल हंगेरियन लोकसभेला कळविलें. याला उत्तर म्हणून हंगेरियन लोकसभेनें बादशहाला दुसरा खलिता पाठविला. त्या खलित्यांत शेवटीं म्हटलें होतें, " आमच्या या कृत्यामुळें आमच्यावर नानातऱ्हेचीं संकटें येतील याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे. परंतु नागरिकांच्या कर्तव्यासाठीं आम्हीं तीं सोसण्यास तयार आहों. आमच्या मातृभूमीचें स्वातंत्र्य ही आमची खाजगी मत्ता नव्हे, राष्ट्रानें अत्यंत विश्वासानें ही ठेव आमच्या हातीं दिली आहे, व त्याबद्दल देशास आम्हांस जाब द्यावा लागेल. यासाठीं कितीही संकटें आलीं तरी ही वडिलार्जित ठेव सुरक्षितपणें पुढील पिढीच्या स्वाधीन करीपर्यंत, आम्हांस तीं सोसलीं पाहिजेत; व आम्ही तीं आमच्या पूर्वजांप्रमाणें मोठ्या धैर्यानें सोसूंही. कदाचित्, तुम्हीं आज आमच्यापेक्षां जास्त सामर्थ्यवान् असल्यानें आमच्याकडून जबरदस्तीनेंही घ्याल. पण आम्हीं आपण होऊन ती ठेव तुमच्या स्वाधीन केली तर अनुकूल वेळ येतांच ती परत मिळण्यास फार आयास पडतील. आमच्या बाजूला न्याय व सत्य आहे. तेव्हां यश आम्हांस

मिळणारच. मग त्यासाठीं कितीही संकटें सोसावीं लागलीं तरी आम्हांस त्याची फिकीर नाहीं."

फ्रान्सिस जोसेफ हा खलिता पाहून अत्यंत संतप्त झाला, व त्यानें हंगेरीची लोकसभाच बंद केली. सभासदांनीं बादशहाचें हें कृत्य अन्यायाचें ठरवून लोकसभा भरविण्यासाठीं सभागृहाकडे कूच केलें, परंतु सभागृह सशस्त्र ऑस्ट्रियन सैन्यानें आपल्या कबज्यांत घेतलेलें पाहून डीकनें आपल्या लोकांस परत फिरविलें. अशा रीतीनें हंगेरीनें चालविलेल्या शांततामय युद्धाचा एक अंक येथें समाप्त झाला व तात्कालिक तरी दडपशाहीच्या जोरावर ऑस्ट्रियन नोकरशाही यशस्वी झालीशी दिसली. पेस्त जिल्हा कौन्सिलनें बादशहानें लोकसभा बेकायदा विसर्जन केली याबद्दल निषेध केला. हें बादशहानें पाहतांच त्यानें पेस्त कौन्सिलच रद्द करण्याचा हुकूम काढला. कौन्सिलनें हा हुकूम धाब्यावर बसविला; तेव्हां ऑस्ट्रियन शिपायांना शस्त्राच्या जोरावर कौन्सिलें बंद करण्यास पाठवून सभासदांना सभागृहाबाहेर काढलें. ही असंतोषाची लाट सर्व देशभर पसरली व इतर जिल्हा-कौन्सिलांनींही पेस्तचेंच अनुकरण केलें; व त्याचा परिणामही पेस्त कौन्सिलप्रमाणेंच म्हणजे सर्वच जिल्हा-कौन्सिलें रद्द करणें हा झाला. कौन्सिलच्या जिल्हाधिकाऱ्यांनीं आपल्या जागा सोडण्याचें नाकारलें व त्याबरोबर फ्रान्सिस जोसेफ यानें लष्करी अंमल पुकारला. याप्रमाणें हंगेरियन लोक कौन्सिलांत घुसून त्यांनीं सरकारच्या स्पष्टपणें असें नजरेस आणून दिलें कीं, येथील राज्यशकट हांकावयाचा असेल, तर तो लोकतंत्राप्रमाणेंच हांकला पाहिजे, व कौन्सिलेंही लोकमतानुवर्तीच असलीं पाहिजेत. कौन्सिलें हीं तोंडपुजे लोकांसाठीं नाहींत व आम्हीं कौन्सिलांत घुसून तेथें आपल्या इच्छेप्रमाणें राज्ययंत्र फिरवूं न तुम्हीं विरोध केल्यास तुम्हांस सळो कीं पळो केल्याखेरीज राहणार नाहीं. याप्रमाणें सरकारकडूनच पूर्णपणें 'कौन्सिल बहिष्कार' घडवून आणला.

या वेळीं देशांत सर्वत्र शांतता राखण्याचें काम डीकनें केलें, 'निःशस्त्र लोकांस सशस्त्र लोकांशीं झगडावयाचें असेल तर हा एवढाच मार्ग आहे यांत हालअपेष्टा सोसाव्या लागतील तर आपला दर्जा व मान राखून तरी सोसूं' असा उपदेश त्यानें लोकांस केला.

डीकनें निःशस्त्र प्रतिकाराचें फर्मान काढून 'कर देऊं नका' असा लोकांस हुकूम सोडला व लोकांनींही तो अक्षरशः अमलांत आणला. जेव्हां कर वसूल करण्यासाठीं ऑस्ट्रियन अंमलदार आला. त्या वेळीं लोकांनीं त्यास कर देण्याचें साफ नाकारलें. त्याला मारहाण केली नाहीं, त्याची फजिती केली नाहीं, फक्त आम्हीं कर देत नाहीं, एवढेंच त्यास स्पष्टपणें सांगितलें; व बजावलें कीं, 'तूं ऑस्ट्रियाच्या कायद्याप्रमाणें करवसुलीस आला आहेस, हंगेरीच्या नव्हेस; तुला आम्हा ओळखीत नाहीं. नंतर अंमलदारानें पोलिसाच्या मदतीनें माल जप्त केला. कोणीही हंगेरियन लिलांवदार त्याचा लिलांव पुकारण्यास तयार होईना व मालही घेईना. तेव्हां ऑस्ट्रियांतून लिलांवदार मागवावा लागला; व मालाला गिऱ्हाईकही ऑस्ट्रियांतूनच मागवावें लागलें. याप्रमाणें करवसुली सरकारास आंतबट्याची होऊन बसली, व असा हा आंतबट्याचा व्यापार चालणार तरी किती दिवस ? अखेरीस सरकारास हाही मार्ग सोडावा लागला, व निःशस्त्र प्रतिकाराचा पूर्णपणें विजय झाला.

यावर ऑस्ट्रियन नोकरशाहीनें वेगळाच उपाय काढला. प्रत्येक हंगेरियन मनुष्याच्या घरीं एक एक ऑस्ट्रियन लष्करी शिपाई 'सक्तीचा पाहुणा' म्हणून ठेवून दिला. हंगेरियन लोकांनी याबद्दलही कुरकुर केली नाहीं. पण त्या शिपायाशीं ते इतक्या तुच्छतेनें व तिरस्कारानें वागूं लागले कीं, त्या शिपायालाच हा पाहुणचार नकोसा होऊन तो आपण होऊनच सोडून जाऊं लागला. यानंतर हंगेरियन लोकांनीं ऑस्ट्रियन सैन्यावरच बहिष्कार टाकला. ऑस्ट्रियाच्या लष्करांत शिरणें देशद्रोह आहे, एवढेंच नव्हे, नैतिक पाप आहे, असें त्यांनीं ठरविलें. या ठरावाची बजावणीही पूर्णपणें झाली.

यानंतर व्हिएन्ना येथें अखिल साम्राज्याची पार्लमेंट भरली. त्या सभेस एकही हंगेरियन प्रतिनिधी गेला नाहीं व ऑस्ट्रियन पार्लमेंट हा युरोपभर एक थट्टेचा विषय झाला. हंगेरीची असहकारिता आम्ही हळूहळू पार हाणून पाडूं, असा ऑस्ट्रियन प्रधान फॉन श्मेरलिंग यास फार विश्वास होता व तसा तो बोलूनही दाखवी. यावर डीकनें उत्तर दिलें, 'पण आम्हांस इतका दम आहे कोठें आम्हांला झटपट निकाल करून घेतलाच पाहिजे.' ऑस्ट्रियानें आपलें दडपशाहीचें शस्त्र उपसलें व राष्ट्रीयपक्षाच्या सर्व चळवळी हाणून पाडण्याचा उपक्रम सुरू केला. ऑस्ट्रियन मालावर बहिष्कार घालणें ही गोष्ट बेकायदा ठरविण्यांत

आली. परंतु हंगेरियन देशभक्तांनीं असला जुलुमी कायदा न मानतां उलट बहिष्काराची चळवळ जास्तच नेटानें चालविली. चळवळ्या लोकांस सरसहा कैदेंत टाकण्याचा उपक्रम ऑस्ट्रियानें चालविला व हंगेरियन वीरही मोठ्या खुषीनें तुरुंगांत जाऊं लागले. हजारों तुरुंग भरून गेले. हेंही दडपशाहीचें अस्त्र वायां गेलेलें पाहतांच, ऑस्ट्रियन नोकरशाहीही जरा नरमली. व केवळ मनगटाच्या जोरावर हंगेरींत राज्य करतां येणें शक्य नाहीं हें ऑस्ट्रियास पुरापूर कळून चुकलें. तेव्हां फ्रान्सिस जोसेफनें पुन्हां सामोपचारास सुरुवात केली. सर्व राजकीय कैद्यांची मुक्तता केली व हंगेरीच्या लोकांकडूनच वसूल केलेल्या करांतून हंगेरियन राष्ट्रीय संस्थांना मोठमोठ्या देणग्या दिल्या. पण या सर्व उदारपणांतील पोकळपणा हंगेरियन लोकांस कळून चुकला होता. ते भपक्यास फसले नाहींत.

बादशाह फ्रान्सिस जोसेफनें हंगेरियन लोकसभा बंद केली होती, तरी हंगेरियन लोक अनेक निरनिराळ्या संस्थांच्या नांवांखालीं एकत्र जमत असत. कृषिसंरक्षक-मंडळ, औद्योगिकमंडळ, पुराणवस्तु संशोधकमंडळ, वाङ्मयप्रचारिणी सभा वगैरे अनेक संस्थांच्या द्वारें त्यांनीं आपली राष्ट्रोद्धाराची ज्योत प्रज्वलित ठेविली होती. वरील सर्व संस्थांतून होणाऱ्या चर्चेमध्यें राष्ट्रोद्धाराची एकच प्रमुख गोष्ट जनते-पुढें मांडली जात असे. परदेशांत लोकमत अनुकूल करण्याचा प्रयत्नही त्यांनीं जोरानें केला. याच सुमारास ऑस्ट्रियाची व प्रशियाची लढाई जुंपण्याचा प्रसंग आला. अशा स्थितींत हंगेरीला खुष ठवणें ऑस्ट्रियाला प्राप्तच होऊन बसलें तेव्हां 'कोणत्या अटीवर तडजोड होईल,' अशी ऑस्ट्रियाकडून डीकला पृच्छा करण्यांत आली. 'हंगेरीला पूर्ण स्वराज्य देणें हा एकच उपाय आहे. त्याशिवाय तडजोड शक्य नाहीं' असा डीकनें रोखठोक जाब दिला; व या हंगेरीच्या हेतुनुरूप आपण स्वराज्य देणार आहोंत व हा नवा मनु सुरू करण्यास पेस्त येथें आपण लवकरच येणार आहोंत, असें बादशहानें जाहीर केलें. ही राजभेट पूर्वींच्या भेटीप्रमाणेंच निष्फळ ठरली. लोकांनीं गुढ्या, तोरणें उभारलीं हें पाहून त्यांस बरें वाटलें, परंतु तीं निशाणें हंगेरियन लोकसत्तेचीं निदर्शक अशीं म्हणजे, हिरव्या, पांढऱ्या व तांबड्या अशा तिरंगाचीं दृष्टीस पडतांच तो फार खवळला, तीं निशाणें पाडण्याचाच तो हुकूम करता; परंतु त्यामुळें लोकमत जास्तच क्षुब्ध झालें असतें म्हणून तो शांत राहिला; व प्रशियाविरुद्ध हंगेरीनें आपणांस मदत

केल्यास स्वराज्याचे हक्क देऊं, अशी लालूच दाखविली. त्याचप्रमाणें प्रशियानें हंगेरीस फोडण्याचा प्रयत्न चालविला; अशी स्थिति पाहतांच आतां हंगेरीला कांहीं तरी सवलती दिल्याखेरीज भागत नाहीं असें त्यास वाटलें व त्यानें फॉन श्मेरहिंग यास पदच्युत करून त्याचे जागीं कौन्ट कोनिही यास प्रधान नेमिलें व त्याच्या-द्वारें हंगेरीशीं तडजोडीचा प्रयत्न सुरू केला.

सन १८६५त बादशहानें जाहीरनामा काढून व्हिएन्ना येथील पार्लमेंट रद्द करून हंगेरीला आपला कारभार चालविण्यास पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें व हंगेरियन लोकसभेचे अधिकार यापुढें मानले जातील असें जाहीर करण्यांत आलें.

डीक म्हणाला, "झालें हें ठीक झालें; पण पार्लमेंट फुसकी न ठरो म्हणजे झालें."

डीकच्या अध्यक्षतेखालीं सर्व सभासद एकत्र झाले व त्यांनीं या बादशाही खलित्याचा सांगोपांग विचार करून ठरविलें कीं, पूर्ण स्वराज्याखेरीज ऑस्ट्रियाचा व आपला समेट होणें शक्य नाहीं. यानंतर नवी निवडणूक झाली. त्यांत ३३३ जागांपैकीं डीकच्या अनुयायांनींच २०० जागा काबीज केल्या. या बाकीच्या १३३ मध्येंही कांहीं उवलज्जहाल म्हणजे पूर्ण स्वातंत्र्यवादी होते, व थोडेसे मवाळ होते. पण तेही हंगेरि सर्वाधिकारसंपन्न असावे असेंच म्हणणारे होते. एकंदर लोकसभेंत ऑस्ट्रियाचे पक्षपाती मात्र कोणीच नव्हते.

१४ डिसेंबर १८६५ रोजीं बादशहानें हंगेरियन लोकसभा उघडली. त्या-वेळीं त्यानें हंगेरियन पोषाक केला असून भाषणही हंगेरियन भाषेंतच केलें. व त्यांतही उदारपणाचा खूपच आंव आणला होता. त्यानें हंगेरीला अंतर्गत व्यवस्थेमध्यें थोडेसें हक्क देऊन मुख्यसत्ता व्हिएन्ना पार्लमेंटच्या हातीं राखून ठेवली. स्वराज्याच्या असल्या निर्जीव सांगाड्याला हंगेरियन लोकपक्ष मुळींच भुलला नाहीं. त्यांनीं या सुधारणांबद्दल विचार करून बादशहास स्पष्टपणें कळविलें कीं, 'आम्हांला असलें हप्तेबंदीचें स्वराज्य नको आहे. पूर्ण स्वराज्य पाहिजे. या बाबतींत आम्ही एक रेंसभरही मागें घेणार नाहीं. आणि तें मिळेपर्यंत ऑस्ट्रियाच्या बादशहास आपला राजा न समजतां शत्रूप्रमाणें लेखूं.' बादशहा उद्दामपणें दुर्लक्ष करून व्हिएन्नास निघून गेला, व इकडे डीकपक्षानें जणुं काय आपणांस स्वराज्य मिळालेंच आहे, असें समजून राज्यकारभारास सुरुवात केली. इतक्यांत कर्म-धर्मसंयोगानें प्राशिया व इटली यांचें सख्य होऊन प्रशियानें ऑस्ट्रियाशीं युद्ध

पुकारलें. हें पाहून बादशहा घाबरून गेला व अशा आपत्प्रसंगीं मागील सर्व वैर विसरून डीकशीं पुन्हां सामोपचाराचें बोलणें सुरू केलें. डीकनें एकच सडेतोड उत्तर दिलें, 'अगोदर हंगेरीस स्वराज्य, मग इतर वाटाघाटी.' इकडे प्रशियानें चढाईस सुरुवात करून प्रेग काबीजही केलें. हें पाहून बादशहा फ्रान्सिस जोसेफ अगदींच गर्भगळित झाला व त्यानें ताबडतोब डीकला व्हिएन्ना येथें बोलावून आणिलें. डीक बादशहासमोर आल्यावर बादशहानें कंपित स्वरानें विचारलें, 'डीक मी आतां काय करूं?' डीकनें दिलेला जबाब ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे. तो म्हणाला, हंगेरीस स्वराज्य देऊन तिच्याशीं सख्य करणें हा एकच मार्ग आहे.' 'पण मीं हंगेरीस स्वराज्य दिलें तर हल्लींच्या युद्धांत हंगेरी मला मदत करील काय?' या बादशहाच्या प्रश्नावर डीक निर्भीडपणानें म्हणाला, 'नाहीं. माझ्या मायभूमीच्या स्वातंत्र्याचा अशा तऱ्हेनें सवदा करण्यास मी तयार नाहीं.'

इकडे प्रशियानें ऑस्ट्रियास खूप चोप दिला व त्याचा पूर्ण पराभव केला. आतां बादशहाचे डोळे उघडले व साम्राज्यरक्षणार्थ कांहीं उपाय योजल्या-खेरीज गत्यंतर नाहीं, असें त्याच्या प्रत्ययास आलें. तरीही त्याचें मंत्रिमंडळ दडपशाही करण्याबद्दल त्यास सल्ला देत होतेंच. परंतु गतानुभवावरून दडप-शाहीचा कांहीं उपयोग होत नाहीं. हें त्याच्या पूर्ण ध्यानीं आल्यामुळें त्यानें दडपशाहीचा मार्ग सोडला व जुनें मंत्रिमंडळ रद्द करून व्यूस्ट यांस प्रधान नेमिलें व हंगेरीशीं सलोखा करण्याविषयीं त्यास आज्ञा दिली. व्यूस्टनें सर्व परिस्थितीचा विचार करून ठरविलें कीं, हंगेरीला स्वराज्य दिल्याखेरीज सख्य होणें शक्य नाहीं.

तारीख १९ नोव्हेंबर सन १८६६ रोजीं बादशहानें एक जाहिरनामा काढून हंगेरीला स्वराज्य देण्याचा उद्देश ध्वनित केला. डीकचा या जाहिरनाम्यावर विश्वास बसेना; तेव्हां व्यूस्ट स्वतः डीकच्या मुलाखतीस गेला. डीकनें आपल्या राष्ट्राचें म्हणणें स्पष्टपणें सांगितलें. व्यूस्टला तें पटलेंही; परंतु व्यूस्ट याचेंही पद डळमळीतच होतें. बेलक्रेडी हा मुख्य प्रधान त्याच्यावर होता. त्यामुळें त्याला आपल्या अधिकारांत कांहींच करतां येईना. तेव्हां तारीख १५ डिसेंबर १८६६ रोजीं डीकनें बादशहाला स्पष्टपणें कळविलें, 'आम्हांस पूर्ण लोकसत्ता पाहिजे व तुम्हांस पूर्ण अनियंत्रित राजसत्ता पाहिजे. तुमचें आमचें जुळणें शक्य दिसत नाहीं.' त्या डीकच्या निर्भीड उत्तरानें बादशहा चिडून गेला

त्यानें सर्व हंगेरियनांस सक्तीनें लष्करांत दाखल होण्याबद्दल हुकूम सोडला. हंगेरीचे लोक फ्रान्सिस जोसेफला आपला राजाच मानावयास तयार नव्हते. त्यांनीं अर्थातच हा हुकूम धाब्यावर बसविला; इतकेंच नव्हे, तर लोक असल्या अन्यायाच्या हुकुमानें जास्त चवताळले मात्र ! या वेळीं डीकनें मोठ्या प्रयासानें शांतता राखिली; व बादशहास 'शेवटचा' खलिता देऊन एक शिष्टमंडळ पाठविलें व अत्यंत कडक भाषेंत हा जुलमी कायदा रद्द करण्याबद्दल बजाविलें. बादशहा हतबल झाला. त्यास दुसरा उपाय सुचेना. तेव्हां मोठ्या नाइलाजास्तव तो हंगेरीच्या मागण्या पूर्ण करण्यास तयार झाला. सन १८६५ मध्यें बादशहानें बेलक्रेडी यास पदच्युत करून ब्युस्ट यास मुख्य मंत्री नेमिलें व ब्युस्ट यानें आपल्या मागील अभिवचनाप्रमाणें स्वराज्यदानाची तयारी चालविली.

यानंतर सुमारें चारच दिवसांनीं ज्युलियस अँन्ड्रासी यास हंगेरीचा मुख्य प्रधान होण्यासाठीं बोलविलें. हाच अँन्ड्रासी १८४८ सालीं हंगेरियन–स्वातंत्र्यासाठीं ऑस्ट्रियाशीं लढला होता व याला जिवंत पकडण्यासाठीं हजारों रुपयांचें बक्षीस बादशहानें लाविलें होतें.

ता. १८ फेब्रुवारी सन १८६७ रोजीं बादशहाचा संदेश ऐकण्यासाठीं हंगेरियन लोकसभेची बैठक जमली. त्या बादशाही जाहिरनाम्यांत लष्करी कायदा रद्द केला असून हंगेरीला पूर्ण स्वराज्यदान दिलें होतें. हा बादशाही जाहिरनामा ऐकतांच लोक आनंदानें अगदीं बेहोष होऊन गेले.

करारनाम्यावर हंगेरीच्या वतीनें डीकनें व ऑस्ट्रियाच्या वतीनें ब्यूस्टनें सह्या केल्या, व बादशहानेंही त्याला आपली संमति दिली. बादशहानें हंगेरीचें स्वराज्य व स्वातंत्र्य मान्य करून साम्राज्यांतील एक घटक या नात्यानें हंगेरीनें किती भाग उचलावयाचा हेंही हंगेरीनेंच ठरवावें यास संमति दिली. सर्व राजकीय गुन्हेगारांना पूर्ण माफी देऊन हंगेरीचें स्वातंत्र्य उपभोगण्यास त्यांस मार्ग खुला केला; इतकेंच नव्हे तर ज्या ज्या देशभक्तांनीं हंगेरीला स्वातंत्र्य प्राप्त व्हावें म्हणून आपले देह धारातीर्थी ठेविले होते त्यांच्या बायकापोरांच्या पोटापाण्याचीही त्यानें व्यवस्था केली. सन १८६७ जून ७ रोजीं तो पेस्त येथें स्वातंत्र्याची सनद देण्यासाठीं आला त्यावेळीं शहरांत सर्वत्र मेजवान्या नाचरंग यांची दंगल उडून गेली.

याप्रमाणें हंगेरीच्या स्वातंत्र्यसंपादनाच्या मंगल इतिहासाचा गोड शेवट झाला. पण या सर्व चळवळीचा आत्मा डीक याजबद्दल धन्योद्गार काढतांना ऐरिश स्वातंत्र्यसंपादक ऑर्थर ग्रिफिथ म्हणतोः—

"शहरांत सर्वत्र आनंदोत्सव चालले होते, तरी डीक त्यांत सामील झाला नाहीं. तो शांतवृत्तीचा मनुष्य असून त्यास गाजावाजा अगदीं आवडत नसे. हंगेरीच्या लोकसभेनें त्यास आपला कायमचा प्रतिनिधी म्हणून निवडला; पण त्यानें ही मानाची जागा नाकारली. शेवटीं बादशहानें अँड्रासीला विचारलें, 'डीकचा मी सन्मान तरी कसा करूं?' अँड्रासी म्हणाला, 'महाराज, तुमच्याजवळ अलोट संपत्ति आहे. तुम्ही क्षणांत रंकाला रावही कराल, अनेक पदव्या मान-मरातबही द्याल, पण या सर्व गोष्टी इतर माणसांसाठीं आहेत. डीकचा असल्या अशाश्वत गोष्टींनीं सन्मान कोणासही करतां येणार नाहीं.' बादशहानें आपला व राणीचा एकत्र असलेला फोटो एका उत्कृष्ट रत्नजडित चौकटींत बसवून डीककडे पाठविला. तो डीकनें मोठ्या आदरानें परत केला. तेव्हां डीकला पाहिजे तरी काय? या महानुभावाचा मी सत्कार तरी कसा करूं? अशी बाद-शहास मोठी विवंचना उत्पन्न झाली. त्या वेळी त्या महापुरुषानें उत्तर दिलें, 'सरकार, डीक मेला म्हणजे तो एक सच्चा मनुष्य होता, एवढें म्हटलेंत म्हणजे मला सर्व मिळालें?'

मुख्य प्रधानाची जागा डीकनें नाकारली. मंत्रिमंडळांतही काम करण्याचें त्यानें नाकारलें. जेथें त्याचें घर होतें, त्या ठिकाणीं शांतपणें वानप्रस्थाप्रमाणें आपलें शेष आयुष्य घालविण्याचा त्याचा विचार होता. परंतु लोकांस तो अद्याप पाहिजे होता; व तो मोठ्या कष्टानें लोकसभेचा एक साधारण सभासद म्हणून राहिला. तो जरी एक साधारण सभासद म्हणून लोकसभेंत होता तरी कोणत्याही प्रधानापेक्षां त्याचा अधिकार फार मोठा होता. याप्रमाणें हा थोर पुरुष सन १८७६ सालीं कालवश झाला. सर्व हंगेरी देश शोकसागरांत बुडाला. लोकांस आपला प्रत्यक्ष पिताच वारल्याप्रमाणें दुःख झालें, खरा देशभक्त, अत्यंत निस्वार्थी असा हा महानुभाव होऊन गेला. खुद्द हंगेरीच्या राजाराणीलाही त्याच्या मृत्यूमुळें फार वाईट वाटलें. 'अत्यंत मोठा व असामान्य पुरुष आज नाहींसा झाला.' असे खुद्द बादशहानें उद्गार काढले.

———

## हिंदुस्थान व हंगेरी.

केवळ असहकारितेच्या बळावर शत्रूस नामोहरम करून आपलें स्वातंत्र्य संपादन केलें असें एकच एक उदाहरण हंगेरीचें आहे. हंगेरीनें ज्या पद्धतीनें असहकारिता केली व ती घडवून आणण्यासाठीं तेथील पुढाऱ्यांनीं जे मार्ग अवलंबिले ते कोणत्याही जित राष्ट्रास मार्गदर्शक म्हणून नेहमींच उपयोगी पडतील! आयर्लंडांतील सिनफेन चळवळीचा आद्यजनक आर्थर ग्रिफिथ यानें हंगेरीच्या पुनरुत्थानाचा इतिहास किल्ल्याप्रमाणें आपल्या डोळ्यांसमोर ठेवून आयर्लंडमध्यें चमत्कार घडवून आणले; तो इतिहास ताजा असल्यानें त्याचें येथें पुनः स्मरण करून देण्याचें कारण नाहीं.

हंगेरीनें आपली चळवळ अनेक मार्गांनीं एकदम सुरू केली. शिक्षण, शेती, औद्योगिक व राजकीय इतक्या प्रकारची चळवळ सुरू केली आणि त्यामुळें राष्ट्राचें अंतिम साध्य जें स्वातंत्र्य तें प्राप्त करून घेण्याच्या कामीं देशांतील सर्व प्रकारच्या लोकांचा समावेश व उपयोग निरनिराळ्या रूपानें कां होईना; पण एक उद्दिष्ट साध्य करण्याच्या कामीं होऊं लागला. बरेच दिवस परसत्तेखालीं रगडून गेल्याकारणानें आहे त्या स्थितींतच समाधान मानून घेणारा एक वर्ग असतोच व तसा वर्ग हंगेरींतही होता. परंतु देशाची अनेक प्रकारें उन्नति करण्याची खटपट देशभक्त करीत असतां केवळ परकीय सत्तेमुळें आपण नाडले जात आहोंत याची जाणीव त्यांना होऊं लागतांच तेही या राष्ट्रोद्धाराच्या कामीं येऊन मिळाले. कसलीही परकीय सत्ता असली तरी प्रजेच्या, नैतिक संमतीखेरीज तिजवर राज्य करणें अशक्य असल्यामुळें ज्या संमतीवर परकीय सत्ता उभी आहे ती जनसंमति काढून घेतली म्हणजे वाळुवरील इमारती-प्रमाणें परकीय सत्तेचा जनसंमतिरहित असलेला डोलारा कोसळून पडल्याखेरीज राहणार नाहीं अशी खुणगांठ हंगेरियन देशभक्त कोसूथ व डीक यांनीं बांधून त्याप्रमाणें जनसंमतीचा एकएक चिरा ते उखळूं लागले.

ही जनसंमति म्हणजे काय? जनसंमतीचें व्यक्त स्वरूप म्हणजे देशांतील राजशासन संस्था होत. अर्थात् त्या शासनसंस्थाच लोकांनीं, खऱ्या राष्ट्र-भक्तांनीं, काबीज केल्या म्हणजे परकीय सत्तेची इमारत पोखरल्याप्रमाणेंच होणार, हें जाणून त्यांनीं अगदीं बारिकसारीक, अल्पस्वल्प संस्थाही लोकप्रति-निधींच्याद्वारानें काबीज करण्याचें ठरवून त्याप्रमाणें ग्रामसंस्थांपासून तों

डाएटपर्यंतचें सर्व शासनयंत्र त्यांनीं हस्तगत करून घेतलें; व अशा प्रकारें सर्व राज्ययंत्र हस्तगत केल्यामुळेंच हंगेरीच्या पुढाऱ्यांस ऑस्ट्रियानें देऊं केलेल्या सुधारणा धिक्कारपूर्वक धुडकावून लावतां आल्या. जें सांपडेल तें कबजांत घेऊन जास्तीसाठीं झगडत बसणें हीच राजकारणांतील मुख्य किल्ली आहे.. हिंदुस्थानाप्रमाणें हंगेरीनें डाएटवर बहिष्कार पुकारला असता तर तेथेंही डाएटच्या जागा भरण्यास सरकारचे बगलबच्चे मिळाले नसते असें नाहीं. परंतु हंगेरीच्या पुढाऱ्यांनीं अत्यंत धूर्तपणानें तशी वेळच येऊं न देतां, देशभक्तांनींच डाएटच्या जागा भरून टाकल्या; व जागा काबीज केल्यानंतर त्या लोकसभेनें इतर फालतू ठराव करण्याच्या भरीस न पडतां फक्त आपली स्वातंत्र्याची मागणीच तेथून एकसारखी नेटानें, व चिकाटीनें मागण्याचा क्रम सुरू ठेवला. हंगेरीच्या लोकसभेंत याप्रमाणें सर्वच जनतेचे खरेखुरे प्रतिनिधी निवडले गेल्याकारणानें दडपशाही केल्याखेरीज तेथें राज्य करणेंच ऑस्ट्रियन नोकरशाहीला अशक्य झालें. एक तर दडपशाहीचा मार्ग अवलंबणें अगर लोकांच्या मागण्या मान्य करणें अशी परिस्थिति, तेथें लोकांनीं ऑस्ट्रियन सरकारनें निर्माण केलेलें राज्ययंत्रच काबीज केल्यामुळें, निर्माण झाली; व हंगेरीवरील ऑस्ट्रियाची सत्ता म्हणजे एक थट्टेचा विषयच होऊन बसला.

मुख्य सत्ता उभी राहण्याला खालपासून, म्हणजे ग्रामसंस्थांपासून अगदीं वरपर्यंतच्या ज्या संस्था असतील त्यांचे धागे मुख्य सत्तेशीं निगडित असले पाहिजेत तरच मुख्य सत्ता नेटानें उभी राहूं शकेल. या संस्था काबीज केल्यामुळें हंगेरियन लोकांनीं कसा उपयोग करून घेतला तें पाहण्यासारखें आहे.

हंगेरीनें स्वोद्धाराच्या चळवळींत जे अनेक उपाय अमलांत आणले त्यांत व्यापारी संघ स्थापन करून देशी उद्योगधंद्यांचें पुनरुज्जीवन किंवा स्वदेशीची केलेली अत्यंत यशस्वी चळवळ ही होय ! व ही चळवळही यशस्वी होण्यास कारण तालुका कौन्सिलापासून जिल्हा, प्रांत व मुख्य डाएटपर्यंत सर्व प्रतिनिधींच्या जागा खऱ्याखुऱ्या लोकप्रतिनिधींनीं भरून काढल्या होत्या हें होय ! त्यामुळें अगदीं स्वाभाविकपणें देशी मालाचा देशांत सर्वत्र सुलभपणें प्रसार करतां आला. कारण देशी उद्योगधंद्यांस या कौन्सिलांचा सर्वतोपरी पाठिंबा असल्यामुळें अल्पावधींतच देशी धंदे इतके फोंफावले कीं, ऑस्ट्रियन भांडवलवाल्यांची त्रेधा उडून त्यांनीं ऑस्ट्रियन नोकरशाहीच्या हातून सर्व व्यापारी संघच बेकायदा ठरवून

टाकले. यामुळें देशाची बरीच हानी झाली; तरी दुसरा फायदाही पण झाला. तो असा कीं, देशांतील उद्योगधंदे वाढल्यामुळें हंगेरियन जमिनदार वर्गानें आपलें बरेंच भांडवल देशी कारखान्यांत घातलें व नवे कारखानेही उभारले. परंतु नोकरशाहीच्या दडपशाहींत देशी धंद्यांची आहुति पडल्यामुळें त्या वर्गाचें अतिशय नुकसान झालें व स्वाभाविकपणेंच धनिकवर्ग राष्ट्रीय चळवळींत येऊन दाखल झाला.

पुढें ज्या वेळीं कोसूथ वगैरे पुढारी स्वातंत्र्याची चळवळ करण्याच्या पातकावरून (!) हद्दपार करण्यांत आले, त्यावेळीं त्यांनीं परदेशांत हंगेरियन लोकांच्या न्याय्य हक्कांबद्दल लोकमत तयार करण्याचें काम तर चालविलेंच; पण त्याबरोबर हंगेरियन मालाला परदेशांत गिऱ्हाईकही मिळवून प्रत्येक देशांत आपली व्यापारी वकिलात स्थापन केली. लो० टिळक यांची याच प्रकारची कल्पना असून ते विलायतेंत शिष्टमंडळांत गेले व तेथील कामाचा जो अहवाल त्यांनीं कॉंग्रेसला सादर केला त्यांत त्यांनीं अशा वकिलातींच्या उपयुक्ततेबद्दल स्पष्ट विवेचन केलें होतें. परंतु त्यावेळीं जे मार्ग उपकारक म्हणून ठरले गेले होते ते सर्वच रद्द ठरविण्यांत आल्यामुळें लो० टिळकांची ती इच्छा अतृप्तच राहिली.

हंगेरीवर ऑस्ट्रियानें नानाप्रकारचे प्रयोग करून पाहिले, आमिषें दाखविलीं, बलप्रयोग केला, दडपशाही केली, वर्तमानपत्रांचा कायदा लागू केला, सुधारले या जुलुमांचे सर्व प्रयोग तेथें करण्यांत आले; परंतु ऑस्ट्रियाला आपलें राज्य हंगेरीवर आहे, असा विश्वासच वाटेना व याचें कारण एकच व तें म्हणजे, ज्या राज्ययंत्राच्या बळावर, ज्या लोकसंमतीच्या जोरावर, तो तेथें राज्य करूं पाही तें राज्ययंत्र व ती जनसंमति सर्वस्वीं देशाभिमानी अशा हंगेरियन लोकांच्या ताब्यांत व त्यामुळेंच कायदेभंगाचें शेवटचें स्वरूप जें करबंदी तें हंगेरीला दाखवितां आलें. लोकसभा उधळून लावा, व्हॉइसरॉय वरचेवर बदला, लष्करी अम्मल पुकारा—त्याची किंचितही पर्वा हंगेरियन लोकांनीं केली नाहीं; याचें कारण राजशासनाचीं लहानमोठीं सर्व यंत्रें त्यांच्या हातांत होतीं आपल्या इच्छेप्रमाणें त्यांस ते गती देऊं शकत होय.

हंगेरीनें ऑस्ट्रियाशीं असहकारिता केली म्हणजे आपण रुसून बसून इतरांना हें आपल्या जागा घेऊं दिल्या नाहींत. तर जेथें जेथें म्हणून आपला प्रवेश होणें शक्य होतें त्या त्या सर्व जागा अगोदर त्यांनीं भरून काढल्या; आणि मग

कौन्सिलांत त्यांनीं सरकारशीं टकरीला आरंभ केला. त्यामुळें सरकारला आम्ही जनसंमतीवर राज्य करीत आहों, असें हिंदुस्थानाप्रमाणें, सांगण्यास तोंडच राहिलें नाहीं.

हिंदुस्थानांतील स्थिति त्याच्या सर्वस्वीं उलट आहे. आपण रुसून बसल्यानें इतरांस आयतेंच मोकळें रान सांपडलें. सरकारीवृत्तीच्या लोकांनीं तर कौन्सिलें भरून गेलीं व आम्हीं जनसंमतीवर हिंदुस्थानांत राज्य करीत आहोंत, ही सरकारची वढाई खरी ठरली. कॉंग्रेसनें सुधारणा अपुऱ्या, निराशाजनक म्हटल्यानें त्या लोकांवर लादावयाच्या राहिल्या नाहींत; इतकेंच नव्हे तर कौन्सिलें रिकामीं पाडण्याच्या उद्देशानें जो बहिष्कार पुकारला गेला तोही खोटा ठरला. कायदेभंग हें असहकारितेंतील शेवटचें अस्त्र! त्याचा उपयोग, यशस्वी उपयोग करावयास पाहिजे होता तर जेथून कायदे निर्माण होतात तीं ठिकाणेंच कॉंग्रेस-नें हस्तगत केलीं असतीं व तेथूनच कायदेभंग पुकारला गेला असता तर त्यांत कांहीं तरी यशाची आशा होती. परंतु असहकारितेच्या बाबतींत चुकीची जी मालिका सुरू झाली, त्यांतील चुकांमुळें देशाची प्रगति तर झाली नाहींच, परंतु देशांत दुही उत्पन्न झाल्यामुळें नोकरशाही मात्र जोरावली.

याशिवाय बादशाही जाहिरनामे, बादशहांचें आगमन, नव्या युगाचा प्रारंभ, नानाप्रकारचीं अभिवचनें वगैरे नेहमींचीं धोरणें सर्व जेत्या लोकांचीं एकसारखींच असतात; व हंगेरीप्रमाणें येथेंही त्यांचा प्रयोग करण्यांत आला. आम्हीं येथें सुधारणा त्याज्य म्हणून कायदी घोडे नाचविले, परंतु लोकप्रतिनिधींनीं भरलेलीं कौन्सिलें बादशहांच्या काकांनीं खुलीं केलीं. हंगेरीनें मात्र बादशहास चांगलाच धडा शिकविला. बादशहांच्या सुधारणा नुसत्या त्याज्य म्हणून त्यांनीं ठरविल्या नाहींत; तर सुधारलेलीं कौन्सिलें खुलीं होतांच पहिलाच ठराव हंगेरीच्या स्वातंत्र्या-च्या मागणीचा त्यांनीं पसार केला व बादशहांच्या हातूनच लोकसभा बंद करवून सुधारणा त्याज्य ठरविल्या. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या चळवळीस आतां कोठें प्रारंभ झाला आहे व ही चळवळ ज्या मार्गानें करावी असें म्हटलें जातें, तो यशस्वीपणें अंगिकारावयाचा असल्यास हंगेरीच्या पुनरुत्थानाचा इतिहास बराच मार्गदर्शक होईल.

—३—

# स्वतंत्र आयर्लंड.



Freedom's highway is a narrow and a thorny road bestrewn with many obstacles, and those who would walk there must have perseverance, earnestness, self-restraint, and above all, courage, moral as well as physical. An academic belief in liberty is well enough but it will never set free a country.

*O'Sheil.*

आज आयर्लंडला कानडा वगैरे देशांप्रमाणें जें वसाहतीचें स्वराज्य प्राप्त झालेलें आहे तें स्वराज्य हें आयरिश लोकांचें ध्येय नसून डी व्हॅलेरा पक्ष व फ्री-स्टेटवाले यांच्यांत जो झगडा चालला होता तें आयर्लंडचें मूळ ध्येय होतें. 'आयरिश स्वातंत्र्याच्या बाबतींत तडजोड ही गोष्टच नाहीं; स्वातंत्र्य हेंच आयर्लंडचें ध्येय; आम्हाला होमरूल नको, किंवा वसाहतीच्या दर्जाचें स्वराज्यही नको. इंग्लंडला आमचें शेवटचें एकच सांगणें आहे कीं, येथून चालते व्हा.' हें डी व्हॅलेरापक्षाचें म्हणणें आहे. परंतु अनेक शतकांच्या कटकटीनें सर्व देश त्रस्त झाला, देशांत शांतता नाहींशी झाली, सुरक्षित जीवनक्रम नाहींसा झाला. या सर्व आपत्तींनीं गांजून गेल्यामुळें ग्रिफिथ व कॉलिन्स यांनीं वसाहतीच्या दर्जाच्या स्वराज्याची तडजोड मान्य केली. या तडजोडीसंबंधानेंच देशांत अंतस्थ कलह माजून जाळपोळी, रक्तपात व मधून मधून मोठमोठ्या कार्यकर्त्यांचे बळी पडले. अशी स्थिति असली तरी आज आयर्लंडवर इंग्लंडची केवळ नाममात्र सत्ता असून आयर्लंड स्वतंत्र राष्ट्राच्या दर्जास प्राप्त झाला आहे. ही स्थिति प्राप्त करून घेण्यास आयर्लंडला परमावधीचा स्वार्थत्याग आणि अकल्पनीय कष्ट सोसावे लागले आहेत. आयरिश स्वातंत्र्याचा इतिहास हा अनेक शतकांचा आहे. तो सर्व इतिहास अत्यंत मनोरंजक व स्फूर्तिदायक असला तरी येथें द्यावयाचा नसून आयरिश देशभक्तांनीं परकीयांच्य मगरमिठींतून सुटण्यासाठीं ज चळवळींची शृंखला सर्व देशभर उत्पन्न करून तिच्या द्वारें लोकमत कसें तयार केलें व आपलें उद्दिष्ट कसें साध्य केलें, त

हिंदुस्थानांतील प्रचलित स्थितीला उपयुक्त असल्यानें थोडक्यांत येथें सांगण्याचा विचार आहे.

सुमारें दीड तपापूर्वी म्हणजे सन १९०४ सालीं सिनफेन चळवळीचा आद्य जनक मि. आर्थर ग्रिफिथ यांनीं 'हंगेरीचें पुनरुत्थान' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्या इतिहासांत सिनफेन चळवळीचीं बीजें आहेत. केवळ स्वावलंबनाच्या जोरावर परकीय सत्तेच्या जळूनें निस्त्राण केलेला हंगेरी, वैभव-संपन्न कसा झाला व त्यानें आपलें स्वातंत्र्य कसें संपादन केलें याचा तो इतिहास असून ज्या मार्गानें हंगेरीनें आपलें स्वातंत्र्य मिळविलें त्याच मार्गाचा अवलंब केल्यास आयर्लंड स्वराज्य संपादन करील अशीं तत्त्वें आर्थर ग्रिफिथ यानें जनतेपुढें मांडण्याचा उपक्रम केला. व तेव्हांपासून आयर्लंडच्या इतिहासांत सिनफेन म्हणून प्रसिद्ध असलेल्या चळवळीचा जन्म झाला. तारीख २८ नोव्हेंबर सन १९०५ रोजीं सिनफेनर्सची प्रथम परिषद भरविण्यांत आली व हंगेरीच्या धोरणावर ही चळवळ सुरू करण्यांत आली म्हणून या चळवळीचें नांव प्रथम Hungarion Policy असें ठेवण्यांत आलें. परंतु आपल्या चळवळीस परकीय नावाचा संबंधही नको असें आयरिश देशभक्तांनीं ठरवून Sinn Fein हें नांव धारण केलें. या शब्दाचा उच्चार Shin Fane सिनफेन असा केला जातो. व सिनफेन म्हणजे 'स्वावलंबन.'

सिनफेनर्चीं चळवळ म्हणजे अत्याचार, रक्तपात, दंगेधोपे करून आपला हेतु साध्य करून घेणाऱ्या लोकांची चळवळ, असा समज साधारण प्रचलित आहे. परंतु आर्थर ग्रिफिथ यानें सिनफेनच्या पहिल्या परिषदेंत आपल्या चळ-वळीची रूपरेखा आंखली ती विध्वंसक स्वरूपाची बिलकूल नसून विधायक स्वरूपाची अशीच होती. सिनफेन चळवळीचा मूळारंभ ग्रामसंस्थांपासून होऊन व ग्रामसंस्था, तालुका जिल्हा प्रांतिकमंडळें, लोकलबोर्डस् व म्युनिसि-पालिट्या यांसारख्या सर्व संस्थांतून आपलीं माणसें घुसडून त्या संस्था काबीज करून राज्ययंत्र हस्तगत करणें हा या चळवळीचा मूळ उद्देश होता. याप्रमाणें या संस्था हस्तगत झाल्यावर सर्व आयरिश राष्ट्राचें एक राष्ट्रीय मंडळ स्थापन करावयाचें, त्यांत तीनशें प्रतिनिधि वरील संस्थांनीं निवडून दिलेले असून कोणत्याही आयर्लंडच्या प्रश्नांसंबंधीं परदेशस्थांशीं व परठिकाणीं त्यांनीं वाटाघाट न करतां येथेंच आयरिश पार्लमेंटचें प्रतिनिधि जमून काम करावें. सर्व महत्त्वाच्या

प्रश्नांची वाटाघाट करून कोणत्या पद्धतीवर काम करावयाचें हें त्यांनींच ठरवून त्यासाठीं कमिट्या वगैरे नेमणें हीं कामेंही या आयरिश पार्लमेंटनेंच करावीं, व या पार्लमेंटनें ठरविलेल्या योजना योग्य प्रकारें प्रांतिक, जिल्हा, तालुका व ग्राम-मंडळांनीं अमलांत आणाव्या. म्हणजे खालपासून वरपर्यंत सर्व खात्यांवर देख-रेख या पार्लमेंटची रहावयाची. या स्थानिक मंडळींनीं पन्नास ते साठ लक्षांची रक्कम उभी करून तीनशें सभासदांचें मंडळ ठरवील त्याप्रमाणें त्या रकमेचा विनियोग करावयाचा. ही योजना यशस्वी कशी होईल याबद्दल ग्रिफिथ म्हणतो, "समजा, आयरिश पार्लमेंटनें ठरविलें कीं, आयर्लंडमध्यें सर्वत्र शारीरिक शिक्षणासाठीं व आयर्लंडच्या इतिहासाचें शिक्षण देण्यासाठीं कांहीं एक रक्कम खर्च करावी असें ठरल्यावर स्थानिक मंडळांनीं त्या प्रमाणांत कर बसवून ठरविल्याप्रमाणें तो खर्च करावा. यामुळें कार्यांत एकसूत्रीपणा उत्पन्न होईल व ब्रिटिश कायद्याला धक्काही न लावतां आयरिश पार्लमेंटची शिफारस-कारण आयरिश पार्लमेंटचे ठराव अगर कायदे हे शिफारशी दाखलच समजाव-याचे-कायद्याप्रमाणें अंमल करूं शकेल." ऑर्थर ग्रिफिथ म्हणतो, "थोडक्यांत आमचें धोरण सांगावयाचें, म्हणजे लोकांना स्वावलंबी करून केवळ जनतेच्या नैतिक शक्तीच्या जोरावर डब्लिन येथें राष्ट्रीय कायदेमंडळ स्थापन करावयाचें."

सिनफेनच्या चळवळीचा व्याप एवढ्यापुरताच नव्हता, तर या चळवळीच्या अनुषंगानें आर्थर ग्रिफिथ यानें इतरही चळवळी सुरू केल्या. यांतील प्रमुख म्हणजे राष्ट्रीय शिक्षणाची. इंग्लिश शिक्षणपद्धति ही अतिशय सदोष असून राष्ट्रीयत्वाची सर्वस्वी हानी करणारी व स्वाभिमान नष्ट करणारी असल्यानें आयरिश लोकांस आपणां स्वतःविषयीं अविश्वास उत्पन्न होऊन साम्राज्याभिमानाची घातुक वाढ उत्पन्न करते, यासाठीं आयरिश लोकांनीं प्राथमिक-शिक्षणाच्या शाळा काढाव्या ही आर्थर ग्रिफिथ याची योजना होती. या शाळांचा खर्च कांहीं वर्गणींतून व कांहीं आयरिश शिक्षणफंड नांवाचा एक मोठा फंड उभारून व त्याच्या शाखा सर्वत्र पसरून त्यांतून चालवावा. एकदम सर्व सरकारी शाळांवर बहिष्कार मात्र घालूं नये; कारण अशा रीतीनें आजच्या सरकारी शाळांवर बहिष्कार घातला तर शाळेंत जाणाऱ्या मुलांच्या शिक्षणाची सोय आपणांस करणें कठीण जाईल. यासाठीं प्रथम आपण आयरिश शिक्षण संस्थांचे जाळेंच सर्व आयर्लंडभर निर्माण करूं व तें कार्य यशस्वी रीतीनें पूर्ण झालें, म्हणजे मग सरकारी शाळांवर बहिष्कार

पुकारून त्या ओस पाडूं व त्या शाळांतून अशा प्रकारचें शिक्षण देऊं कीं, त्यांतील प्रत्येक विद्यार्थ्यास मातृभूमीची सेवा करण्यांत भूषण वाटलें पाहिजे." अशी आर्थर ग्रिफिथची विचारसरणी होती.

हल्लीं दुय्यम शिक्षणाचीं सर्व सूत्रें आयरिश ख्रिश्चन ब्रदर्स, या संस्थेच्या हातीं आहेत. या संस्थेनें आयर्लंडमधील इतर शिक्षणविषयक संस्थांच्या साह्यानें ब्रिटिश ग्रॅन्टस बंद करून त्या जागीं आपणांस तशी पद्धत कशी सुरू करतां येईल हें ठरवावें. नवीन शिक्षण संस्था काढण्यापेक्षां सर्व साधनांनीं समृद्ध असलेल्या जुन्या ताब्यांत घेणें हेंच अधिक श्रेयस्कर होतें; कारण त्यामुळें श्रमाचा व संपत्तीचा विनाकारण होणारा फाजील व्यय वांचून राष्ट्रीयत्वाची हानि करणारें शिक्षण नाहींसें होऊन राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य सुकर होईल असें त्याचें मत होतें. शिक्षण उत्पन्न करणें हें काम-ब्रिटिश कायदे मंडळाच्या हातीं नसून सर्वस्वीं आपल्या हातीं आहे, अशी आर्थर ग्रिफिथ याची श्रद्धा होती.

औद्योगिक शिक्षणासंबंधीं ग्रिफिथ याची सूचना होती कीं, प्रत्येक ग्राम-संस्थेनें दर पौंडामागें एक पेन्स कर बसवून राष्ट्रीय मंडळाच्या साह्यानें, त्याचा विनियोग औद्योगिक शिक्षण, वाचनालयें, आखाडे स्थापन करणें वगैरे गोष्टींकडे करावा.

'बोर्डस् ऑफ पुअर लॉ गार्डियन्स' नांवाची संस्था त्यावेळीं आयर्लंडमध्यें होती. या संस्थेच्या द्वारें दरिद्री आयरिश लोकांसपरदेश गमनास उत्तेजन मिळून परदेशी त्यांची रवानगी करण्याचीही व्यवस्था केली जात असे. व त्या लोकांस जें अन्नवस्त्र दिलें जाई तें परदेशी असे. याबद्दल ग्रिफिथनें अतिशय टीका केली, व असें सुचविलें कीं, या संस्थेची एक सभा भरवून केवळ देशी-मालच त्यांनीं वापरावा अशी खटपट करावी. यायोगानें देशांतील उद्योग-धंद्यास उत्तेजन मिळेल, बेकारी कमी होईल, दारिद्र्य कमी होईल, व ज्या बेकार लोकांस काम मिळत नाहीं त्यांनीं देशांतील ¼ जमीन अगदीं पडीत आहे ती लागवडीस आणली तर त्यांना सुखानें पोटास मिळून त्यांच्या मागच्या हाल-अपेष्टा वांचतील. याशिवाय जिल्हा व तालुका मंडलानें नवे कालवे बांधण्याचीही कामें सुरू करावीं. त्यायोगें वाहतुकीच्या साधनांची सोय होईल. व मजुरांनाही भरपूर काम मिळेल. अशी ग्रिफिथ याची सूचना होती. त्या नंतरची ग्रिफिथची

योजना म्हणजे आयरिश नॅशनल सिव्हिल सर्व्हिस स्थापन करणें. पुअर लॉ बोर्डस् या संस्थांच्या अधिकारी वर्गांतील चार हजार, व ग्रामसंस्था आणि तालुका मंडळें यांतील दोन हजार अधिकारी इतक्यांचा हा राष्ट्रीय सेवासंघ असावा; व आज ब्रिटिश सिव्हिल सर्व्हिसमध्यें कित्येक आयरिश अधिकारीही आहेत त्यांपैकीं कित्येक जण मोठ्या महत्त्वाच्या जागेवरही आहेत, त्या सर्वांनीं राजीनामे देऊन राष्ट्रीयसेवासंघानें जें विस्तृत कार्यक्षेत्र आंखलें आहे त्याला मदत करण्यासाठीं त्यांत येऊन मिळावें.

यानंतर ग्रिफिथची दुसरी व्यापक व महत्त्वाची योजना म्हणजे औद्योगिक होय ! त्यासाठीं त्यानें पुढील कार्यक्रम आंखला:—

( १ ) प्रत्येक आयरिश मनुष्यानें देशीच माल वापरावा; ( २ ) स्थानिक मंडळांनीं देशीच माल घ्यावा; ( ३ ) जो परदेशी माल येईल त्यावर बंदरावरील जकातीच्या बोर्डानें बरीच जकात बसवावी; व विदेशी माल कोणी मागविला आहे त्यांची नांवनिशीवार यादी प्रसिद्ध करावी; ( ४ ) आयरिश कारखान्यांना सर्व प्रकारची मदत करावी; ( ५ ) व आयरिश भांडवल, आयरिश उद्योगधंद्यांची अभिवृद्धि करण्याकडेच उपयोगांत आणावें. या शेवटच्या मुद्यावर ग्रिफिथचा विशेष जोर होता. आयरिश लोकांची पांच कोटींची रक्कम ब्रिटिश बँकांमधून पडली आहे ती सर्व काढून देशी उद्योगधंद्यांत घालावी. एवढेंच नव्हे, तर स्थानिक स्वराज्याच्या संस्थांनींही आपली शिल्लक इंग्रजी बँकांतून काढून घेऊन राष्ट्रीय बँक काढून त्यांत ठेवावी असें ग्रिफिथ याचें म्हणणें असे. औद्योगिक कार्यक्रमांतील ग्रिफिथ याची आणखी सूचना म्हणजे, राष्ट्रीय सराफकट्टा स्थापन करणें ही होय ! स्थानिक स्वराज्याच्या प्रत्येक संस्थेनें आपल्या हद्दींतील सराफांस या राष्ट्रीय सराफकट्टयाचा सभासद बनवून त्यानें या कट्टयावरच काम करावें असा उपाय योजावा, असें त्याचें म्हणणें असे.

देशांतील अंतर्गत व्यापाराच्या वाढीबरोबरच परदेशाच्या दळणवळणासाठीं व्यापारी जहाजें बांधणें हाही एक महत्त्वाचा मुद्दा होता. त्याबद्दल तो म्हणे, 'जलपर्यटणाची सोय आपल्या देशासारखी दुसऱ्या कोणासही नाहीं. व सुदैवानें सर्व युरोपमध्यें आपलीं बंदरें अत्युत्तम सोईचीं आहेत. नॉर्वेनें स्वतः आपलें आरमार बांधलें असून आज नॉर्वेमध्यें प्रत्येक मनुष्य कोणत्या तरी एकाद्या जहाजाचा भागीदार आहेच. आपले पैसे बँकमध्यें सांठवून न ठेवतां नॉर्वेजियन

लोक ते जहाजें बांधण्याकडे खर्च करितात. त्याचप्रमाणें आयरिश लोकांनींही केल्यास लोकांस द्रव्य प्राप्त होऊन देशाचा व्यापारही वाढेल.'

यानंतर ग्रिफिथचा कार्यक्रम परदेशीय चळवळीसंबंधाचा. आयरिश लोकांचे प्रतिनिधि म्हणून चांगले लायख लोक परदेशांत पाठवून तेथें आपल्या वकिलाती स्थापन कराव्या. ब्रिटिश पार्लमेंटमध्यें नुसतें वक्तृत्व करण्यापेक्षां परदेशी यांचा चांगला उपयोग होईल, व आज पार्लमेंटमध्यें ऐशीं प्रतिनिधींना सुमारें २५००० पौंड सालीना खर्च लागतो. त्यांपैकीं निम्मे लोक व निम्मी रक्कम परदेशीं व्यापाराच्या मध्यवर्ती ठिकाणीं ठेवून त्यांसाठीं खर्च केली तरी ती जास्त फलदायी होईल. कारण त्याच्या योगानें आयरिश चळवळींबद्दल परदेशांत माहिती मिळून आयरिश मालाला नवें गिऱ्हाईकही मिळेल. हे वकील राष्ट्रीयमंडळानें निवडावे.

ग्रिफिथच्या कार्यक्रमांतील शेवटचा तपशील लवाद कोर्टाची स्थापना हा होय ! आयरिश लोकांनीं ब्रिटिश कोर्टावर बहिष्कार घालून आपले सर्व खटले आपल्या लवाद कोर्टांतून तोडून घ्यावे, आपण आपले खटले कोर्टांत नेऊन त्यापायीं जो अनर्थावह खर्च करीत आहों, त्यामुळें देशांत एका भ्रष्टन्यायपद्धतीला मदत करीत आहों. तेच खटले आपल्या पंचायतीपुढें चालविल्यास पैसा, श्रम व वेळ हीं वांचतील.

ग्रिफिथ म्हणे " जगाला आपलें अस्तित्व जाणविणें हा आमच्या सिनफेन चळवळीचा उद्देशच आहे; व हा उद्देश केवळ स्वावलंबनाच्या तत्त्वावर आम्ही यशस्वी करणार ! आमच्यांत आत्मविश्वास वाढला तर वाटेल तीं संकटें आलीं तरीही आपली चळवळ आपण पूर्ण यशस्वी करूं. स्वातंत्र्याचा मार्ग सुगम व सोपा नाहीं हें आम्हीं जाणतों. आमचें उद्दिष्ट साध्य होण्यासाठीं आम्हांला आत्यंतिक कष्ट सोसावे लागतील याची पूर्ण जाणीव आम्हांला आहे. आम्ही आपलें राष्ट्र स्वतः-च्या प्रयत्नांवर उभारणार व तें कसें उभारावयाचें तें आमचें आम्हींच ठरवूं. इतरांनीं त्यांत ढवळाढवळ करणें आम्हांला खपणार नाहीं. ब्रिटिश लिबरल पक्ष काय किंवा टोरी पक्ष काय हे दोघेही आम्हांस शत्रूप्रमाणेंच आहेत. आणि जे लोक ब्रिटिश राज्यपद्धतीच गैर आहे असें म्हणतात, तेही त्याच वर्गांतील. ब्रिटिश राज्यपद्धति वाईट कीं चांगली याबद्दल आम्हांस कांहींच कर्तव्य नाहीं. आमचा मुख्य कटाक्ष कायतो त्यांच्या आयर्लंडमधील राज्यपद्धतीवर आहे; व आमचा विरोध त्या राज्यपद्धतीला असून, विरोध करणें हें प्रत्येक आयरिश देशभक्ताचें

पवित्र कर्तव्य आहे. या कार्यासाठीं आयरिश देशभक्त जितके मिळतील तितके जमविणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे.''

सिनफेन पक्षाचें ध्येय, तत्त्वें व साधनें यांत नवीन असें कांहींच नाहीं. जें कांहीं नाविन्य, जी कांहीं अपूर्वाई आहे, ती सर्व त्या पक्षाच्यां चळवळींत. जीं तत्त्वें आजपर्यंत केवळ कल्पनेच्या सदरांत मोडत होतीं त्यांना व्यवहारांत यशस्वी करून दाखविणाऱ्या त्यांच्या कार्यपद्धतींत आहे. आपल्या कल्पना व आपली कार्यपद्धति लोकप्रिय करण्याकरितां सिनफेन पक्षाला प्रचलित कल्पनांशीं व कार्यपद्धतींशीं निरंतर झगडावें लागलें. सिनफेन पद्धतीचा व सिनफेन पक्षाचा जनक आर्थर ग्रिफिथ याची चिकाटी जबर असल्यामुळेंच त्याच्या पक्षाला इतकें तेज चढलेलें दिसत आहे. सन १८९९ सालीं आर्थर ग्रिफिथनें आपल्या मतांचा प्रसार करण्याकरितां 'युनाइटेड आयरिशमन' हें पत्र काढलें.

अर्ध शतकापूर्वी जॉन मिचेल यानें जें पत्र आपल्या मतांच्या प्रसाराकरितां काढिलें होतें त्याच, 'युनायटेड आयरिशमन' पत्राचा होमरूल चळवळीच्या बदललेल्या मनूंत त्याच मतांच्या पुनरुज्जीवनाकरितां हा पुनर्जन्म झाला होता. मिचेलनें आपल्या अमोघ वीर्यवती वाणीनें ज्या मतांचा प्रसार करण्याकरितां जन्मभर अविश्रांत श्रम केले त्याच मतांना, त्या वेळच्या नवीन मनूला साजेल असें वळण देऊन, लोकप्रिय करण्याकरितां हें पत्र निघालें होतें. पार्नेलनंतर राष्ट्रीय पक्षाची तत्त्वनिष्ठा ढळल्यामुळें राष्ट्राची जी दिशाभूल सहजच होत होती तिला आळा घालावा म्हणून ग्रिफिथची ही धडपड होती. अर्थातच राष्ट्रीय पक्षावर प्रहार करावयाला या पत्रानें प्रथमपासून प्रारंभ केला. आयर्लंडच्या अंतिम ध्येयाला जें जें म्हणून अहितकर आहे असें ग्रिफिथला वाटलें तें तें सर्व नष्ट करण्याचा त्यानें, आपल्या लेखनप्रहारानें प्रयत्न केला. आयर्लंडांतील बहुतेक सर्व संस्थांवर त्यानें योग्य कारणास्तव कडक टीका केली. लोकांना पटो अगर न पटो सत्य असेल तें लिहावयाचें, असें साहसाचें सत्यव्रत त्यानें आचरिलें. आयर्लंडच्या कॅथॉलिक गुरूंनीं लोकांचें जें द्रव्यशोषण त्या वेळीं चालविलें होतें त्यांचीही गय त्यानें बिलकुल केली नाहीं. ट्रान्सव्हालमध्यें स्थापन झालेल्या बोअर लोकांच्या लोकसत्ताक राज्याविरुद्ध इंग्लंडनें जी जुलमाची मोहीम काढिली होती, तिचा निषेध ग्रिफिथनें अत्यंत कठोर शब्दांनीं केला. 'इंग्लंडनें आपल्या साम्राज्याच्या विस्ताराकरितां पाहिजे तर आपलें रक्त

सांडावें, आयर्लंडच्या रक्ताचा एकही थेंब इंग्लंडचें जुलुमी तख्त ट्रान्सव्हालमध्यें स्थिर होण्याकरितां सांडतां कामा नये' असा स्पष्ट उपदेश त्या वेळेस त्यानें आयरिश जनतेला केला; व रिक्रूटभरतीची खटपट हाणून पाडिली. असें वर्तमानपत्र सरकारच्या कृपेला वारंवार कसें पात्र होत असतें, हें वर्तमानपत्राच्या कायद्यानें मुद्रणस्वातंत्र्याला मुकलेल्या हिंदी लोकांना स्वानुभवानें पूर्ण माहीत आहे. अशा स्थितींत १९०६ सालपर्यंत हें वर्तमानपत्र सरकारनें उपस्थित केलेल्या सर्व संकटांना तोंड देऊन, ग्रिफिथनें चालविलें.

अशा तऱ्हेचें हें उत्कृष्ट पत्र अंदाजाहून अधिक काळ चालून सरकारी हुकुमानें अखेर १९०६ सालच्या एप्रिल महिन्यांत बंद पडलें! सिनफेन मतांचा फैलाव करण्याकरितां या पत्राचा फार उपयोग झाला. हें पत्र निघालें त्यावेळेचा काळ व त्याच्या पुढील आणखी पंधरा वर्षांचा काळ, हा पार्लमेंटांतील चळवळीच्या आशेचा व आस्थेचा काळ होता. या काळांत आयर्लंडांतील बहुजनसमाजाचें लक्ष पार्लमेंटांतील होमरूलच्या झटापटीकडेच सर्वस्वीं वेधलें होतें. अर्थात्च या या काळांत सिनफेन मतांचा नुसता प्रचार होण्यापलीकडे विशेष कांहीं एक घडलें नाहीं.

ज्या वेळीं ही सिनफेनची चळवळ आयर्लंडमध्यें सुरू झाली, त्या वेळीं म्हणजे सन १९०४ सालीं आयरिश-नॅशनॅलिस्टपक्ष प्रबल असून त्याचे ८० सभासद ब्रिटिश पार्लमेंटमध्यें प्रतिनिधी म्हणून निवडून गेले होते व सनदशीर मार्गांनीं ब्रिटिश साम्राज्यांतर्गत् स्वराज्य मिळविणें हें त्यांचें ध्येय होतें. त्यांनीं आपलें कार्य फार मंदगतीनें चालविलें होतें. तथापि लिबरल पक्षानें सन १९०६-१९१४ मध्यें आयरिश स्वराज्याचा प्रश्न हातीं घेतल्यामुळें त्यांचें संख्याबलही वाढतें होतें; व यदाकदाचित त्यांच्या योजनेप्रमाणें होमरूल बिल पास झालें असतें, तर आयरिश राष्ट्रीय पक्षानें त्याचा स्वीकार करून तें यशस्वी करण्याचाही प्रयत्न केला असता. असो.

सिनफेन चळवळ जरी सन १९०४ सालीं जन्मास आली, तरी १९१४ सालापर्यंत तिच्या हातून फारसें काम झालें नाहीं. इतकेंच नव्हे, तर सिनफेन चळवळ म्हणजे एक अल्पायुषी चळवळ असें रेडमंडसारखे गृहस्थ उपहासानें बोलूंही लागले. सिनफेन चळवळीसंबंधीं लोकमत शिक्षित करण्यासाठीं मधून

मधून लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं जात. पण एकंदरीनें काम मंदगतीनेंच चाललें होतें.

परंतु सन १९१३ सालीं चौथें आयरिश बिल पार्लमेंटपुढें आलें, व सरकारचा पक्षपाती व आयरिशपक्षाचा द्वेष्टा सर एडवर्ड कार्सन यानें सरकारास बजाविलें कीं, आयरिश होमरूल बिल पास झाल्यास प्रसंगीं मी सशस्त्र रीतीनें त्याचा प्रतिकार करण्यास मागेंपुढें पाहणार नाहीं; व या हेतुसिद्ध्यर्थ आल्स्टरमध्यें स्वयंसेवकांच्या पलटणी उभारण्यास त्यानें सुरुवात केलीही. याला उत्तर म्हणून आयरिश राष्ट्रीय पक्षानें आपलीं स्वयंसैनिकांचीं पथकें उभारण्यास सुरुवात केली. इतक्यांत महायुद्धास सुरुवात झाली.

दुबळ्या राष्ट्रांच्या संरक्षणाकरितां व त्यांच्या हक्कांची पायमल्ली होऊं नये म्हणून इंग्लंड महायुद्धांत पडल्यानंतर आयर्लंडनें इंग्लंडला मदत करावी किंवा नाहीं, याची चर्चा आयरिश पत्रांतून होऊं लागली. युद्धांत इंग्लंडला बिनशर्त मदत करावी व मोबदल्याविषयीं कांहींही न बोलतां इंग्लंडच्या सद्सद्विवेकबुद्धी-वर विसंबून रहावें असें राष्ट्रीय पक्षाचें सामान्यतः मत होतें. होमरूलचा कायदा आयर्लंडला लागू करण्यासंबंधानें एक अक्षरही न बोलतां उदार-चरित रेड-मंडनें आयर्लंडचें बिनशर्त सहाय्य इंग्लंडला देऊं केलें! रेडमंडच्या या उदात्त वर्तनानें शरमलेल्या इंग्रजी मुत्सद्यांनीं होमरूल बिलाला राजाची सही मिळविली व आयर्लंडला होमरूलचा कायदा लागू करण्याचें आश्वासन दिलें! बिनशर्त साहाय्याचें आपलें वचन खरें करण्याकरितां रेडमंड स्वदेशीं परत आला. रेड-मंडच्या या धोरणाला नेहमींप्रमाणें सिनफेन पक्षानें विरोध केला व आपण तटस्थ राहणार असें जाहीर केलें. रेडमंडच्या स्वार्थत्यागाची व देशसेवेची पुण्याई या वेळीं त्याच्या कामीं आली; आणि आयरिश जनतेनें त्याच्या वचनाची पूर्तता करण्याचें ठरविलें. सैन्यभरतीच्या कामाला आयर्लंडांत उत्साहानें आरंभ झाला. परंतु इंग्लंडच्या अनुदार व पक्षपाती धोरणानें या उत्साहावर पाणी ओतलें. सैन्यभरतीचें काम चालू असतांच सिनफेन, मजूर व क्रांतिकारक या तिन्ही पक्षांचीं वर्तमानपत्रें बंद करण्यांत आलीं! रेडमंडनें देऊं केलेली आयरिश स्वयं-सेवकांची मदत युद्धखात्यानें नाकारली! आयरिश सैनिकांना व अल्स्टर सैनि-कांना वागविण्यांत पक्षपात व अन्याय दिसूं लागला! या सर्व अन्यायांचा कळस करण्याकरितां आयर्लंडांत धरपकडीचें सूत्र स्थानिक सरकारनें सुरू केलें.

बहुजनसमाजांत उत्पन्न झालेला उत्साह या कृत्यांनीं पुरता गारठला. याच सुमारास सिनफेन, मजूर व क्रांतिकारक या पक्षांनीं नवीन पत्रें काढून असंतोष चेतविण्याला प्रारंभ केला. युद्धामध्यें जर्मनांनीं केलेल्या अत्याचारांचीं भडक रंगानें रेखाटलेलीं शब्दचित्रें जेव्हां इंग्रजी पत्रांतून प्रसिद्ध होत असत, तेव्हां आयर्लंडांत शांतता स्थापित करण्याच्या नांवांखालीं, इंग्लंडनें केलेल्या अत्याचारांशीं या जर्मन अत्याचारांची तुलना करून इंग्रजी नीतिमत्तेचा उघड उपहास हीं पत्रें करीत असत. जर्मनांच्या अंतःकरणाइतकेंच इंग्रजाचेंही अंतःकरण निर्दय व क्रूर आहे, असें या पत्रांनीं सप्रमाण सिद्ध केलें. इंग्लंड दुबळया राष्ट्रांच्या हक्कांकरितां व स्वातंत्र्याकरितां युद्धांत पडलें; हें जर खरें असेल, तर त्यानें प्रथम आयर्लंडचें हिरावून घेतलेलें स्वातंत्र्य त्याला परत दिलें पाहिजे. आयर्लंडला पायाखालीं तुडवून पुनः स्वातंत्र्याकरितां लढत असल्याची शेखी मिरविण्याइतकें इंग्लंड निर्घृण व निर्लज्ज आहे, असें हीं पत्रें उघड उघड लिहूं लागलीं. याच वेळीं क्रांतिकारक व मजूर या पक्षांचें ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न पीअर्स व कनॉली या त्या पक्षांच्या पुढाऱ्यांनीं केला. पीअर्स व कनॉली यांच्या वाणींत विलक्षण ओज होतें. पीअर्सच्या स्फूर्तिदायक कवनांनीं आयरिश जनतेला वेड लाविलें होतें. सन १९१५ सालच्या अखेरीस “Tracts for Times” या नांवाची एक निबंधमालाच प्रसिद्ध करावयास पीअर्सनें प्रारंभ केला. उत्कृष्ट कल्पना व उदात्त विचार यांचा हृदयंगम संगम या काव्यमय निबंधांत झाला होता. समता, स्वातंत्र्य व स्वार्थत्याग या दिव्य तत्त्वसूत्रांनीं ही माला गुंफिली होती. आयरिश जनतेंत या वेळीं भयंकर असंतोष पसरला होता. बहुजनसमाजाच्या असंतुष्ट उद्विग्न मनावर निबंधांचा जसा व्हावयाचा तसाच परिणाम झाला. सन १९१६ च्या मार्च महिन्यांत या मालेंतील शेवटचें पुस्तक बाहेर पडलें आणि त्यानंतर पंधराच दिवसांनीं ईस्टर सणाच्या मुहूर्तावर आयर्लंडांत लोकसत्ताक राज्य स्थापन झाल्याचें कनॉलीनें जाहीर केलें.

या संधीचा फायदा घेऊन जर्मनीची आपणांस कांहीं मदत मिळाल्यास खटपट करण्यासाठीं सर रॉजर केसमेंट हे जर्मनींत गेले. महायुद्धाची सुरुवात झाल्यावर आयरिश होमरूलचा प्रश्न मागें पडला व सर्वच स्थिति पालटली. राष्ट्रीय पक्षानें, महायुद्धांत इंग्लंडला सर्वतोपरी सहाय्य करण्याचें ठरवून आयरिश तरुणांनीं दोस्तराष्ट्रांच्या मदतीसाठीं सैन्यांत दाखल व्हावें म्हणून प्रयत्न करण्यास

आला; परंतु यामुळें राष्ट्रीय पक्षावरील लोकांचा विश्वास उडून आतांपावेतों जे लोक राष्ट्रीय पक्षाचे कट्टे अनुयायी होते, ते तो पक्ष सोडून सिनफेन पक्षांत येऊन सामील झाले.

सन १९१६ च्या ईस्टरमध्यें डब्लिन येथें बंड झालें. या बंडाच्या उद्भवाचा व अंताचा आयरिश जनतेवर अगदीं विलक्षण परिणाम झाला. इंग्रजी अमदानींत सत्याचा व स्वातंत्र्याचा पुरस्कार करणें किती धोक्याचें आहे हें या बंडानें स्पष्ट झालें. इंग्लंडांत जर असें बंड होतें तर त्या बंडाच्या उत्पादकांना उघड चौकशीशिवाय शिक्षा झाली नसती व इंग्रजी जनतेनें असा अन्याय सहन केला नसता. परंतु आयर्लंडांत बंडखोरांना चौकशीशिवाय गोळ्या घालण्यांत आल्या ! आणि आयरिश जनतेला आपल्या आवडत्या कवींचें व तत्त्वज्ञान्याचें मरण उघड्या डोळ्यांनीं मुकाट्यानें पहावें लागलें. हा घाव आयरिश जनतेच्या अगदीं जिव्हारीं बसला. सशस्त्र प्रतिकाराचें, बंडाचें वैयर्थ्यही आयरिश जनतेच्या या अनुभवानें पुरतेपणीं गळीं उतरलें. चालू महायुद्धांत इंग्लंड गुंतलें असतां आयर्लंडनें जर बंड केलें तर त्याला यश येईल असें पन्नास वर्षांपूर्वी मिचेलनें प्रतिपादिलें होतें. त्या मार्गानें जाऊनही कांहीं फायदा नाहीं हें या अनुभवानें पटलें. कोणत्याही काळीं बंड करून यश मिळणार नाहीं असा बोध या प्रसंगानें जनतेला झाला. पार्लमेंटांतील चळवळ किंवा रणांगणावरील सशस्त्र प्रतिकार हे स्वातंत्र्यप्राप्तीचे मार्ग नव्हेत, असें या गेल्या पांचसात वर्षांच्या इतिहासानें आयर्लंडला सांगितलें व शिकविलें. ही शिकवणूक सिनफेन पक्षानें व्यर्थ जाऊं दिली नाहीं ! आतां क्रांतिकारक पक्ष नाहीं किंवा राष्ट्रीय पक्षही नाहीं. फक्त सिनफेन पक्षच आपले उघड मार्ग दाखविणार असें स्पष्ट दिसूं लागलें. सिनफेन पक्षानें जें इतक्या दिवस कंठशोष करून सांगितलें आणि होमरूल बिलाला भुललेल्या जनतेनें जें ऐकण्याची कालपर्यंत पर्वा केली नाहीं, तें तिला आज काळानें ऐकविलें आणि तेंच आचरणें आतां प्राप्त झालें, असा निर्णय तिच्या मनोदेवतेनें दिला ! स्वावलंबन–सिनफेन पक्षाचें स्वावलंबन–हाच एक उपाय आतां उरला होता आणि तोच उपाय चालवून पाहण्याचा आयर्लंडनें निश्चय केला.

या बंडाचे प्रवर्तक सिनफेनर्स व कांहीं मजूर पक्षाचे जहाल लोक होते. या बंडाचा पाडाव झाला. तथापि त्यामुळें सिनफेन चळवळीस आळा बसण्या-

ऐवजीं तिच्याबद्दल जनतेंत जास्त सहानुभूति मात्र उत्पन्न झाली. त्या बंडाचे पुढारी, मि० कनॉली हे होते. या मजूर पुढाऱ्याला त्याच्या नेत्यांसह देहांत शिक्षा ठोठावण्यांत आली. या लोकप्रिय पुढाऱ्याचा वध करून लोकक्षोभ जास्त वाढवूं नका असें ॲस्क्विथ साहेबांस किती जणांनीं तरी सांगितलें; तरी तिकडे दुर्लक्ष करून मि०. शिही स्केफिंगटन यांस गोळी घालून मारण्याची शिक्षा देण्यांत आली. अशा रीतीनें पीयर्स, मॅकडोना इत्यादि पंधरा पुढाऱ्यांस फांशीं देण्यांत आलें. त्यामुळें लोकमत जास्तच क्षुब्ध झालें. अशी खळखळ देशांत उडाली असतांही राष्ट्रीयपक्ष अद्यापिही ब्रिटिश लोकांस मदत करा म्हणून उपदेश करीत होताच. इतक्यांत रॉजर केसमेंट जर्मनीहून परत आले, ते येतांच त्यांस पकडून एकदम फांसावर चढविण्यांत आलें. रॉजर यांनीं आपल्या चौकशीच्या वेळीं, आयरिश स्वातंत्र्याची कहाणी इतक्यां हृदयस्पर्शी रीतीनें, कळकळीनें व ओजस्वीपणानें सांगितली कीं, आयर्लंडवर त्याचा विलक्षण परिणाम झाला व राष्ट्रीयपक्ष पार नाहींसा होऊन सिनफेन पक्ष जोरास आला. याच सुमारास सुमारें ४०० सिनफेनर्स पकडून त्यांस इंग्लंडमध्यें रवाना करण्यांत आलें. याच तडाक्यांत डी व्हॅलेरा यांसही फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली. परंतु मोठ्या युक्तीनें तुरुंगांतून निसटून त्यानें अमेरिकेचा रस्ता धरला.

याच सुमारास आयर्लंडमध्यें सक्तीनें सैन्यभरती करण्याचें सरकारनें ठरविलें. व त्यामुळें सिनफेन चळवळीस जोर चढूं लागला. सर्व आयर्लंडनें एकमतानें ( फक्त अल्स्टरशिवाय ) या गोष्टीचा प्रतिकार केला. सैन्यांत दाखल न होण्याच्या चळवळींत रोमन कॅथॉलिक चर्चचे पुढारीही सामील झाले. सक्तीनें सैन्यभरती करूं नये, अशा मताचे इंग्लंडमध्येंही कांहीं लोक होते. त्यांच्या सल्ल्यानें कोणीही आयरिश तरुणानें सैन्यांत नांव दाखल करूं नये अशाबद्दल एक योजना तयार करण्यांत आली. अशी परिस्थिति उत्पन्न झालेली पाहतांच सरकारनें ती योजना रद्द केली. ही व यासारख्याच दुसऱ्या अशा गोष्टी घडून आल्या, कीं त्यामुळें सिनफेन पक्ष जास्तच लोकप्रिय होऊं लागला. व त्याचें प्रत्यंतर १९१८ सालीं झालेल्या निवडणुकीच्या वेळीं चांगलेंच अनुभवास आलें. पार्लमेंटमधील ऐंशीं प्रतिनिधींपैकीं पुरते सहा प्रतिनिधीही राष्ट्रीय पक्षाचे उरले नाहींत. सुमारें ७३ जागा सिनफेनर्सनीं पटकावल्या. निवडणुकीच्या वेळीं आप-

त्या पक्षाचा म्हणून जो कार्यक्रम त्यांनीं प्रसिद्ध केला व ज्याच्या जोरावर ते निवडून आले, त्यांतील पुढील उताऱ्यावरून त्याचें स्वरूप लक्षांत येईल:—

"ब्रिटिश किंवा दुसरें कोणतेंही परकीय सरकार आयर्लंडसाठीं कायदेकानू करील त्या कामीं त्यास मदत न करणें, यासाठीं ब्रिटिश पार्लमेंटमधून आपले प्रतिनिधी पाठवावयाचे नाहींत.

"आयर्लंड इंग्लंडच्या दास्यांत न राहावें यासाठीं शक्य त्या सर्व मार्गांनीं इंग्रजी सत्ता दुर्बल करणें हा या पक्षाचा उद्देश आहे.

" आयरिश लोकांचा सामाजिक, राजकीय व औद्योगिक जीवनक्रम सुखकर होऊन सर्व आयर्लंड देशाचें कल्याण व्हावें यासाठीं आयरिश संघटना निर्माण होणें अत्यावश्य असून, सर्वत्र स्थानिक मंडळें स्थापन करून त्यांनीं एक वरिष्ठ मंडळ निवडावें व त्याच्या हातीं सर्व आयर्लंडचीं सूत्रें असावींत.

" आयर्लंड हें स्वतंत्र राष्ट्र आहे या गोष्टीस शांततापरिषदेनें संमति देण्याबद्दल परिषदेस विनंती करण्यांत यावी."

निवडणुकींत जे सिनफेन उमेदवार निवडून आले, त्यांपैकीं डी व्हॅलेरा वगैरे बरेच देशभक्त तुरुंगांत खितपत पडले होते. जे मोकळे होते त्या सर्वांची डब्लिन येथें एक सभा भरून त्यांनीं डेल ऐरीन—आयर्लंडची पार्लमेंट—स्थापन केली. या समारंभास सर्वत्रांस निमंत्रणें करण्यांत आलीं होतीं. परंतु राष्ट्रीय-पक्ष व अल्स्टरवाले यांनीं त्यांत भाग घेण्याचें नाकारलें. याच सुमारास डी व्हॅलेरा यानें आपली तुरुंगांतून सुटका करून घेतली. व डेल ऐरीनच्या अध्यक्षांच्या जागीं त्याची पूर्वी निवड झाली होती ती आतां कायम करण्यांत आली. तो या सभेच्या पहिल्या बैठकीस हजर नव्हता. परंतु त्यानें डेल ऐरीनमध्यें वाचण्यासाठीं एक स्फूर्तिदादक संदेश पाठविला. त्यांत तो म्हणतो, " जी सत्ता लोकांच्या इच्छेविरुद्ध येथें जुलुमानें नांदत आहे तिचे कायदे व अंमल आम्ही बिलकूल जुमानीत नाहीं. हेंच आपलें धोरण जगया निदर्शनास आणलें पाहिजे." जणूं काय आयर्लंडमध्यें लोकसत्ता स्थापित झालीच अशा थाटानें डेल ऐरीन आपलें काम चालवूं लागली; व लोकसत्तेचा उपाध्यक्ष आर्थर ग्रिफिथ यानें आंखून दिलेल्या पद्धतीनें काम करण्यास नेटानें सुरवात झाली.

आयर्लंडमध्यें जमिनीबद्दल अत्यंत तीव्र कलह आहे, व याच कारणामुळें हजारों आयरिश कुटुंबेंच्या कुटुंबें देशत्याग करून अमेरिका वगैरे देशांत गेलीं. सन १८४७,पासून हळुहळू आयरिश लोकांची संख्या कमी कमी होत गेली. अलीकडे स्वराज्यस्थापनेनंतर लोकांची देशत्याग करण्याची प्रवृत्ति कमी झाली आहे. आयर्लंडमध्यें यावेळीं ब्रिटिश सत्तेचें वर्चस्व असल्यामुळें डेल ऐरीनला लोकांची गरज पूर्णांशानें भागवितां आली नाहीं ही गोष्ट खरी. तथापि शेतकरी लोकांना जमिनी पुरविण्यासाठीं तिनें एक मोठा फंड उभारून लोकांच्या एवढेंच नजरेस आणिलें कीं, डेल ऐरीनच्या हातीं खरीखुरी सत्ता आल्यास तिच्या हातून लोकंहिताचीं पुष्कळच कामें होतील.

यानंतर डेल एरीननें ग्रिफिथच्या कार्यक्रमांतील दुसरा तपशील, परदेशांत मोठमोठ्या व्यापारी शहरांत वकिलाती स्थापन करणें, हा हातीं घेऊन त्याप्रमाणें आयरिश वकिलाती स्थापन केल्या. मालाच्या वाहतुकीसाठीं जहाजें बांधलीं पाहिजेत अशीही ग्रिफिथची एक योजना होती व महायुद्धाला सुरुवात झाल्यावर त्याची अडचण पदोपदीं भासूं लागली. परंतु सन १९१४–१९१८ सालामध्यें सबमारीन्स्च्या तडाक्यांत इंग्लंडचीं पुष्कळच जहाजें समुद्रतळाशीं जाऊं लागतांच त्यांची जागा भरून काढण्यासाठीं इंग्लंडनें आयर्लंडमधील सर्व लांकूड फांटा पार धुवून गेला. नवीन झाडें लागवडीस आणण्याकरितां खटपटही करण्यांत आली नाहीं. या बाबतींतही डेल ऐरीनला प्रत्यक्ष असें कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें. तथापि हा प्रश्न सोडविण्यासाठीं त्यांनीं एक योजना तयार केली. याप्रमाणेंच आयरिश पार्लमेंटनें मासळीचे धंदे वाढविण्यासाठीं, व मजुरांस घरांची वगैरे सोय करण्यासाठीं, उपयुक्त अशीं निरनिराळीं खातीं उघडलीं.

यानंतर डेल ऐरीननें महत्त्वाचें काम केलें, तें म्हणजे देशांतील उद्योगधंद्यांची अभिवृद्धि कशी होईल, कोणतीं साधनें उपलब्ध आहेत, नवीन काय योजना केल्या पाहिजेत याची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन नेमून, सर्व पक्षांच्या लोकांकडून अत्यंत उपयुक्त अशी माहिती मिळविली. परंतु ब्रिटिश सरकारला हा देशहिताचा मार्ग न आवडून त्यानें त्याच्या कामास शक्य त्या मार्गांनीं खीळ घालण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या सभांचे अहवाल प्रसिद्ध करणें गैरकायदा ठरवून या सभा म्हणजे अराजक लोकांचे गुप्त कट आहेत असें ठरवून

त्यांच्या कार्यास प्रतिकार करण्यास सुरुवात केली. सर्व सार्वजनिक संस्थांनीं या कमिशनवर बहिष्कार घालण्यास फर्माविलें व ता. २१ जानेवारी १९२० रोजीं तर कॉर्क येथील नगरभवनांतून तिच्या सभासदांना बंदुकीच्या जोरावर हुसकून बाहेर काढलें. ग्रिफिथच्या योजनेपैकीं नॅशनल सिव्हिल सर्व्हिस स्थापन करणें, ही योजनाही सुरू करण्यांत येऊन डेल ऐरीननें नेमलेला सर्व अधिकारी वर्ग त्यांत नोंदला गेला.

याप्रमाणें लोकशाहीचें काम व्यवस्थित सुरूं झालेलें पाहून ब्रिटिश सरकारनें डेल ऐरीनच बंद करून तिच्या सर्व सभा बेकायदा ठरविल्या, तेव्हां ती गुप्तपणें काम करूं लागली. इकडे डी व्हॅलेरा यानें ब्रिटिश तुरुंगांतून आपली मुक्तता करून घेतली व तो अमेरिकेच्या मार्गास लागला. त्यानें अमेरिकेंत देशसेवा अति उत्तम प्रकारची बजाविली, तेथील लोकांचें व सरकारचें लक्ष आयरिश स्वातंत्र्याच्या चळवळीकडे ओढून घेतलें व अमेरिकेंत आयर्लंडच्या मदतीसाठीं पुष्कळ द्रव्यसहाय्य मिळविलें. आयरिश पार्लमेंटच्या मदतीसाठीं फंड उभारला जाऊं नये म्हणून इंग्लंडनें आयर्लंडमध्यें शिकस्तीचे प्रयत्न केले. आयरिश स्वातंत्र्यकर्जाचे रोखे प्रसिद्ध करणें बेकायदा ठरवून त्या कर्जाचें विनंतिपत्र प्रसिद्ध केलेलीं २० वर्तमानपत्रें दडपून टाकण्यांत आलीं. तें कर्ज गोळा करणारे, कार्याला मदत करणारे या दोघांची तुरुंगांत पाठवणी करण्यांत आली. सिनफेन फंडच जप्त करण्याचा सरकारानें शेवटीं उपाय केला व देशांतील प्रमुख बँकांना त्यासंबंधींचें हिशेबही मागण्यांत आले. परंतु त्या बँकांच्या चालकांनीं अत्यंत स्वाभिमानपूर्वक स्पष्टपणें हिशेब दाखविण्याचें नाकारलें.

डेल ऐरीननें पंचायती स्थापन करून, स्वयंसेवक पोलिसांचीं पथकेंही स्थापन केलीं. ब्रिटिश सरकारचें आयर्लंडमधील प्रमुख साधन म्हणजे रॉयल आयरिश कॉन्स्टॅब्युलरी हें असून त्याचा संबंध थेट ब्रिटिश अधिकाऱ्यांशीं असे. सार्वजनिक हिताचें काम या पोलिसांकडून फारसें झालेंच नाहीं. सिनफेन लोकांस पकडणें, त्यांना छळ करणें व लोकांचीं घरें लुटावीं, कोणास हद्दपार करणें झाल्यास त्या गृहस्थाची नांवनिशी सादर करणें अशीं महत्त्वाचीं कामें त्यांजकडे सोंपविण्यांत आलीं. देशांत शांतता राखावयाचें काम त्यांजकडून अर्थातच होईना; तेव्हां जिकडे तिकडे चोऱ्यामाऱ्या यांचा सहजच सुळसुळाट झाला. तेव्हां आयरिश लोक-

सत्तेनें आपले पोलीस नेमून चोऱ्या लुटी वगैरे पासून लोकांचें रक्षण करण्याचें काम त्यांजकडे सोपविलें व त्यांनींही तें उत्कृष्ट प्रकारें बजाविलें.

अपराधी लोकांना लोकसत्तेच्या कोर्टापुढें खेचलें जाई, व चोरीची नुकसानी भरून त्यांजकडून काम करून घेण्यांत येई. यापेक्षां भयंकर स्वरूपाचे गुन्हे घडल्यास त्यांस हद्दपारीची शिक्षा ठोठावण्यांत येऊन परदेशांत त्याची रवानगी करण्यांत येई. याचा स्वभाविक असा परिणाम झाला कीं, रॉयल आयरिश कॉन्स्टाब्युलमधील पोलिसांस आपल्या देशद्रोही कामाचा वीट येऊन त्यांपैकीं शेंकडों जणांनीं आपल्या जागांचे राजीनामे दिले.

स्वतंत्र लोकसत्ताक पार्लमेंट स्थापन करणें एवढाच ग्रिफिथचा उद्देश नसून सर्व राज्ययंत्र काबीज करणें हा त्याचा मुख्य उद्देश होता; व सन १९२० च्या निवडणुकींत तो पूर्णतः सिद्धीस गेला. खालपासून वरपर्यंत सर्व कौन्सिलांत शेंकडा ७५ लोकसत्तावादी निवडून आले. व याप्रमाणें सर्व संस्थांत लोकसत्तावाद्यांचें बहुमत झाल्यावर त्यांनीं पहिल्या सपाट्यास डेल ऐरीनची वरिष्ठ सत्ता मान्य केली व ब्रिटिश सरकारशीं कोणताच संबंध न ठेवण्याचें ठरविलें. स्थानिक सरकाराशीं सर्व संबंध तोडण्यांत आले. व सर्व कौन्सिलच्या कामाचे रिपोर्ट डेल ऐरीनकडे जाऊं लागून कामाबद्दल हुकूम तिकडूनच येऊं लागले. यावर उत्तर म्हणून ब्रिटिश सरकारनें स्थानिक संस्थाच्या ग्रँटस् बंद केल्यामुळें लोकसत्तावाद्यांची अतिशय गैरसोय झाली; परंतु असल्या संकटास ते अगदींच अनभ्यस्त नव्हते. एक दोन कौन्सिलांनीं तर सरकारकडून पैसे काढण्यासाठीं आपले हिशेबही त्यास दाखविले, परंतु रक्कम पदरांत पडतांच फिरून डेल ऐरीनचे वर्चस्व त्यांनीं मान्य केलेंच. परंतु अशा रीतीनें सरकारनें मदत करण्याचें नाकारलेंच तर करबंदीची चळवळ करण्याचें डेल ऐरीननें योजिलें.

सिनफेनच्या स्थानिक अधिकाऱ्यांनीं डेल ऐरीन हीच वरिष्ठसत्ता मान्य केली असून तिच्या पद्धतीनेंच लवाद पंचायतींचीं कामें चालत. या लोकसत्तेच्या कायद्याला लोकांची संमति असल्यामुळें त्याचें बल वाढत असून लोकांत त्याबद्दल आदरही वाढता होता. लवाद पंचायतींचीं कामें अत्यंत निःपक्षपातीपणानें व नेटानें चालत. त्यामुळें कित्येक अन्यायाचे प्रकार दूर झाले. दिवाणी व मुलकी या दोन्ही कोर्टांच्या पद्धतीला शिस्त लागली. युनियनिस्ट पक्षाच्या पत्रांनीं या कोर्टांतील निवाड्यांबद्दल धन्योद्गार काढले आहेत. कोणताही पक्ष-

भेद, जात, वगैरे लक्षांत न घेतां तेथं सर्वांस सारखा न्याय मिळे. व देशांत शांतता राखून गुन्हे शोधून काढण्याचें काम लोकसत्तेच्या पोलिसांनीं फारच उत्तम-प्रकारें केलें. सिनफेन लोकांनीं मद्यपानप्रतिबंधाच्या कामीं फारच चांगली कामगिरी बजावली. बेकायदेशीर दारू गाळणें त्यांनीं बंद करून त्यांची सत्ता जेथें जेथें रुजली तेथें तेथें त्यांनीं दारू दुकानें खुलीं राहण्याचें तास कमी केले. इकडे सरकारी कोर्टाबद्दल लोकांचा तिटकारा वाढत चालला. जून ८ सन १९२० रोजीं बिर येथें सरकारी कोर्टांत एकही वादी प्रतिवादी नव्हता. पण इकडे लोकसत्तेचीं कोर्टें माणसांनीं गजबजून गेलेलीं; अशीच स्थिति सर्वत्र होती. लष्करी पहाऱ्यांत सरकारी न्यायाधीश येत; पण त्यांना कामच नसे. इतकेंच नाहीं, ज्युरीपुरतीं माणसेंही मिळत नसत. थोडक्यांच काळांत सिनफेनर्स लोकांनीं एवढी गोष्ट सिद्ध करून दाखविली कीं, सहकार्य करण्यास जनता तयार असल्याखेरीज त्यांच्यावर सत्ता लादतां येत नाहीं.

संपाच्या शस्त्राचा उपयोग आयर्लंडनें अत्यंत यशस्वीपणानें केला. ज्या वेळीं सत्तानें सैन्यभरती करण्याची योजना निघाली त्या वेळीं सर्व देश-भर एकतंत्री संप पुकारला गेला होता, दुकानें बंद झालीं, कारखाने ओस पडले, आगगाड्या, ट्रामगाड्या बंद पडल्या, गोद्या ओस पडल्या, खानावळींत वाढपीच गेले नाहींत, शाळेंत शिक्षकही नाहींत व विद्यार्थीही नाहींत अशी स्थिति झाली सर्व देश या संपांत सामील झाला. डब्लिनच्या किल्ल्यांत १०० सिनफेनर्स कैदी होते. कैद्यांस वाईट रीतीनें वागविल्याबद्दल त्यांनीं अन्न वर्ज्य केलें, तरीही सरकार त्यांची सुटका करीना. हे कैदी अन्नाविणें मेले तरीही हर-कत नाहीं असें सरकारनें प्रसिद्ध केलें. हजारों आयरिश लोक तुरुंगाभोंवतीं रात्रं-दिवस जाऊन त्यांच्यासाठीं ईश्वराची प्रार्थना करीत. परंतु सरकारनें आपला निश्चय सोडला नाहीं. तेव्हां आयरिश मजूरपक्षानें एक दिवसाचा संप पुकारला व अल्स्टरशिवाय सर्व देशभर तो अत्यंत यशस्वी रीतीनें पाळला गेला. या वेळीं सरकार नमलें व कैद्यांस बिनशर्त सोडून दिलें. परंतु अशा रीतीनें प्रायोपवेशाच्या भीतीला बळी पडून कैद्यांना सोडून दिलें याबद्दल सरकारास मागाहून पश्चात्ताप झाला. व यापुढें कोणी प्रायोप्रवेश करील तर खुशाल तो मेला तरी हरकत नाहीं, असें सरकारनें ठरवून कार्कचे लॉर्ड मेयर टेरेन्स मॅक्स्विनी व दुसरे दोन सिन-फेनर्स यांच्या बाबतींत हा आपला दुराग्रह शेवटास नेला. पण याचा परिणाम

मात्र त्यांच्या हेतूच्या अगदीं उलट झाला. प्रायोपवेशनाच्या मार्गानें स्वातंत्र्या-साठीं हळुहळू देहत्याग करणारा मॅकस्विनी हा स्वदेशासाठीं आत्मोत्सर्ग करणारा वीर म्हणून त्याची कीर्ति मात्र दिगंत गाजली.

स्वराज्याच्या झगड्यांत—अल्स्टरशिवाय—सर्व मजूरपक्षाची सिनफेन लोकांस पूर्ण सहानुभूति व मदत असून डेल ऐरॅनमध्यें मजूर सभासदही योग्य प्रमाणांत निवडले जात. सन १९२० च्या वसंतांत ज्या वेळीं दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं त्या वेळीं या मजूरसंघाचें सामर्थ्य काय आहे हें पूर्ण दिसून आलें. गोद्यांतील सर्व मजुरांस ताकीद देण्यांत आल्या कीं, लोणी, अंडीं, दहीं वगैरे पदार्थ कोणत्याही बंदरांतून ब्रिटिश बाजारांत जातां उपयोगी नाहीं; व याची अंमलबजावणी इतकी उत्तम प्रकारें झाली कीं, आयर्लंडमध्यें योग्य किंमतीस मुबलक माल मिळूं लागला. ब्रिटिश सैन्यास लागणारा दारूगोळा व इतर लष्करी सामान वाहावयाचें नाहीं असें मजूरपक्षानें ठरविलें नॅशनल यूनियन ऑफ रेल्वेमेन म्हणून एक ब्रिटिश संस्था आहे. त्यांत आयरिश मजूरही सामील आहेत. या संघानीं रशियाविरुद्ध पोलंडला शस्त्रसामुग्री पाठविण्याचें नाकारिलें, त्याचेंच अनुकरण आयर्लंडनेंही केलें. रशियाविरुद्ध पोलंडनें युद्ध करण्यास मदत करणें ही गोष्ट जर अन्यायाची आहे, तर आमच्याशीं इंग्लंडनें युद्ध केल्यास आम्ही इंग्लंडला मदत करणें ही गोष्ट तर न्यायसंमत कशी होईल? मुख्य यूनियननें आयरिश मजूरसंघास या गोष्टीस मान्यता दिली नाहीं. तथापि आयरिश मजूरसंघानें आपल्या जबाबदारीवरच ही चळवळ सुरू केला; व याचा परिणाम असा झाला कीं, सैन्याच्या पलटणी, रेल्वेतून जाण्यास अडचण उत्पन्न झाली. दारूगोळा कोणी नेईना व स्टेशनवरून गाडी हालण्यास आठ आठ दिवस लागूं लागले. याबद्दल शेंकडों रेल्वे कामगारांना कमी करण्यांत आलें. त्यामुळें त्यानांही अत्यंत कष्ट सोसावे लागले. तरी सहा महिनेपर्यंत त्यांनीं मोठ्या धैर्यानें व निश्चयानें हा बहिष्कार चालविला.

युद्धसमयीं ब्रिटिशांनीं आयर्लंडमध्यें अनन्वित जुलुमाचे प्रकार केले. सन १९१७ सालीं ३४९ इसम पकडले गेले. त्यांपैकीं २६९ ना राजकीय गुन्ह्यांबद्दल शिक्षा करण्यांत आल्या. निःशस्त्र पुरुष, बायका, मुलें यांच्या १८ सभा उधळून लाविल्या. २४ आयरिश देशभक्तांना चौकशीशिवाय हद्दपार करण्यांत आलें. १९१८ सालीं २५० घरांची जाळपोळ केली व ११०७ इसमांना शिक्षा ठोठावण्यांत

आल्या. यानंतर आयर्लंडमधील चळवळ अजिबात नष्ट व्हावी म्हणून जोरानें दडपशाही करण्याचें ठरवून "ब्लॅक ॲण्ड टॅन्स" नांवाची एक पलटण उभारली. या पलटणींत अशिक्षित दारुबाजांचा भरणा जास्त असल्यानें रक्तपाताशिवाय त्यांना कांहींच दिसत नसे. विनापराध शेंकडों स्त्री-पुरुष, मुलें यांची त्यांनीं कत्तल केली. गांवचे गांव बेचिराख केले. लोकांच्या अन्नसामुग्रीचा नाश करून त्यांची उपासमार केली. गांवांतील एका व्यक्तीच्या अपराधाबद्दल सबंद गांवाला भुर्दंड सोसावा लागून त्यामुळें गांवचे गांव उजाड झाले डेल ऐरिनचे संस्थापक व उपाध्यक्ष मि. आर्थर ग्रिफिथ यांना कैद करण्यांत आलें व त्या वर्षांत सुमारें १०० लोकांना यमाच्या दरबारीं रवाना करण्यांत आलें. या अत्याचारानें सिनफेनर्सची चळवळ बिलकूल दबली नाहीं. त्यांच्या हातूनही अत्याचार झाले व त्यांचें समर्थन आम्ही करतों असें नाहीं; तथापि सरकारनें आपल्या कृत्यांनीं लोकांच्या मनोवृत्ति इतक्या क्षुब्ध केल्या कीं, त्यांच्याही हातून उत्तरास प्रत्युत्तर या नात्यानें अत्याचार घडले. आयर्लंडभर सर्वत्र अशांति माजली. अंगावर शहारे येण्यासारखे अनन्वित जुलुमाचे प्रकार झाले. सरकारच्या या कृत्याबद्दल सर्वत्र टीकेचा मारा सुरू झाला व केवळ तरवारीच्या जोरावर व लोकांच्या संमतीखेरीज आपणांस आयर्लंडवर राज्य करतां येणें अशक्य आहे असें सरकारास आढळून आलें; तेव्हां तडजोडीच्या भाषणास सुरुवात झाली.

सर्व जगावर अप्रतिहत सत्ता गाजविणाऱ्या हटवादी व चढेल ब्रिटिश मुत्सद्यांस अखेरीस पूर्णपणें नमतें घ्यावें लागून बंडखोर, राजद्रोही व विध्वंसक म्हणून उपमा दिलेल्या आयरिश पुढाऱ्यांशीं बरोबरीच्या नात्यानें तडजोडीची वाटाघाट करणें प्राप्त झालें; यावरून जर्मनीसारख्या बलिष्ठ राष्ट्रास नामोहरम करणाऱ्या इंग्लंडास या आयरिश स्वातंत्र्ययुद्धानें कसें जेरीस आणलें याचा उलगडा होईल. सिनफेन लोकांनीं महायुद्धाच्या संधीचा योग्य तो उपयोग करून इंग्लंडच्या नाकदाबीचें युद्ध सुरू केलें तें इंग्लंडास प्रत्यक्ष जर्मनयुद्धापेक्षांही जास्त जाचक झालें. केवळ लष्करी बलाच्या जोरावर आयरिशस्वातंत्र्ययुद्ध मोडण्याचें इंग्लंडनें ठरविलें असतें, तर इंग्लंडच्या कीर्तीवर अत्यंत मोठा काळिमा लागला असता, व जगभर छी:थू झाली असती. त्यामुळें आयरिश लोकांनीं चालविलेलें नाकदाबीचें युद्ध केवळ अन्यायानें त्यांस मोडतां येईना. शिवाय केवळ लष्करी सत्तेच्या जोरावर आयर्लंडांतील स्वातंत्र्यज्योत यापुढें विझणें शक्यही नव्हतें. सर्व आयर्लंड सिनफेन

झाला होता, सिनफेन लोकांनीं आपली लोकनिर्मित अशी स्वतंत्र राज्यपद्धति सुरू करून त्याप्रमाणें कामास सुरवातही केली होती व ब्रिटिश राज्यव्यवस्थेपेक्षां ती जास्त सुखकारक व हितावह आहे असा जनतेंत विश्वासही उत्पन्न होऊं लागला होता. सिनफेन लोकांनीं हें स्वातंत्र्ययुद्ध सुरू केल्यानंतर दडपशाही, जुलूम, लष्करी अम्मल, वगैरे उपायांनीं आयर्लंडच्या स्वातंत्र्यास मूठमाती देण्याचा ब्रिटिश मुत्सद्यांनीं कांहीं थोडा प्रयत्न केला नाहीं. परंतु दडपशाहीच्या उपायांनीं आयर्लंडची स्वातंत्र्यलालसा कमी न होतां ती जास्तच उद्दीपित होऊं लागली, असा अनुभव ब्रिटिश मुत्सद्यांस आला व केवळ लष्करी जोरावर आयर्लंड हातीं ठेवणें अगदीं अशक्य आहे अशी पूर्ण जाणीव आयर्लंडनें उत्पन्न करून दिली. ब्रिटिश साम्राज्याचे गोडवे गाऊन त्यांच्या छत्राखालीं राहणेंच आपल्या कल्याणाचें आहे अशा आत्मघातकी विचारसरणीचें पटल आयर्लंडच्या डोळ्यावरून पार नाहींसें झाल्याचें प्रत्ययास आलें व यापुढें आयर्लंड केवळ आपल्याच सत्तेखालीं ठेवावयाचा असेल तर इंग्लंड व आयर्लंडमध्यें लष्करी छावणी सतत ठेविली पाहिजे, असा अनुभव इंग्लंडांतील मुत्सद्यांस आल्यामुळेंच ते सिनफेन चळवळीच्या एके काळीं बंडखोर ठरविल्या गेलेल्या, व फाशीच्या शिक्षा दिलेल्या आयरिश देशभक्तांशीं तडजोड करण्यास उत्सुक झाले. आयर्लंड आपल्या हातून अजीबात हिसकावलें जाण्यापेक्षां आपण होऊन त्यावर उदक सोडण्यास उदार इंग्लिश मुत्सद्दी तयार झाले!

तडजोडीची वाटाघाट सुरू झाली, तरीही तो घाट लवकर जमून येईना. सिनफेन लोकांनीं स्थापन केलेलें आयरिश लोकसत्ताक राज्य तुम्हीं मान्य करीत असलां तरच आम्हीं तडजोडीची भाषा बोलूं, अशी सिनफेन लोकांनीं स्पष्ट भाषा सुरू केली; व ब्रिटिश साम्राज्याशीं राजनिष्ठ राहाण्याचें मान्य करा असा हट्ट ब्रिटिश मुत्सद्दीही सोडीनात. अखेरीस ब्रिटिश मुत्सद्यांनीं सिनफेन पुढाऱ्यांस खासगी रीतीनें साम्राज्याच्या इभ्रतीसाठीं तुम्हीं राजनिष्ठेचें तत्त्व मान्य करा अशी गळ घातली. तेव्हां उभय पक्षांची तडजोडीची भाषा सुरू झाली. ही परिषद यशस्वी होऊन खालील आशयाचा तहनामा मान्य करण्यांत येऊन त्यावर उभय पक्षांच्या सह्याही झाल्या.

१ आयर्लंडमध्यें शांतता प्रस्थापित करून राज्यकारभार चालविण्याकरितां व कायदे करण्यासाठीं एक पार्लमेंट असावें व त्या पार्लमेंटला जबाबदार असलेल्या कार्यकारी मंडळानें राज्यकारभार चालवावा.

२ इंग्लंडमधील इंपीरियल पार्लमेंट व कानडासरकार यांचा ज्या प्रकारचा संबंध आहे तसाच आयरिश सरकारचाही त्या पार्लमेंटाशीं असावा.

३ कानडा प्रांतावर जशी इंग्लंडच्या राजेसाहेबांकडून गव्हर्नर-जनरलची नेमणूक होते तशीच आयर्लंडवरही नेमणूक व्हावी.

४ आयरिश फ्री-स्टेटच्या पार्लमेंटच्या सभासदांनीं जी शपथ घ्यावयाची ती अशीः—

> 'आयर्लंडमध्यें कायद्यानें प्रस्थापित झालेल्या या आयरिश फ्री-स्टेटच्या राज्यव्यवस्थेशीं मी एकनिष्ठ राहीन. तसेंच आयर्लंड हें 'ब्रिटिश कॉमनवेल्थ ऑफ नेशन्स' नांवाच्या संघांत समाविष्ट झाल्यामुळें आयर्लंड देश व ग्रेटब्रिटन यांचें नागरिकत्व सर्वसामान्य झाल्यानें मी बादशहा पंचम जॉर्ज व त्यांचे वारस आणि त्यांचे मागून तख्तनशीन होणारे राजे यांच्याशीं राजनिष्ठ राहीन.'

५ ग्रेटब्रिटनच्या राष्ट्रीय कर्जाचा हिस्सेरशीनें जो योग्य वांटा ठरेल तो आयर्लंडनें सोसावा.

६ आयरिश फ्री-स्टेटच्या दर्याकिनाऱ्याचें संरक्षण करण्याचें काम आयर्लंड स्वतः घेईपर्यंत इंग्लंडनें समुद्रकिनाऱ्याचें रक्षण करावें. या कलमाचा पांच वर्षांनीं पुनः विचार होऊन आयर्लंडची जशी तयारी असेल तसा संरक्षणाचा बोजा आयर्लंडवर टाकण्यांत यावा.

७ शांततेच्या वेळीं ब्रिटिश साम्राज्याच्या सैन्याला व आरमारला आयर्लंडनें बंदरें वगैरे विषयीं सोयी करून घेऊं द्याव्या. युद्धसमयीं व युद्धाच्या तयारीच्या वेळीं ब्रिटिशसरकारच्या जरुरीप्रमाणें त्यास सवलती द्याव्या.

८ ग्रेटब्रिटनच्या लोकसंख्येशीं तेथल्या लष्कराचे जें प्रमाण असेल त्याच प्रमाणांत आयर्लंडनेंही आपलें लष्कर ठेवावें.

९ परस्परांनीं परस्परांच्या व्यापारी बोटींस जाण्यायेण्यासंबंधीं सवलती द्याव्या.

१० आयर्लंडच्या नवीन राज्यव्यवस्थेमुळें ज्या ब्रिटिश सिव्हिल सर्व्हंटांचें नुकसान होईल त्यांची आयर्लंडनें भरपाई करावी; गेल्या दोन वर्षांत इंग्लंडनें जें लष्करी पोलीस उभारलें होतें त्याचा खर्च मात्र इंग्लंडनेंच सोसावयाचा आहे.

अशा आशयाचीं कलमें आहेत. त्या तहनाम्यास पुरत्या जोडून त्यांत कलमां-

तील मुद्यांचें स्पष्टीकरण केलें आहे. त्यांत बीयरहेवन बंदर ब्रिटिश आरमार-मंडळाकडे (Admiralty) राहील व पीयरहेवन, क्वीन्सटाऊन, बेलफास्टालो व लोविली येथें संरक्षक सैन्य राहील; किनाऱ्याच्या सुरक्षिततेकरितां वरील बंदरां-भोंवतालचा कांहीं प्रदेश विमानविषयक व्यवस्थेकरितां ग्रेटब्रिटनच्या वैमानिक खात्याकडे राहील; समुद्रांतील व खुष्कीवरील तारा वगैरेंची व्यवस्था परस्परांनीं ठरवावी. दीपगृहें व इतर दर्यावरील खाणाखुणा यांचें फ्री-स्टेटनें रक्षण करावें वगैरे खुलासा केलेला आहे.

वसाहतींचें स्वराज्य ज्या स्वरूपाचें असतें तशा प्रकारचें स्वराज्य आयर्लंडला या तहानें मिळालें असल्याचें वाचकांच्या लक्षांत येईल. आयरिश प्रतिनिधींनीं या तहावर आयरिश 'फ्री-स्टेट' (Free State) च्या वतीनें सह्या केल्या. आयर्लंडला अंतर्गत स्वातंत्र्य मिळालें, तरीही ही तडजोड पूर्ण स्वातंत्र्यवादी लोकांना मान्य झाली नाहीं. या पक्षाचे अध्वर्यु आयरिश देशभक्त डी व्हॅलेरा हे आहेत. या ठरावास मान्यता देण्याचा प्रश्न डेल ऐरीनमध्यें बहुमतानें 'आयरिश फ्री-स्टेट'नें ब्रिटिश मुत्सद्यांशीं केलेल्या तडजोडीस मान्यता दिली व सिनफेन चळवळीचे आद्यप्रवर्तक मि. आर्थर ग्रिफिथ यांस आयरिश फ्री-स्टेटचे पहिले अध्यक्ष निवडण्यांत आलें. आपल्या हातानें लावलेल्या वृक्षाचीं फळें खाण्याचें भाग्य फार थोड्यांच्या नशिबीं असतें! आर्थर ग्रिफिथ यांनीं आपल्या मातृभूमीच्या उद्धारासाठीं जी प्रचंड चळवळ केली, जशी एकसूत्री संघटना निर्माण केली, अलौकिक स्वार्थत्याग केला, त्याचें फळ त्यांच्या हयातींत त्यांस मिळालें. असे योगायोग इतिहासांत-परतंत्र राष्ट्रांच्या इतिहासांत तरी फार क्वचित् येत असतात. दुर्दैवानें मि. आर्थर ग्रिफिथ यांस देशानें दिलेला मान फार दिवस उपभोगण्यास सांपडला नाहीं व मातृभूमीची सेवा त्यांस करतां आली नाहीं, तरी ज्या कार्यासाठीं त्यांनीं आपला देह झिजविला, तें कार्य सफल झाल्याचें त्यांना आपल्या डोळ्यांनीं पाहण्याचें पुण्य लाधलें. मृत्युसमयीं देशाच्या स्वातंत्र्याची तळमळ त्यांच्या अंतःकरणांत न राहतां आपली मातृभूमि स्वतंत्र झालेली पाहून या पुण्यपुरुषानें देह विसर्जन केला. जें भाग्य इतरांच्या फार क्वचित् नशिबीं येतें तें मि. ग्रिफिथ यांस लाधलें.

याप्रमाणें अनेक वर्षे अविश्रान्त परिश्रम करून सिनफेनर्सना आपलें परमोच्च ध्येय पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त न झालें तरी वसाहतींच्या दर्जाचें स्वातंत्र्य प्राप्त झालें

आहे. सरकारी जुलुमानें गांजून गेलेली जनता व तज्जन्य उद्भवणाऱ्या अनेक आपत्तींनीं देश त्रस्त झाल्यामुळें ग्रिफिथ, कॉलिन्स यांनीं वरील तडजोडीस मान्यता दिली. परंतु ग्रिफिथ-कॉलिन्स यांची तडजोड डी व्हॅलेरा याला मान्य न झाल्यामुळें त्यानें स्वतंत्र आयर्लंडचा झेंडा उभारून आपल्या कांहीं अनुयायां-सह आयरिश फ्री-स्टेटशीं युद्ध आरंभिलें. अनेक वर्षांच्या कटकटीमुळें लोक त्रासून गेले होते. देशांत स्वस्थता नाहींशीं झाली होती. अशा स्थितींत आयरिश फ्री-स्टेट स्थापन झाल्यावर लोकांची सहानुभूति सहाजिकच फ्री-स्टेटवाल्यांस मिळून डी व्हॅलेराच्या अनुयायांची संख्या दिवसानुदिवस कमी कमी होत चालली. त्याचे युद्धकुशल असे सेनानी मृत्यू पावले, अगर फ्री-स्टेटच्या हातीं लागले. याप्रमाणें आपलें संख्याबळ कमी होत चालल्याचें पाहून डी व्हॅलेरा यानें शस्त्रसंन्यास केल्याचें जाहीर केलें, व फ्री स्टेटच्या होणाऱ्या नव्या निवडणुकींत पूर्ण स्वातंत्र्य-वादी प्रतिनिधी निवडून आणण्याचें ठरवून निवडणुकी काबीज करण्याच्या उद्योगास तो लागला. आपल्या ध्येयांत किंचितही फरक करणार नाहीं असें म्हण-णारा डी व्हॅलेरा यानें 'मिळेल तें हाताशीं घालून बाकीच्यासाठीं झगडणें' या सर्वमान्य राजकारणी तत्त्वाचा स्वीकार केला व स्वतः निवडणुकीस उभा राहून इनिस येथें मतदारांपुढें भाषण करीत असतां फ्री-स्टेटच्या सैन्यानें त्यास अकस्मात् पकडलें. परंतु याप्रमाणें त्यास पकडण्यांत आलें तरी तो स्वतः तर निवडून आलाच; पण त्याच्या बाजूचे सुमारें ४४ प्रतिनिधी निवडून आले असून आपली स्वातंत्र्याची मागणी हे प्रतिनिधि फ्री-स्टेट लोकसभेंत आणल्याखेरीज राहणार नाहींत!

---

## आयर्लंड व हिंदुस्थान.

झालेल्या गोष्टींची नोंद करण्याचें काम इतिहासाइतक्या निस्पृहतेनें आजपर्यंत कोणी केलेलें नाहीं. तेथें कोणाची भीड, कोणाचा वशिला, द्रव्याचें आमिष यांचा उपयोग होत नाहीं. घडत असलेल्या गोष्टींचें कालपटावर लिखाण कर-ण्याचें त्याचें काम अव्याहत सुरू असतें व या अखबरनवीसानें लिहून ठेवलेल्या बखरीचा उपयोग जाणते लोक करून घेत असतात. इतिहासाच्या एकंदर घडा-मोडींत ज्याप्रमाणें अत्यंत अद्भूतता व चमत्कृति दृष्टीस पडते त्याचप्रमाणें घड-

केलेल्या गोष्टीच पुनः पुन्हा घडत असल्याचा चमत्कारही तो दाखवितो. इतिहासवाचकांस ऐतिहासिक साम्यदर्शन पदोपदीं घडत असतें. जणू काय त्याच त्या गोष्टी आपण पुनः वाचीत आहोंत कीं काय, असा भ्रम क्षणमात्र कां होईना, पण झाल्याखेरीज रहात नाहीं.

अनेक ऐतिहासिक गोष्टींसंबंधानें अशी स्थिति असली, तथापि जीं राष्ट्रें पारतंत्र्यांतून सुटण्यासाठीं धडपडत असतात, त्या सर्वांच्या झगड्यांत जें अद्भुत साम्य आढळतें तितकें इतरत्र क्वचितच दृष्टीस पडतें. जित राष्ट्रांची पारतंत्र्यांतून सुटण्याची अत्यंत प्रबळ इच्छा, व त्यांस पारतंत्र्यांत तसेंच सदैव गाडून टाकण्याची जेत्या राष्ट्रांची राक्षसी महत्त्वाकांक्षा या गोष्टींत नेहमींच साम्य असतें. इतकेंच नाहीं, परंतु एकाच गोष्टीच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्त्याच ठिकठिकाणीं निघत आहेत कीं काय, असा भासही झाल्याखेरीज राहत नाहीं. अगदीं प्राचीन काळापासून, जिंकलेले लोक सदैव दास्यांत कसे राहतील. या एकाच गोष्टीकडे जेत्यांचें लक्ष असून ती आपली इच्छा तृप्त करण्यासाठीं अगदीं अनादिकालापासून ज्या प्रकारच्या साधनांचा उपयोग केला जात असे, तशाच प्रकारच्या परंतु परिस्थितीप्रमाणें सुधारलेल्या साधनांचा उपयोग आजही केला जात असल्याचें इतिहासवाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

भिन्न भिन्न राष्ट्रांची भिन्न भिन्न ठिकाणची ही गोष्ट झाली. अर्थात् एकाच साम्राज्याखालीं अनेक जित राष्ट्रांचा समावेश झाला असतां तेथें ज्या प्रकारची चळवळ झाली व ती दडपून टाकण्याचे ज्या प्रकारचे प्रयत्न झाले त्यांत विलक्षण साम्य दिसून आल्यास नवल काय? आयर्लंड व हिंदुस्थान यांचेंच उदाहरण पहा. अनेक शतकें आयर्लंड स्वातंत्र्यासाठीं झगडला व ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं त्यांची स्वातंत्र्यलालसा दडपून टाकण्यासाठीं जे जे प्रयोग तेथें केले अगदीं तेच हिंदुस्थानांत करण्यांत येत आहेत. आयर्लंडनें स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं जशा प्रकारची चळवळ केली, तशाच प्रकारची चळवळ येथेंही कमीअधिक प्रमाणांत आहे. परंतु ज्या चळवळीमुळें आयर्लंडला स्वातंत्र्य देणें ब्रिटिशांना भाग पडलें, तशा प्रकारची चळवळ येथें सुरू असूनही आयर्लंडची स्वातंत्र्यलालसा नष्ट करून टाकण्यासाठीं जे प्रयोग तेथें करण्यांत आले त्याच प्रयोगांचा येथेंही सरसहा उपयोग करण्यांत येत आहे. आयर्लंडचा अनुभव डोळ्यांसमोर उघड उघड दिसत असतां तिकडे दुर्लक्ष करून नेहमीं-प्रमाणें दडपशाहीची कांस धरण्याइतके ब्रिटिश मुत्सद्दी वेडे आहेत, कीं आमच्या

चळवळींतच कांहीं चुकतें आहे, हें आयर्लंड व हिंदुस्थान यांमधील चळवळींच्या साम्यदर्शनावरून वाचकांनींच ठरवावें हें बरें !

आयर्लंडला आज जें स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे तें अनेक शतकांच्या चळवळींचें फळ असलें, तरी त्यांनीं सुरू केलेल्या सिनफेन चळवळीचा तत्कालिक उपयोग झाला असा लोकसमज आहे. आज हिंदुस्थानांतही जी असहकारितेची चळवळ सुरू आहे तीही या सिनफेनच्या धर्तीवरच असल्याचें येथील असहकारितावाद्यांकडून सांगण्यांत येतें. येथील असहकारितेची चळवळ ही आमच्या मतें सिनफेन चळवळीची केवळ छाया आहे. सिनफेन चळवळीचा प्राण या चळवळींत नाहीं. कसें तें पाहूं.

सिनफेन चळवळ ही स्वावलंबनाची चळवळ व येथील असहकारितेची चळवळही केवळ स्वावलंबनाची चळवळ आहे. परंतु हें साम्य येथेंच थांबतें. असहकारितेच्या चळवळीची धांव यापुढें जाऊंच शकत नाहीं. सिनफेन लोकांनीं आपली चळवळ यशस्वी करण्यासाठीं जो कार्यक्रम आंखला व तो ज्या पद्धतीनें त्यांनीं यशस्वी करून दाखविला, तसा कार्यक्रम व तो यशस्वी करून दाखविण्याची धमक असहकारितेच्या चळवळींत नसून ती केवळ निर्जीव अशी चळवळ आहे. सरकारला सळो का पळो करून सोडण्याचें सामर्थ्य सिनफेन चळवळींत ज्याप्रमाणें होतें त्याच्या तें अल्पांशानेंही असहकारितेंत नाहीं. सिनफेन लोकांनीं विधायक व विघातक म्हणजे सरकारला पॅरलॉईज करण्याची चळवळ सुरू केली. आणि असहकारितेची चळवळ फक्त आत्मक्लेशाची आहे.

सिनफेन लोकांनीं आपल्या चळवळीस प्रारंभ अगदीं खेडेगांवांपासून केला. ग्रामसंस्था, तालुका बोर्ड, जिल्हा बोर्ड, प्रांतिक बोर्ड व पार्लमेंटपर्यंतच्या सर्व जागा त्यांनीं प्रथम आपल्या प्रतिनिधींनीं भरून टाकल्या. ते जास्त दूरदृष्टि असल्यानें त्यांनीं कौन्सिलांवर बहिष्कार पुकारला नाहीं. सरकारी राज्ययंत्रांत जेथें जेथें म्हणून आपल्या लोकांचा प्रवेश करतां येण्यासारखा आहे त्या सर्व जागा त्यांनीं आपल्या लोकांनीं भरून टाकल्या. त्यामुळें–त्यांच्याही देशांत मवाळ होतेच--नालायख व आपल्या ध्येयाशीं विरोधी असणाऱ्या लोकांस त्यांनीं ग्रामसंस्थांपासून वर पार्लमेंटपर्यंत प्रवेशच मिळूं दिला नाहीं. याप्रमाणें सरकारचीं राज्ययंत्रें अर्थात् जीं हस्तगत होण्यासारखीं होतीं तीं काबीज केल्यानंतर, त्यांनीं आपल्या विधायक कार्यक्रमास सुरुवात केली. खालपासून वरपर्यंत प्रत्येक कौन्सि-

लांत सिनफेन चळवळींशीं वचनबद्ध झालेले असे लोक प्रतिनिधि असल्या-कारणानें सरकारशीं आंतून व बाहेरून त्यांस असहकारिता करितां आली; व या-प्रमाणें त्यांची कौन्सिलप्रवेशाची चळवळ यशस्वी झाल्यावर त्यांनी कोर्टावरील बहिष्कार पुकारला. सिनफेन लोकांनीं शाळा व कॉलेजें यांवर बहिष्कार पुकारला नाहीं. त्या चळवळीचे आद्यप्रवर्तक मि. आर्थर ग्रिफिथ यांचें असें स्पष्ट मत होतें कीं, 'शाळांवर बहिष्कार पुकारणें तूर्त शक्य नाहीं. कारण सिनफेन मंडळीजवळ सर्व विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय करण्यास द्रव्यबल नाहीं. ही गोष्ट राज्य-कर्त्यांच्या मदतीशिवाय होणें शक्य नाहीं व राज्यकर्ते ज्या संस्थांच्या द्वारां ती मदत करितात त्या संस्थाच आपण काबीज केल्या म्हणजे त्या द्रव्याचा उपयोग आपल्यास इष्ट अशा प्रकारें करतां येईल.' त्याप्रमाणें सिनफेनर्सनीं ग्रामकौन्सिलां-पासून वरिष्ठ कौन्सिलापर्यंत सर्वच जागा व्यापून टाकल्याकारणानें स्वाभिमानी असाच शिक्षणक्रम त्याना सरकारी शिक्षणसंस्थांतूनच देतां आला.

यानंतरचा त्यांचा कार्यक्रम कोर्टांवरील बहिष्काराचा. सिनफेनर्सचा सर्वच कार्यक्रम अत्यंत व्यवहारिक असा होता. केवळ श्रद्धेवर त्यांनीं आपल्या राज-कारणाची उभारणी केली नव्हती. त्यांची अशी समजूत होती कीं, कोर्टावरील बहिष्कार यशस्वी करण्यास हातीं सत्ता असली पाहिजे. पंचायत कोर्टांनीं दिलेल्या निकालांची बजावणी करण्याचें सामर्थ्य पंचायतींना असल्याखेरीज त्यांच्या निका-लांचा काय उपयोग! यासाठीं त्यांनीं स्वयंसेवकाचीं पथकें निर्माण केलीं. आत्मशुद्धि करण्यासाठीं अगर आत्मक्लेश सोसण्यासाठीं त्यांनीं हीं पथकें उभारलीं नाहींत! फक्त तुरुंगांत जाण्यानें स्वराज्य मिळेल अशी त्यांची श्रद्धा नव्हती! सिनफेन लोकांच्या पंचायतींनें दिलेल्या निकालांची बजावणी करण्याचें काम या पथकांकडे सोंपविण्यांत आलें असून शिवाय देशांतील अंतर्गतव्यवस्था ठेवण्याची जबाबदारीही त्यांजवरच सोंपविण्यांत आली. हें काम त्यांनीं अत्यंत उत्कृष्ट प्रकारें बजाविलें. या सर्व कामासाठीं द्रव्यबल पाहिजे. तें त्यांनीं राष्ट्रीय कर बसवून जमा केलें. हा कर ठिकठिकाणच्या स्थानिक संस्थांनीं वसूल करावा असें ठरवून त्याप्रमाणें वसूल होऊं लागलाही. ही सर्व गोष्ट यशस्वी होण्यास मुख्य कारण एकच गोष्ट व ती ही कीं, सरकारी राज्ययंत्राचे प्रमुख भाग जीं कौन्सिलें, जेथून सर्व देशाला लागू होणारे कायदे निर्माण होतात, तीं त्यांनीं हस्तगत केलीं होतीं. हा राष्ट्रीय कर त्यांच्या चळवळीला अत्यंत उपकारक ठरला. येथें काँग्रेसचें

एक कोटी रुपयांचा फंड राष्ट्रीय चळवळीसाठीं म्हणून गोळा केला; परंतु धुळीच्या कणाप्रमाणें तो कोठें नाहींसा झाला याचा पत्ताही नाहीं. अशा कोणत्या चळवळींना पोषक होईल अशा रीतीनें त्याचा उपयोग करण्यांत आला, कीं त्यामुळें राष्ट्राची थोडी तरी प्रगति झाली? वाचकांना याचें उत्तर सहज मिळण्यासारखें आहे.

याप्रमाणें कौन्सिलें हस्तगत करून त्यांच्याकरवीं, कोर्टावरील बहिष्कार यशस्वी केला, राष्ट्रीय कर उभारून द्रव्यनिधी निर्माण केला, व खरेंखुरें राष्ट्रीय शिक्षण, शाळांवर बहिष्कार न घालतांही देण्यास सुरुवात केली. याशिवाय त्यांनीं 'राष्ट्रीयसेवा-संघ' नांवाचें एक मंडळ स्थापन केलें. या मंडळांतील सर्व सभासद सिनफेन चळवळीला वचनबद्ध झालेले असून खालपासून अगदीं वरिष्ठ कौन्सिलपर्यंत त्या सर्वच जागा त्यांनीं भरून टाकल्या असल्यामुळें जो ठराव सिनफेनर्स करतील त्याची बजावणी ते कौन्सिलांतून व बाहेरून एकसमयावच्छेदेंकरून करूं लागले. हिंदुस्थानांत कौन्सिलपक्षीयांवर ते कौन्सिलांत शिरले असतां सरकारशीं एकरूप होतील असा आरोप करणारांनीं हें सिनफेनर्स उदाहरण चांगलें लक्षांत ठेवावें. उत्कट भावनेनें कौन्सिलांतही कसें अडवणुकीचें, राष्ट्रहिताला पोषक काम करतां येतें याचें सिनफेन लोकांचें उत्कृष्ट उदाहरण आहे. सरकारची मशिनरी याप्रमाणें हस्तगत केल्यामुळें सिनफेनर्सना अलौकिक चमत्कार करतां आले. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचा म्हणजे विलायती मालावरील बहिष्काराचा.

परदेशी माल कोणता येतो, कोठें येतो, कोण घेतो, याबद्दल त्यांनीं नोंद करून त्याप्रमाणें बहिष्काराची चळवळ नेटानें सुरू केली व देशांतील कोणताही माल बाहेर पाठवितांच येऊं नये अशा प्रकारचे कर बसविले. याप्रमाणें आयर्लंडमध्यें कायदेमंडळें व अंमलबजावणी या दोन्ही खात्यांत सिनफेनर्स असल्यामुळें त्यांस हें काम करतां आलें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या कारणानें इंग्लंडला लोणी, अंडीं वगैरे हरघडी लागणारें अन्नच बंद केल्यानें त्याचें चटकन् डोळे उघडले. यानंतर शेवटचा उपाय संपाचा. आयर्लंडइतका राष्ट्रीय संप यशस्वी झाल्याचें उदाहरण क्वचितच सांपडेल. असहकारितेच्या बळावर इंग्लंडचें नाक दाबून तोंड कसें उघडतां येतें, हें आयर्लंडनें त्याच्या चांगल्या प्रकारें प्रत्ययास आणून दिलें.

आयर्लंडची चळवळ जरी सर्वस्वीं स्वावलंबनाची असली, तरी परदेशी राजकारणाला त्यांनीं केव्हांच त्याज्य ठरविलें नाहीं. परदेशांत ठिकठिकाणीं वकिलाती स्थापन केल्या, व्यापारीसंघ स्थापन केले. आयरिश लढ्याची कहाणी सर्व जगापुढें मांडून जगाची सहानुभूति मिळविली व परदेशांत आयर्लंडसंबंधीं इतकी जागृति केली कीं, आयर्लंडला स्वातंत्र्य प्राप्त होण्याला त्याचा बराच उपयोग झाला.

आयर्लंड व हिंदुस्थान यांचें हें त्रुटित साम्यदर्शन येथें घडविलें त्यावरून सिनफेन चळवळ व येथील असहकारितेची चळवळ यांत किती जमीनअस्मानाचें अंतर आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईल अशी आशा आहे; व हिंदी स्वातंत्र्याचा लढा यशस्वी करण्यात आयरिश चळवळ आदर्श म्हणून पुढें ठेवून त्याप्रमाणें कार्यक्रम आंखल्यास आयर्लंडप्रमाणेंच हिंदुस्थानही स्वातंत्र्य उपभोगूं लागेल अशी आशा आहे.

---

## परिशिष्ट

## १ आर्थर ग्रिफिथ.

आयरिश डेल ऐरीनचा अध्यक्ष आर्थर ग्रिफिथ याच्या मरणानें आयर्लंडची केवढी मोठी हानि झाली आहे याची कल्पना त्याचें चरित्र वाचल्यावांचून येणें शक्य नाहीं. आर्थर ग्रिफिथ याचा जन्म डब्लिन शहरीं सन १८७२ सालीं एका अत्यंत गरीब कुलांत झाला. त्यास शिक्षणही पुरतें मिळालें नाहीं. ख्रिश्चन ब्रदर्स स्कूलमध्यें थोडेंबहूत शिक्षण प्राप्त झाल्यावर पोटासाठीं त्यास कोठें तरी उद्योग पाहणें भाग पडलें. बऱ्या ब्रिटिश मुत्सद्यांशीं तहाच्या कलमांतील निवडानिवड करणाऱ्या आयरिश फ्री स्टेटच्या भावी अध्यक्षास छापखान्यांत कंपॉझिटर बनून खिळ्यांची निवडानिवड करण्याचा प्रसंग यावा, याहून दैवाची अधिक विचित्र लीला ती कोणती? पण एवढ्यानें त्याचें दुर्दैव संपलें नाहीं. डब्लिनचा हा कंपॉझिटर लवकरच दक्षिण आफ्रिकेंतील रँडच्या सोन्याच्या खाणीवर फावडीं खोदतांना दृष्टीस पडला.

खाणीवरील मजुराचें काम ग्रिफिथनें फारच साळसूदपणानें केलें. त्याचा गरीब, कष्टाळू व सोशिक स्वभाव पाहून त्याचे इतर काफीर सवंगडी त्यास विनोदानें

'कबूतर' म्हणत. हें नांव त्यास इतकें आवडलें कीं, दक्षिण आफ्रिकेंतून आयर्लंडांत परत आल्यावर त्यानें आपले लेख 'कबूतर' याच सहीनें प्रसिद्ध केले. शिक्षण अल्प झालें असलें, तरी त्यानें आपल्या ज्ञानांतील उणीव अंगच्या हुशारीनें भरून काढून सन १८९९ त 'युनायटेड आयरिशमन' नामक एक साप्ताहिक वर्तमानपत्र सुरू केलें. हें वर्तमानपत्र लवकरच बरेंच लोकप्रियही होऊन त्यास आपल्या पदरीं उत्कृष्ट लेखक ठेवण्याचेंही सामर्थ्य आलें. सदर पत्रांत उद्योगधंदे, अर्थशास्त्र इत्यादि विषयांवरही तो मनोरंजक लेख लिही. याहीपेक्षां 'हंगेरीचा पुनरुद्धार' या पुस्तकानें तर त्याचा लौकिक विशेष वाढविला. कोणत्याही देशाचा उद्धार स्वावलंबनावर व औद्योगिक उन्नतीवर अवलंबून आहे अशी हंगेरीचा इतिहास वाचून ग्रिफिथ याची खात्री झाली असल्यामुळें त्यानें तीच शिकवण आपल्या आयरिश बंधूंस दिली. आयर्लंडच्या उद्धाराचा मार्ग रक्त-मांसाच्या चिखलांतून नसून प्रत्यक्ष व्यावहारिक कार्यांच्या साफसूफ बसविलेल्या खडीवरून आहे असें तो म्हणत असे. अत्याचारवादी कांहीं लोक या वेळींही आयर्लंडांत होते; पण अत्याचार हें त्यांचें धोरण अद्यापि निश्चित ठरावयाचें होतें. या विषयावर सन १९०५ च्या नोव्हेंबर महिन्यांत त्यानें डब्लिन शहरीं पहिलें व्याख्यान दिलें. आयरिश भाषा, आयरिश काव्य व आयरिश चालचलणूक यांची सुधारणा केल्यानेंच आयर्लंडास स्वातंत्र्यप्राप्ति होईल, रक्तपातानें होणार नाहीं असें त्यानें आपल्या या भाषणांत प्रतिपादन केलें. ग्रिफिथच्या सिनफेन पक्षाचा एक उमेदवार पार्लमेंटच्या निवडणुकीकरितां ग्रिफिथची परवानगी न विचारतां उभा राहिला व पराभूत झाला. बाल्यावस्थेंतील सिनफेन पक्षास हा मरणप्राय धक्का बसला व त्यामुळें ग्रिफिथच्या सर्व आशा मावळल्यासारख्या दिसल्या. पण त्याच्या मित्रांनीं त्यांस मोठा धीर देऊन त्यांजकडून 'सिनफेन' नामक एक नवीन वर्तमानपत्र काढविलें. १९१४ मध्यें त्यानें 'राष्ट्रीयत्व' हें नवें पत्र चालविलें. ग्रिफिथनें, युनायटेड आयरिशमन, सिनफेन, आयार आयर्लंड, सीझर्स अँड पेस्ट, नॅशनॅलिटी, यंग आयर्लंड, इतकीं वृत्तपत्रें काढलीं. पुढें दोन वर्षांनीं आयर्लंडांत बंड होऊन त्यांत सिनफेन पक्षाची आहुति पडते कीं काय, अशी ग्रिफिथ यास भीति वाटूं लागली. या बंडाच्या ज्वाला ग्रिफिथपर्यंत पोंचून त्यास तुरुंगवास भोगावा लागला. तुरुंगांतून तो सुटून आला तेव्हां सिनफेन पक्ष कारच बळावला असून त्या पक्षाचें अध्यक्षस्थान ग्रिफिथ याच्या वांट्यास आलें.

यानंतर लागोपाठ दोन वर्षांनीं दोन वेळां त्यास कारागृह पाहावें लागलें. त्याची शेवटची सुटका १९२१ सालीं झाली.

तुरुंगांतून सुटून आल्यावर ब्रिटिश पार्लमेंटानें सुचविलेल्या तहाच्या अटी मान्य कराव्या, कीं आयर्लंड बंडाच्या भक्षस्थानीं यावें हा प्रश्न ग्रिफिथ याचे-पुढें येऊन पडला व त्यानें तहासच संमति दिली. तहावर सही केल्यानंतर कांहींहि होवो, त्यापासून ढळावयाचें नाहीं असा त्याचा पक्का निर्धार झाला. १९२२ सालीं त्यांस डेल ऐरीनचें अध्यक्षपद मिळालें. सिनफेन पक्षांत तहाच्या अटीवर फूट पडूं नये म्हणून कॉलिन्स यानें डी व्हॅलेरा याजबरोबर करार करून व्हॅलेरा पक्षास पार्लमेंटच्या निवडणुकांस उभें करण्याचा डाव टाकला. व्हॅलेरा तह उधळून लावल्यावांचून राहणार नाहीं, हें ग्रिफिथ यास पक्कें माहीत असल्यामुळें त्यानें सदर करारास विरोध केला आणि अखेर करार बाजूस राहून यादवी युद्धाचें शिंग व्हॅलेरा पक्षानें लवकरच फुंकलें.

सिनफेन पक्षांत फूट पडल्यानंतर फ्री-स्टेटवाल्या पुढाऱ्यांत ग्रिफिथ याच्या धोरणाची बरोबरी करणारा एकही इसम उरला नाहीं. कर्तृत्वापेक्षां त्याची विचार शक्ति जोरदार होती आणि वक्तृत्वापेक्षां त्याची कलमबहाद्दरी मजबूत होती. त्यांच्या अंतःकरणांत स्नेहाचा ओलावा नव्हता, यामुळें कृतनिश्चयापासून ढळण्याचा प्रसंग त्याजवर कधींहि येत नसे. उत्तम शील, परिस्थितीचें यथार्थ ज्ञान, पक्का निश्चय व राजनीतींतील मुख्य तत्त्वांची पूर्ण ओळख इत्यादि बहुमोल गुण अंगीं असल्यावर ग्रिफिथ यास सिनफेन पक्षांत अध्वर्यूचा मान मिळाला तर त्यांत नवल काय ?

## २ जनरल मायकेल कॉलिन्स.

मि. ग्रिफिथ यांच्या मृत्यूस दोन आठवडे झाले नाहींत तोंच आयरिश फ्री-स्टेट सैन्याचे मुख्य अधिपति व आयर्लंडच्या अग्रगण्य पुढाऱ्यांपैकीं मि. मायकेल कॉलिन्स यांस मृत्युमुखीं पडावें लागलें. मि. ग्रिफिथ अकस्मात पण आपल्या मरणानें मेले. परंतु मि. कॉलिन्स यांस बंडवाल्या इसमांनीं दबा धरून, गोळी घालून ठार केलें. मि. ग्रिफिथ यांच्या मृत्यूनें फ्री-स्टेट पक्ष एका मुत्सद्यास मुकला; पण कॉलिन्स यांच्या मृत्यूनें फ्री-स्टेट पक्षाचा मुख्य योद्धा व कर्णधार नाहींसा झाला. बंडवाले व फ्री-स्टेट पक्ष यांचे दरम्यान झटापटी चालू

असतां कॉलिन्सचा बळी पडल्यानें फ्री-स्टेट पक्षाचा धीर क्षणमात्र खचल्या-सारखा होणें अगदीं स्वाभाविक आहे. स्वातंत्र्यवादी बंडवाल्यांचा पुंडावा कॉर्क पडल्यापासून बहुतेक मोडून गनिमी काव्यानें तुरळक छापे घालण्यापलीकडे महत्वाचें कार्य त्यांच्या हातून व्हावयाचें थांबलें होतें. अशा वेळीं हा मोठा बळी घेतल्यामुळें त्यांस आपल्या पक्षाची सरशी झाल्यासारखी वाटली तरी पूर्ण विचाराअंतीं आपण ही मोठी चूक केली असें त्यांस समजून आल्यावांचून राहणार नाहीं. फ्री-स्टेट पक्ष आतांपर्यंत बंडवालेही आपले मित्र व बंधू होत, ही मुद्याची गोष्ट लक्षांत बाळगूनच मोठ्या सौजन्यानें वागत आला होता. परंतु बंडवाल्यांनीं वेगळाच मार्ग आंखला. यशाची आशा उरली नसल्यामुळें वैताग-लेल्या मनाचें समाधान त्यांस कॉलिन्ससारख्या वीरशिरोमणीचें रक्त सांडल्या-वांचून करून घेण्यास दुसरा मार्गच उरलेला नसावा असें दिसतें. बंडवाल्यांनीं प्रस्तुतच्या बंडाळींत आयरिश लोकांच्या मालमत्तेचें अपरिमित नुकसान केलें आहे व त्यामुळें जनतेस त्याजविषयीं तिटकाराही उत्पन्न झाला आहे. परंतु कॉलिन्सच्या खुनानें त्या सर्वांवर क्रौर्याचा कळस चढविला असल्यामुळें बहुजन-समाजापैकीं ज्या थोड्या लोकांस त्यांजविषयीं पूर्वी सहानुभूति वाटत असेल त्यांचींही मनें विटल्याशिवाय राहणार नाहींत.

मरणसमयीं कॉलिन्स याचें वय अवघें ३२ वर्षांचें होतें. त्याचें शिक्षण लंडन शहरीं किंग्ज कॉलेजमध्यें झालें. त्यानंतर जनरल पोस्ट ऑफिसमध्यें त्यानें सॉर्टरचेंही कांहीं दिवस काम केलें आणि डब्लिनच्या एका पेढीवर कारकुनीही केली. त्यापुढें १९१६ च्या बंडांत सामील झाल्याच्या गुन्ह्याबद्दल त्यास तुरुंगवास भोगावा लागला. पण सर्व गुन्हेगारांस मिळालेल्या माफींत त्याची थोड्या दिवसांनीं मुक्तता झाली. सिनफेनच्या चळवळींत तो अधिक उदयास आला. बोअर पुढारी डीवेटप्रमाणें प्रतिपक्षाच्या हातावर तुरी देऊन निसटून जाण्याची कला त्यास चांगली अवगत असल्यामुळें त्याचें नांव सर्वतोमुखीं झालें. सिन-फेन पलटणींत त्याजकडे मोठासा हुद्दा नव्हता, तरी पण सिनफेन पुढाऱ्यांत त्याची प्रामुख्यानें गणना होत असे. १९२१ सालीं कॉर्कतर्फे दक्षिण-पार्लमेंटास त्याची निवडणूक झाली. इंग्रजी फौजेविरुद्ध आयरिश लोकांचें त्यानें सेनानित्व पत्करल्यावर त्याची कीर्ति इतकी वाढली कीं, त्याचें चरित्र लिहिण्याचा हक्क त्याजपासून मिळविण्यासाठीं लंडनच्या एका प्रकाशकानें त्यास दहा हजार पौंड

देऊं केले. आयरिश सिनफेनर व ब्रिटिश सैनिक एकमेकांचे खून पाडीत असतां ब्रिटिश सरकारशीं तह करण्यास उत्सुक झालेल्या पुढाऱ्यांपैकीं कॉलिन्सही एक होता. ब्रिटिश मुख्य प्रधान मि. लॉईड जॉर्ज यांनीं घातलेल्या तहाच्या अटी कॉलिन्स यास पत्करराव्या लागल्या. डी व्हॅलेरा यास त्या न पटून तो कॉलिन्स व ग्रिफिथ या संवगड्यांपासून फटकला आणि अशा रीतीनें सिनफेन पक्षांत फूट पडून तिचें पर्यवसान कॉलिन्सच्या खुनांत झालें. कॉलिन्स स्वभावानें मोठा आनंदी व विनोदी असून शरीरानें उंच, धिप्पाड व बळकट होता. शहाणपण, वक्तृत्व, वादविवादपटुत्व व निर्धार इत्यादि पुढाऱ्यास अवश्य असणारे बहुतेक गुण त्याच्या अंगीं वसत असल्यामुळें फ्री-स्टेट पक्षाचीं मुख्य सूत्रें सहजच त्याच्या हातीं गेलीं. कॉलिन्सचें मरणही मोठ्या चमत्कारिक रीतीनें ओढवलें. तो, डाल्टन व ओकोनेल यांसह, कॉर्क शहराहून आपल्या पक्षाचीं आजूबाजूचीं ठाणीं पाहण्यास चिलखती मोटारींतून बाहेर पडला होता. संध्याकाळीं परत येतांना मुख्य रस्ता नादुरुस्त झाल्यामुळें त्यास जंगलांतील डोंगरी रस्ता हुडकावा लागला, अशा अडचणीच्या जागेंत त्याजवर दबून बसलेल्या दोनशें बंडवाल्यांनीं हल्ला केला. कॉलिन्सबरोबर अवघीं दहाच माणसें होतीं. तथापि चिलखती मोटारींच्या बळावर तीं एक तासभर शत्रूंशीं झुजलीं. कॉलिन्स मोटारींतून उडी मारून रायफल घेऊन शत्रूच्या अंगावर धांवला. कॉलिन्सच्या टोळीस यश येणार असें वाटूं लागलें होतें तोंच कॉलिन्स गोळी लागून ठार झाला.

## ३ डी व्हॅलेरा.

इमॉन डी व्हॅलेरा याचा जन्म सन १८८३ सालीं झाला. त्याचा बाप व्हिव्हियन डी व्हॅलेरा हा स्पेनमधील रहिवाशी असून चित्रकार होता. इमॉन डी व्हॅलेरा हा आपल्या वयाच्या दुसऱ्या वर्षी आयर्लंडमध्यें आला व त्याचें शिक्षण ब्लॅकरॉक कॉलेजमध्यें झालें. सन १९०४ सालीं यानें पदवी घेतली हा चांगला गणितज्ञ आहे. त्यानें गणित शिकविण्याचें कामही बरेच दिवस निरनिराळ्या कॉलेजांतून केलें आहे. सन १९१० सालीं त्यानें डब्लिन शाळेंत अध्यापिका मिस् एस्. ओ. हॉनिगन इच्याशीं विवाह केला. आज त्यांस सहा मुलें आहेत.

सन १९१६ सालीं डब्लिन येथें ईस्टरमध्यें जो गोंधळ उडाला, तेव्हांपासून त्याचें नांव पुढें आलें. त्या वेळीं त्याला जन्मठेपीची शिक्षा झाली होती; पण

१९१७ सालीं सर्वच राजकीय कैदी सोडण्यांत आले त्यांत याचीही सुटका झाली. सन १९१७ साली सिनफेन लोकांची सभा होऊन तींत याला आयरिश रिपब्लिकचा अध्यक्ष निवडण्यांत आला. परंतु तें अधिकारपद म्हणजे केवळ सुळावरची पोळी होती. सन १९१८ सालीं त्याला पुनः पकडण्यांत आलें; पण त्या वेळीं तो लिंकन तुरुंगांतून मोठ्या शिताफीनें निसटला व तेथून १९१९ सालीं अमेरिकेंत सिनफेन चळवळ करण्यासाठीं गेला. व तेथें त्याला अतिशय सहानुभूति मिळाली. सन १९१७ सालीं तो पार्लमेंटमध्यें निवडून आला होता, तरी सिनफेनच्या नियमाप्रमाणें तो पार्लमेंटांत सभासद या नात्यानें हजरच राहिला नाहीं.

डी व्हॅलराच्या आयुष्यक्रमांत गेलीं तीन वर्षें अत्यंत महत्त्वपूर्ण अशीं गेलीं. सर्व आयर्लंडचा नेता या नात्यानें अखिल जगाचे डोळे त्याच्या हाल-चालीकडे लागलेले असत. सन १९२१ सालीं इंग्लंडच्या मुख्य प्रधानानें ब्रिटिश साम्राज्यांत आयर्लंडचा स्वाभिमानपूर्वक समावेश कसा करून घेतां येईल, याचा विचार करण्यासाठीं डी व्हॅलरा यास मसलतीस बोलाविलें व त्याप्रमाणें ता. ११ आक्टोबर १९२१ रोजीं ही शांततापरिषद् लंडन येथें भरली. इंग्लंडचे प्रतिनिधि, लॉइड जॉर्ज, चेंबरलेन, लॉर्ड बर्कनहेड, चर्चिल, सर एल्. वर्दिंगटन, इव्हान्स व सर हॅमर ग्रीनवुड हे असून आयर्लंडचे प्रतिनिधि, आर्थर ग्रिफिथ, मायकेल कॉलिन्स, बार्टन, डगन्, व ग्रेव्हन डफी हे होते. खूप वाद-विवाद झाला. डी व्हॅलरा या वेळीं डब्लिन येथें होता. याचा सल्ला घेण्याकरितां प्रतिनिधींचे कितीतरी हेलपाटे तेथवर झाले व शेवटीं ता. ६ डिसेंबर १९२१ रोजीं प्रतिनिधींच्या तहनाम्यावर सह्या झाल्या. बादशहांनीं त्यास संमति दिली. सर्व राजकीय कैद्यांना मुक्त करण्यांत आलें. परंतु डी व्हॅलरा व त्याचे अनुयायी यांचें मात्र समाधान झालें नाहीं. जोंपर्यंत इंग्लंडचें वर्चस्व आयर्लंडवर आहे, तोंपर्यंत तडजोड होणें त्यांना संमत नव्हतें. डेल ऐरननें त्या तहास मान्यता दिली. परंतु डी व्हॅलरा यानें कशालाच संमति दिली नाहीं व पूर्ण स्वातंत्र्य संपादन होइपर्यंत लढण्याचा त्यानें आपला निश्चय जाहीर केला. कॉलिन्सनें हें अंतस्थ युद्ध मोडलें; परंतु त्यांत त्याला बळी पडावें लागलें. ता. २ ऑगस्ट १९२२ रोजीं ग्रिफिथ अकस्मात मृत्यू पावला; पण हळुहळू व्हॅलरा यांचेंही अवसान खचूं लागून आपल्या अनुयायांस शस्त्रसंन्यास करण्याबद्दल त्यानें जाहीर-

नामा काढला. गेल्या निवडणुकींत एका सभेंत तो भाषण करीत असतां फ्री-स्टेट सैन्याकडून त्यास पकडण्यांत आलें व तेव्हांपासून आयर्लंडमध्यें पुनः शांतता नांदू लागली आहे.

## ४ कॉसग्रेव्ह.

मि. ग्रिफिथ याच्या मृत्यूनंतर डेल ऐरिनच्या अध्यक्षपदावर मि. कॉसग्रेव्ह याची नेमणूक झाली. कॉसग्रेव्ह सार्वजनिक चळवळींत पक्का मुरलेला आहे. १९१६ मध्यें आयर्लंडांत उसळलेल्या बंडांत सामील होण्यापूर्वी कॉसग्रेव्ह म्युनिसिपालिटीचा एक सभासद होता. कॉसग्रेव्हच्या स्वभावावरून तो बंडाचा पुढाकार घेईल अशी कोणाचीही कल्पना नव्हती. पण 'साऊथ डब्लिन वर्क हाऊस्' वर ब्रिटिश फौज चालून गेली तेव्हां तिला तेथील बंडवाल्यांचें अधिपत्य कॉसग्रेव्हकडे असल्याचेंच दिसून आलें. लढतां लढतां त्याचा भाऊ ठार होऊन पडल्यामुळें त्याची कामगिरी कॉसग्रेव्ह यास पुढाकार घेऊन चालवावी लागली. व यामुळें त्यास फांशीची शिक्षा सुनावण्यांत आली! परंतु कॉसग्रेव्हच्या अधिपत्यासंबंधीं खरा प्रकार वरीलप्रमाणें समजून आल्यावर त्यास फांशीऐवजीं जन्मठेप काळेंपाणी देण्यांत आलें. १९१७ सालीं बंडांतील सर्व कैद्यांबरोबर कॉसग्रेव्ह याचीही मुक्तता झाली. या वेळीं पार्लमेंटाच्या पोटनिवडणुकीस डी व्हॅलेराप्रभृति सिनफेनर उभे होते; त्यांत कॉसग्रेव्हही असून तोही निवडून आला. यानंतर सिनफेन पक्षावर सरकारची वक्रदृष्टि फिरून कॉसग्रेव्ह यास माउंटजॉय येथील तुरुंगांत पाठविण्यांत आलें. तेथील कैद्यांनीं प्रायोपवेशन केलें, त्यांजबरोबर कॉसग्रेव्हही उपाशी राहिला. तुरुंगांतून सुटल्यावर डेल ऐरीनमधील प्रधानमंडळांत त्याची नेमणूक झाली. तह होऊन सिनफेन पक्षांत फाटाफूट झाली तेव्हां तो कॉलिन्स-पक्षास चिकटून राहिला. ग्रिफिथचा तर तो उजवा हात होता. हा मोठा विनोदी, शहाणा, युक्तिवान् व थंड डोक्याचा असून प्रतिपक्षी कितीही संतापला तरी त्यास शांतपणानें उत्तर देण्याची कला कॉसग्रेव्ह यास इतकी बेमालूम साधली आहे, कीं प्रतिपक्षियास हा आपली टर उडवितो आहे कीं काय, अशीही वारंवार शंका येत असे. ग्रिफिथचें कार्य पुढें चालविण्यास त्याच्याच तालमींत तयार झालेला कॉसग्रेव्ह हाच लायक ठरला; इतकेंच नाहीं, तर गेल्या निवडणुकींतही प्रचंड बहुमतानें अध्यक्षपदावर पुनः त्याचीच निवड करण्यांत आली.

—४—

# इजिप्तचें स्वातंत्र्यहरण.

The Slave that Scorns his own life holds the life of his master in his power. —*SENECA*.

पारतंत्र्यांतून स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलेल्या प्रत्येक देशाच्या इतिहासांत असहकारितेच्या चळवळींचीं बीजें कोणत्याना कोणत्या स्वरूपांत तरी असतातच. किंबहुना असहकारितेखेरीज स्वातंत्र्य संपादतांच येत नाहीं, असें म्हटलें असतांही चालेल. मागील प्रकरणांत किंवा प्रस्तुतच्या इजिप्तच्या स्वातंत्र्याच्या झगड्यांत एक प्रकारचें साम्य दिसून येतें व तशाच प्रकारचें साम्य हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यांतही पदोपदीं आढळून येतें.

मिसरदेशाचा प्राचीन इतिहास अत्यंत मनोवेधक व वैभवशाली असला तरी त्याचें वर्णन करण्याचें हें स्थळ नसल्यानें त्याचा तात्पुरता उल्लेख करून मागाहून मुख्य विषयाकडे वळूं !

सन १५१७ सालीं तुर्कस्थानचा पराक्रमी सुलतान सेलीम यानें मिसरदेश आपल्या अधिराज्याखालीं आणला. तेव्हांपासून १९१४ सालापर्यंत तो तुर्कांच्या साम्राज्यांत समाविष्ट होत असे. १८०७ सालीं महमदअली नांवाचा अत्यंत पराक्रमी पुरुष निपजला. त्यानें व त्याचा मुलगा इब्राहिम यानें इंग्रज व ग्रीक यांची हद्दी नरम करून युरोपियन सैनिकांविषयीं वाटत असलेला बाऊ नष्ट करून टाकिला. हा मोठा नामांकित राज्यकर्ता होऊन इजिप्तच्या कल्याणासाठीं जमीन महसूल, सैन्य, आरमार यांची नीट व्यवस्था लाविली, आणि मोठीं धरणें बांधिलीं. 'आम्हीं स्वतःच्या बळावरच युरोपियन राष्ट्रांच्या बरोबरीला येऊं,' असें तो स्वाभिमान व यथार्थतापूर्वक म्हणे. परंतु याच्याच हातून न समजतां अशी एक चूक घडून आली, कीं त्यामुळें कालांतरानें इजिप्तला आपल्या स्वातंत्र्यास मुकावें लागलें. ती गोष्ट म्हणजे त्यानें युरोपियन व्यापाऱ्यांस इजिप्तमध्यें व्यापार करण्यासाठीं बऱ्याच सवलती दिल्या, ही होय ! एकदां अशा व्यापाराच्या निमित्तानें त्यांनीं आपला पाय इजिप्तमध्यें शिरकावल्यानंतर त्याचे पुढें काय परिणाम झाले असतील, याची कल्पना हिंदी लोकांस तरी बरोबर

रीतीनें करतां येईल ! महमदअलीनंतर पहिला अब्बास हा खेदीव झाला. त्याला गोऱ्या लोकांची फार चीड असे व सुदैवानें त्याला जास्त आयुष्य असतें, तर त्यानें इजिप्तमधील युरोपियन लोकांचीं पाळेंमुळें पार खणून काढिलीं असतीं. परंतु दुर्दैवानें त्याचा लवकरच खून झाला. व त्याच्यानंतर इजिप्तच्या गादीवर आलेला खेदीव इस्माइल यानें तर युरोपियनांस आपल्या अगदीं जवळ केलें. तो अत्यंत उधळया असल्यानें युरोपियन राष्ट्रांचें त्याला इतकें कर्ज झालें कीं, त्यांत इजिप्तच्या स्वातंत्र्याची आहुति पडली. इस्माइलच्या उधळेपणाची अशीही एक गोष्ट सांगण्यांत येते कीं, कांहीं निमकहराम गोऱ्या सावकारांनीं त्यास उधळेपट्टी करण्यास व कर्ज काढण्यास उत्तेजनच द्यावें. कर्जाच्या पर्वताखालीं अगदीं चिरडून गेल्यावर त्याचे डोळे उघडले; पण त्यापूर्वींच गोऱ्या सावकारानीं नेमलेल्या कर्ज कमिशननें त्यास पदच्युत करून त्याच्या जागीं टय़ुफीक नांवाचें एक बाहुलें बसविलें.

खेदीव इस्माइल याला पदच्युत करण्यापूर्वी गोऱ्या राष्ट्रांनीं त्याच्यावर ज्या अटी लादल्या, त्या मला जनतेच्या संमतिशिवाय मान्य करितां येत नाहींत असें त्यानें उत्तर दिलें. त्याचा त्या वेळीं उपयोग झाला नाहीं; तरी त्यानें 'प्रजा संमती'चें जें तत्त्व उच्चारलें त्यांत इजिप्तच्या राष्ट्रीय चळवळीचीं बीजें आहेत.

या चळवळीचा आद्य जनक अरबी पाशा हा होय ! आतांपावेतों इजिप्तवर तुर्कांची साम्राज्यसत्ता असल्यानें इजिप्तमधील सर्व मोठमोठया अधिकारांच्या जागांवरून व सैन्यामधून तुर्की लोकांचा भरणा असे. योग्य व लायक अशा इजिप्शियन मनुष्यास तेथें महत्पदावर चढण्यास वावच नसे, त्याबद्दल लोकांच्या मनांत असंतोष उत्पन्न झाला. तो उत्पन्न होतांच तशाच संधींत इस्माइल यास पदभ्रष्ट करून गोरा दिवाण नेमण्यांत आला. एकाद्या गोऱ्या मनुष्यानें आपणांवर राज्य करणें ही गोष्ट इजिप्शियन लोकांस अत्यंत अपमानास्पद व धर्मबाह्य अशी वाटली. अशाच वेळीं अरबीनें आपली चळवळ सुरू केली. थोडक्याच काळांत अरबीच्या पक्षाला देशांतील सधन असा सरदारवर्ग येऊन मिळाला व गोऱ्या लोकां-विरुद्ध त्यानें नेटानें मोहीम सुरू केली. त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, खेदीवानें जुनें प्रधानमंडळ रद्द करून नवें प्रधानमंडळ बनविलें व त्यांत अरबी पाशा हा युद्धमंत्री झाला. गोऱ्या लोकांविरुद्ध अरबी पाशा असल्याचा पूर्वींपासूनच त्याचा लौकिक असल्यानें तो युद्धमंत्री होतांच गोऱ्या लोकांचें

धावें दणाणलें. व त्याचा पाडाव करण्यासाठीं इंग्रज व फ्रेंच यांनीं संगनमत करून तयारी चालविली. इतक्यांत अलेक्झांड्रा येथें पन्नास गोऱ्या लोकांची कत्तल झाली. वस्तुतः त्या कत्तलीशीं अरबीचा अर्थाअर्थी सुद्धां कांहीं संबंध नव्हता. परंतु अशा रीतीनें आलेली सोन्याची संधी गोरे लोक थोडीच सोडतात ! इंग्रजांनीं एकदम अलेक्झांड्रियावर तोफा डागून सन १८८२ मध्यें अरबीचा पराभव केला, त्यास पकडून सीलोनला हद्दपार केला व इजिप्त आपल्या घशांत उतरविला. इजिप्शियन स्वातंत्र्ययुद्धाचा पहिला अंक येथें समाप्त झाला.

कोंबड्यानें गिळलेल्या माणकाप्रमाणें इंग्रजी साम्राज्यतृष्णा आहे ही गोष्ट सर्वश्रुत असल्यानें एकदां इजिप्त हातीं आल्यावर तो ते सुखासमाधानानें परत करतील, ही अपेक्षा मुसळास फुटणाऱ्या अंकुराप्रमाणेंच कष्टप्रद होती. परंतु स्वार्थी इंग्रज मुत्सद्दी 'इजिप्तची ही व्याद आम्हांस नको. ही उगीच आमच्या गळ्यांत पडली' वगैरे नक्राश्रु ढाळीत होते. व लवकरच तुमच्या स्वाधीन इजिप्त करतों अशा थापाही मारीत होते. परंतु इजिप्त हातीं राखण्याचें महत्त्व इंग्रजांना कळत नव्हतें असें नसून इजिप्त हातीं आणण्याची त्यांची फार दिवसांची धडपड आकस्मिक रीतीनें यशस्वी झाली तरी बाह्यतः मात्र ते निरिच्छतेचा आंव आणीत ! १८८७ सालीं लॉर्ड सॅलिस्बरीनें दोन वर्षांतच इजिप्त सोडून जातो असा सुलतानाशीं करारही केला. पण हीं दोन वर्षें कांहीं झालें तरी संपेनातच !

इंग्रज लोक म्हणजे जगाचा उद्धार करण्यासाठीं निपजले आहेत; निदान असं ते सर्वत्र भासवतात तरी ! इजिप्त देश त्यांची इच्छा नसतांही त्यांच्या ताब्यांत आला. अर्थात् त्याला सुधारण्याची जबाबदारीही परमेश्वरानेंच त्यांच्यावर टाकली. एकदम इजिप्तची सर्वांगसुंदर सुधारणा करण्याचें त्यांनीं ठरवून हिंदुस्थानाप्रमाणेंच तेथेंही सुधारणेचा नवा मनु अकस्मात् उदयास आला. राज्यकारभाराचा सर्व बोजा परमेश्वरानेंच इंग्रजांवर लादल्यानें त्यांनीं स्वाभाविकच इजिप्शियन लोकांस राज्यकारभाराची कांहींसुद्धां दगदग पडूं न देण्याचा निश्चय करून सर्व जबाबदारी आपण पत्करली. हिंदुस्थानाप्रमाणें सुधारलेलीं कौन्सिलें निर्माण केलीं. या कौन्सिलांचे ठराव राज्यकारभार करणारांना बंधनकारक मात्र नसत. बोलून चालून इजिप्शियन लोकांस राज्यकारभारचे धडे शिकविण्या-

साठीं उघडलेल्या कौन्सिलरूपी शाळा! त्यांचे ठराव विलायती कसलेल्या मुत्सद्यांनीं कां मानावे!

ब्रिटिश अधिकारी फक्त सल्लागार म्हणून नेमण्यांत येत. प्रथम ही सल्लागारांची संख्या फक्त दोनतीनशें होती. सन १९२० पर्यंत त्यांची संख्या सोळाशेंपर्यंत पोहोंचली. सर्व जबाबदारीच्या व मोठ्या पगाराच्या जागा ब्रिटिश लोकांकडे असत. कित्येक तरुण इजिप्शियन मोठमोठ्या पाश्चात्य विद्यालयांतून उत्तम प्रकारें परीक्षा पास होऊन येत व युरोपियन लोकांच्यापेक्षां कोणत्याही गुणांत किंचितही कमी नसतां इजिप्तमध्यें मात्र गोऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं त्यास तुच्छतेनें अस्पृश्याप्रमाणें वागवावें, या गोष्टीची तरुण इजिप्शियनांस अत्यंत चीड येई. ब्रिटिशांच्या चढेलवृत्तीनें ते सतत जळूं लागले. राज्यकारभारांत कसलीही सत्ता नाहीं, बाहेर पदोपदीं अपमान. असा सर्वत्र असंतोष उत्पन्न झाल्यामुळें क्रोमरसाहेबांनीं इजिप्तमध्यें सुधारणा (!) सुरू केल्या. त्यांना दुसरी उपमाच द्यावयाची असल्यास मोर्लेमिंटो सुधारणांप्रमाणें त्या सुधारणा होत्या.

प्रत्येक जित राष्ट्रांत असा एक असतो कीं, त्याच्या अस्तित्वामुळेंच तें राष्ट्र 'जित राष्ट्र' या सदरांत गणलें जातें. क्रोमरसाहेबांनीं असल्या फुसक्या सुधारणा दिल्याबरोबर त्यांच्या आरत्या करून नाचणारा असा एक हांजी-खोरांचा वर्ग इजिप्तमध्यें होताच; व त्यांच्या सहाय्यावरच ब्रिटिशांचे पाय स्थिर झाले. गोऱ्या लोकांइतके स्वार्थसाधु व नीचवृत्तीचे लोक इतरत्र फार क्वचित् सांपडतील. त्यांनीं खेदीवापासून सवलतीच्या सनदा म्हणून कांहीं हक्क संपादन केले होते. परंतु खेदीवांची सत्ता कमी कमी होऊं लागतांच या सनदांना हक्कांचें स्वरूप येऊन इजिप्तच्या लोकांवर राजरोस जुलूम करण्यास त्यांना आपल्या हातीं एक शस्त्रच मिळाल्यासारखें झालें. त्या सनदांचें स्वरूप खालीलप्रमाणें आहे:—

१ इजिप्तमधल्या कोणत्याही परकीयावर, सवलती उपभोगणाऱ्या सर्व परकीय राष्ट्रांच्या संमतीशिवाय कोणताही प्रत्यक्ष कर बसवूं नये!

२ परकीय आणि इजिप्शियन ह्यांच्यामधील, किंवा परकीय-परकीयांमधील, सर्व दिवाणी कज्जे ज्यांच्यांत परकीय न्यायाधिशांची संख्या जास्त आहे व इजिप्शियन न्यायाधिशांची संख्या कमी आहे अशा मिश्र कोर्टापुढें चालावे!

३ परकीयांच्या विरुद्ध बहुतेक सर्व फौजदारी कज्जे ज्या राष्ट्राचा परकीय गुन्हेगार असेल त्या राष्ट्राच्या इजिप्तांतील परराष्ट्रीय प्रधानाच्या कोर्टांतच चालावे!

४ परराष्ट्रीय प्रधानच्या संमतीशिवाय कोणासही, खुद्द इजिप्शियन पोलिसासही, आग विझविण्याशिवाय किंवा स्वतःचा प्राण बचावण्याकरितां त्या परकीय माणसानें बोलावल्याशिवाय त्याच्या घरांत जातां येऊं नये !

या सनदांच्या जोरावर सुधारलेल्या गोऱ्या लोकांनीं वाटेल तशीं कृष्णकृत्यें आरंभिलीं व त्यामुळेंच इजिप्तचा राष्ट्राभिमान जागा झाला. एके वेळीं कांहीं गोऱ्या अधिकाऱ्यांवर अडाणी इजिप्शियन लोकांनीं हल्ले करून त्यांना मारिलें, त्यावरून इंग्रज गोऱ्या अधिकाऱ्यांनीं न्यायाच्या नांवाखालीं त्या गरीब लोकांचा जो अमानुष छळ केला तो 'कोणताही इंग्रज मनुष्य अंगावर रोमांच उभे राहिल्याशिवाय तें प्रकरण वाचूंच शकत नाहीं.' असें खुद्द चिरोलसाहेब लिहितात. देनशावी प्रकरण या नांवानें हें दुष्टकृत्य प्रसिद्ध आहे. याशिवाय महायुद्धांत इजिप्तमधील लोकसंख्येपैकीं $\frac{1}{13}$ लोकसंख्या जबरदस्तीनें लष्करांत दाखल केली. लोकांचें धान्य व इतर माल मनमानेल त्याप्रमाणें लुबाडण्यांत आला व या सर्व जुलमांचा इतका अतिरेक झाला कीं, त्यांतून सुटण्यास स्वातंत्र्याशिवाय अन्य तरणोपायच नाहीं अशी जनतेची खात्री झाली व इजिप्तच्या स्वातंत्र्याच्या झगड्यास खरी सुरवात येथूनच झाली.

जित लोकांशीं इंग्रज अधिकाऱ्यांचें वर्तनही इतकें उद्धटपणाचें असे कीं, लोकांना त्यांची चीड येऊं लागली. १९१३ सालीं तेथें नवीं कौन्सिलें स्थापण्यांत आलीं; परंतु त्या कौन्सिलांच्या नामकरणविधीपेक्षां जास्त वेळां तीं भरूंच दिलीं नाहींत. इतक्यांत १९१४ सालीं महायुद्धास सुरवात झाली व तुर्कांनीं दोस्तराष्ट्रांशीं युद्ध पुकारलें. तुर्काशीं युद्ध पुकारण्याच्या अगोदर इजिप्त देश नाममात्र कां होईना, पण तुर्की साम्राज्यसत्तेखालीं मोडत असे. पण त्यानंतर इंग्रजांनीं तो आपल्या कृपाछत्राखालीं (प्रोटेक्टेरेट) घेतला, व त्या वेळचा मुख्य प्रधान रशदी पाशा याला अभिवचन देण्यांत आलें कीं, युद्धकाळांतील हालचालींस इजिप्शियन लोकांनीं विरोध केला नाहीं, तर युद्ध संपतांच त्यांना स्वराज्य देण्यांत येईल. या अभिवचनानें इजिप्शियन लोकही तात्पुरते शांत झाले. ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं पत्रें, तारा, वृत्तपत्रें यांवर असह्य अशा प्रकारचें सेन्सॉरचें नियंत्रण सुरूं केलें. लोकांकडून जुलुमजबरदस्तीनें वैरण, धान्य व जनावरें लुबाडिलीं. लोकांस सक्तीनें सैन्यांत कोंबलें. या सर्व प्रकारामुळें इजिप्तमधील बहुजनसमाज अगदीं काहून गेला व इंग्रजांच्याबद्दल त्यांच्यांत अत्यंत अप्रीति उत्पन्न झाली.

तथापि युद्धकाळांत अशा गोष्टी होणें अपरिहार्य आहे. युद्ध संपतांच आपणांस स्वराज्य देण्याचें इंग्रजांनीं अभिवचन दिलें आहे, या भरंवशावर इजिप्शियन लोक शांत राहिले. परंतु स्वातंत्र्याऐवजीं अनन्वित जुलूम सुरू झाला, लष्करी कायदा थैमान घालूं लागला, मोठमोठ्या इजिप्शियन लोकांचे अपमान होऊं लागले, मुख्य प्रधान रशदीपाशा हा इंग्लंडांत जाऊन तेथें परराष्ट्रीय खात्याशीं इजिप्तबद्दल वाटाघाट करतों, असें म्हणूं लागला. परंतु इजिप्तसारख्या क्षुद्र प्रश्नाबद्दल वाटाघाट करण्यास हल्लीं सवड नाहीं असें उन्मत्तपणें त्यांस सांगण्यांत आलें. त्याबरोबर रशदीपाशाच्या मंत्रिमंडळानें राजीनामा दिला व सुमारें सहा महिने इजिप्तमध्यें मंत्रिमंडळच नव्हतें. वर्तमानपत्रांवर अत्यंत कडक असे निर्बंध घातले होते, तरी अन्यायाच्या बातम्या सर्व देशभर पसरून सर्वत्र लोकक्षोभ उत्पन्न झाला.

प्रे० विल्सनसाहेबांनीं स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा उच्चार केला, तेव्हां इजिप्शियन लोकांस पुनः आशा उत्पन्न झाली व शांतता परिषदेस त्यांनीं प्रतिनिधि पाठविण्याचें ठरविलें. परंतु त्यांना प्रतिनिधि पाठविण्यास परवानगी देण्यांत आली नाहीं व हेज्ड येथें नवीन निर्माण केलेल्या राजास मात्र आपला वकील त्या परिषदेस पाठविण्यास सवलत मिळाली, हें पाहून मात्र इजिप्शियन लोक अत्यंत संतप्त झाले.

याप्रमाणें लोकमत अत्यंत प्रक्षुब्ध झालें असतां लोकमताचा पुरस्कार करणारा एक राष्ट्रवीर अचानक पुढें आला. हा लोकधुरीण झगलूल पाशा हा होय! सय्यद झगलूल पाशा हा लॉर्ड क्रोमर यांच्या राजवटींत शिक्षणखात्याचा मंत्री असून कायरो येथील इजिप्शियन विश्वविद्यालयाचा चान्सेलरही होता. झगलूल पाशा म्हणजे इजिप्शियन राष्ट्रीय चळवळीचा प्राण आहे. व जनतेचाही त्याच्यावर सर्वतोपरी विश्वास आहे. मुख्य प्रधान रशदी पाशा याला विलायतेस जाण्याची परवानगी मिळाली नाहीं. तेव्हां झगलूलनें एक राष्ट्रीय पक्षाचें शिष्टमंडळ पॅरीस येथें पाठविण्यासाठीं तयार केलें. त्याला आशा वाटत होती कीं, इंग्लंड आपला निकाल फिरवून आपणास जाऊं देईल. व प्रे० विल्सनही आपली मुलाखत घेईल. त्यानें अठरा गृहस्थांची एक कमिटी तयार केली. त्या कमिटीनें आपल्या मागण्या जाहीरपत्रकाचे रूपानें तहपरिषदेच्या प्रतिनिधींपुढें मांडण्याचें ठरविलें; परंतु इंग्रज अधिकाऱ्यांनीं तीं पत्रकें वांटण्यासच बंदी केली. या हुकुमाची बजावणी होण्यापूर्वीच त्यावर वीस लक्षांहून जास्त सह्या झाल्या होत्या.

झगलूल पाशाच्या या शिष्टमंडळास इजिप्शियन मवाळांनींही मान्यता दिली. तथापि सरकारनें शिष्टमंडळ पाठविण्यासच परवानगी दिली नाहीं व शिष्टमंडळ लोकांच्या संमतीनें जात नाहीं, असा त्यावर शिक्का मारून त्यांना पासपोर्ट देण्यांत आले नाहींत. हा प्रकार पाहतांच झगलूल पाशानें अत्यंत शांततेच्या मार्गानेंच पण निषेधाचा मारा चालविला व तो गोऱ्या नोकरशाहीला इतका जाचक झाला कीं, शेवटीं तिला आपलें शिलकी अस्त्र बाहेर काढावें लागून झगलूल, हमीद, इस्मायल व महमद या शिष्टमंडळाच्या चार पुढाऱ्यांस एकदम माल्टा येथें हद्दपार करण्यांत आलें.

झगलूल पाशाची हद्दपारी जाहीर होतांच अपमानानें अगोदरच चिडून गेलेले इजिप्शियन जास्तच चिडले! ठिकठिकाणीं लोकांच्या व इंग्रज अधिकाऱ्यांच्या चकमकी होऊं लागल्या. आगगाड्या, पोस्टें, तारायंत्रें, सरकारी कचेऱ्या यांवर हल्ले होऊन, कित्येक ठिकाणीं आगी लावल्या गेल्या. पण याचें पर्यवसान म्हणजे शेवटीं इजिप्शियन लोकांस बंडखोर ठरवून त्यांवर सरसहा गोळ्या झाडून दंगे शांत करण्यांत आले. लोकांच्या हातून बेहोषपणानें दंगे झाले असले तरी त्यांच्या पापाचें खापर मात्र इंग्रजांच्या माथींच फोडलें पाहिजे. व ही गोष्ट कट्टे साम्राज्य-सत्तावादी चिरोल यांनींही कबूल केली आहे. या दंग्यांत एक गोष्ट प्रामुख्यानें नमूद केली पाहिजे व ती ही कीं, ज्यावेळीं दंगे मोडण्यासाठीं स्थानिक पोलीस पाठविण्यांत आले तेव्हां त्यांनीं आपल्याच देशबंधूंवर गोळ्या झाडण्याचें नाकारलें.

इंग्रजांनीं या वेळीं इजिप्तमध्यें जे अत्याचार केले ते वाचले म्हणजे पंजाबचें स्मरण झाल्याखेरीज राहत नाहीं. मासल्यासाठीं त्यांतील कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—

**कैरोः**—इजिप्शियन पुढाऱ्यांना हद्दपार करण्यांत आलें. त्याच्या निषेधार्थ अत्यंत शांततामय अशा मिरवणुकी निघाल्या असतां त्यांवर मिशनगन्सचा मारा करण्यांत आला. त्यांत शेंकडों लोक प्राणास मुकले, जखमी झाले व बरेच अट-केंत घालण्यांत आले.

**चोबकः**—ब्रिटिश शिपायांनीं गांव लुटला, २१ लोक मेले, १२ जखमी झाले, स्त्रियांवर बलात्कार करण्यांत आले, कांहीं इजिप्शियन लोकांस कमरेइतकें जमिनींत पुरण्यांत येऊन त्यांचे तुकडे करण्यांत आले. २०० घरांपैकीं १४४ घरें जाळून टाकण्यांत आलीं.

**एल्. चावंट:**—ब्रिटिश शिपायांनीं गांव लुटून जाळून टाकला. चार हजार लोक आश्रयहीन झाले.

**आझिझिया व वेड्रेचियू:**—दोन्ही गांवांची झडती घेतली व कित्येक गांवें जाळण्यांत आलीं.

**चोब्रा. एल्. चाविह. व कफर एल्. हागा:**—एका ब्रिटिश सैनिकावर गोळी झाडल्याच्या आरोपावरून गांवांतील सर्व पुरुषांना पाठीवर व पोटावर फटके देण्यांत आले.

**अपर इजिप्त:**—प्रत्येक इजिप्शियननें, मग त्याचा सामाजिक दर्जा केवढाही असो, ब्रिटिश अधिकारी भेटेल तेथें त्याला वंदन केलेंच पाहिजे, असा ब्रिटिश जनरलनें हुकूम काढला. ज्यांनीं हा हुकूम मानला नाहीं त्यांजवर कोर्ट मार्शल करण्यांत येई.

झगलूल पाशा व त्याचे सहकारी यांना अटक केल्यामुळें दंगे झाले; परंतु अशा प्रकारें रक्तपात करण्याची इजिप्शियन पुढाऱ्यांची मुळींच इच्छा नव्हती. परंतु दंगे मोडतांना इंग्रजांनीं जे अत्याचार केले, त्यामुळें लोकक्षोभ फारच वाढला. व अन्य उपायानें सरकारचें राज्ययंत्र कसें हाणून पाडतां येईल या विचारास पुढारी लागून त्यांनीं सर्वत्र संप पुकारला; व लोकांनींही तो पुढाऱ्यांचा हुकूम शिरसावंद्य करून त्याप्रमाणें तावडतोब बजावणी केलीही, रेल्वेवरील नोकर ट्रामवेचे नोकर, झाडूवाले, विद्यार्थि, वकील, दुकानदार, सरकारी नोकर हे सर्व या संपांत सामील झाले. वकील बॅरिस्टरांनीं कोर्टेंच ओस पाडिलीं. विद्यार्थिनींनीं या संपांत बराच पुढाकार घेऊन रस्तोरस्तीं हिंडून संपाचा प्रसार त्या करूं लागल्या. इजिप्तमधील अत्यंत प्राचीन युनिव्हर्सिटी 'एल् अझार' यांतील विद्यार्थ्यांनीं तर आपल्या उत्साहाची पराकाष्ठाच करून दाखविली. या राष्ट्रीय संपांत सरकारी नोकरांनीं केलेली कामगिरी विशेष वाखाणण्यासारखी आहे. त्यांचा संप इतका यशस्वी झाला कीं, ज्यावेळीं ज. अलेंबी इजिप्तमध्यें आला त्या दिवशीं सर्व सरकारी नोकरांनीं काम बंद पाडलें; व पुढें संपाचें काम व्यवस्थित करण्यासाठीं पब्लिकवर्क्स खात्याच्या दुय्यम मंत्र्याच्या अध्यक्षतेखालीं एक मंडळ स्थापन करण्यांत येऊन 'राष्ट्राच्या इच्छा पूर्ण होईपर्यंत' प्रत्येक सोमवारीं संप करावयाचा असें त्या मंडळानें ठरविलें.

सरकारी नोकरांच्यापेक्षांही जास्त बहारीचें काम स्त्रियांनीं केलें. इजिप्शियन स्त्रिया या नेहमीं गोषांत असतात; पण १९०८ सालीं तरुण तुर्कांनीं आपली चळवळ जेव्हां कुस्तुंतुनियामध्यें सुरू केली, व तेथें जेव्हां पडदानशीन तुर्की स्त्रियांनीं त्यांत भाग घेतला. व तेव्हांपासून इजिप्शियन स्त्रियामध्येंही ही राजकीय अस्वस्थता फैलावूं लागली. पुढें खुद्द इजिप्तमध्येंच जेव्हां ही राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ निघाली, तेव्हां त्यांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें व त्या या धामधुमीच्या प्रसंगीं मोठ्या जमावानिशीं बाहेर पडूं लागल्या. मोठमोठ्या श्रीमंतांच्या बायका पडदा ठेवून होत्या, पण कांहींनीं राजकीय स्वातंत्र्याबरोबरच आपलें सामाजिक स्वातंत्र्यही प्रस्थापित करून पडदा झुगारून दिला. प्रत्येक मिरवणुकीबरोबर आपल्या हिंदू पद्धतीप्रमाणें, स्त्रिया अग्रभागीं चमकूं लागल्या ! "आम्हांस स्वातंत्र्य पाहिजे" व "इंग्रजांचें तळपट होवो" असें त्या गर्जत असत. राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या घरांभोंवती त्या जमून त्यांचीं भाषणें चित्त देऊन त्या ऐकूं लागल्या. दंग्यांत मेलेल्या इजिप्शियनांच्या दफनसमारंभास त्या हजर रहात व इंग्रजांस शिव्याशाप देत. दंग्याच्या वेळेस त्यांनीं नाकेबंदी करण्यास पुढाऱ्यांस मदत केली; आणि जेव्हां सरकारी नौकरांचा संप झाला तेव्हां जे कांहीं 'देशद्रोही' नोकर कचेरींत जात होते त्यांना कचेऱ्यांच्या दारांशीं पिंकेटिंग करून स्त्रियांनीं त्यांना शरमविलें.

हें संपाचें अस्त्र नोकरशाहीवर इतकें लागूं पडलें कीं, त्यांना झगलूल पाशा व त्याचे सहकारी यांची मुक्तता करणें भाग पडलें. परंतु ही सुटका करण्यापूर्वी ब्रिटिश मंत्रिमंडळानें कुटिलनीतीचा अवलंब करून प्रे० वुइल्सनकडून इजिप्तवरील आपली सत्ता अगोदर मान्य करवून घेतली होती. त्यामुळें इजिप्शियन प्रतिनिधि पॅरीसला गेले तरी त्यांचें म्हणणेंही कोणीं ऐकून घेतलें नाहीं ! या शिष्टमंडळाला इजिप्शियन लोकांचा पूर्ण पाठिंबा असून त्यानें राष्ट्रसंघाच्या जबाबदारीवर पूर्ण स्वातंत्र्य, सुदान इजिप्तला परत मिळणें वगैरे मागण्या केल्या होत्या. परंतु इंग्रज नोकरशाहीनें तिकडे लक्ष न देतां १९१९ च्या मेमध्यें लॉर्ड मिल्नर यांच्या अध्यक्षतेखालीं, ब्रिटिश कृपाछत्राखालीं कोणत्या पद्धतीनें इजिप्शियन लोकांनीं राज्य करावें, हें ठरविण्यासाठीं एक मिशन पाठविलें. मध्यंतरीं अर्धंमुर्धें स्वराज्य देतों, म्हणून अलेंबीनें जाहीरनामा काढला होता; पण इजिप्शियनांचा "पूर्ण स्वातंत्र्यप्राप्ती"चा ठाम निश्चय झाला असल्यामुळें ते असल्या

अर्धेकच्चें स्वराज्य देऊं इच्छिणाऱ्या मिल्नरसारख्याला भीक घालावयास मुळींच तयार नव्हते. त्यांतही बाल्फरनें "इजिप्तवर इंग्रजांचें स्वामित्व अबाधित राहिलेंच पाहिजे" अशी स्वातंत्र्यभंजक दर्पोक्ति काढल्यामुळें तर असल्या अटीवर येणाऱ्या मिल्नरसारख्याला चांगलाच हात दाखवावा, असा त्यांनीं निश्चय केला आणि त्याप्रमाणें ते उद्योगाला लागले. मिल्नरमिशन—इजिप्तवर इंग्रजी स्वामित्व कायम करूं इच्छिणारें मिल्नरमिशन—आल्यास त्याच्यावर पूर्ण बहिष्कार टाकावा, अशी झगललनें द्वाही फिरविली. त्याप्रमाणें मिल्नरमिशनच्या निषेधपर सभांवर सभा भरावयास लागल्या. सर्व वकिलांनीं प्रथम सभा भरविली आणि त्यांत मिल्नरकमिटीवर सडकून ताशेरा झाडला! त्याच्यानंतर प्रांतिक व वरिष्ठ कायदेकौन्सिलरांनीं आपापल्या मंडळांच्या खास सभा भरवून त्यांचा निषेध केला! त्यानंतर जहागिरदार, सरदार व धर्माध्यक्ष यांच्या सभा भरल्या व त्यांतही मिल्नरच्या कमिटीचे धिंडवडे काढले.

या प्रसंगीं स्त्रियांनींही फार मदत केली. पिकेटिंग करून त्यांनीं कोणालाही मिल्नर कमिशनपुढें साक्षीस जाऊं दिलें नाहीं. कांहीं कांहीं वेळां तर केवळ मौज म्हणून ट्राम्वे आपल्या ताब्यांत घेऊन सर्व रस्ताभर "मिल्नर मिशन मरो" असें म्हणत त्या हिंडत असत, आणि कोणीही युरोपियन ट्राम्वेमध्यें बसावयास आला तर त्याच्या तोंडावर कागदाच्या चिंध्या फेंकून त्यास परतवीत. अगदीं शेतकऱ्यांच्या अडाणी बायकांपर्यंत सुद्धां ही चळवळ पोंचली होती. आणि दंग्यांत रेल्वेचे रूळ उखडून टाकण्यांत स्त्रियांनीं पुरुषांस मदत केली, असेंही सरकारी रिपोर्टीत नमूद केलें आहे. बायकांप्रमाणें मुलीही चवताळल्या होत्या; आणि ज्या कांहीं युरोपियन मास्तरणी त्यांस शिकवावयास होत्या त्यांना ते दिवस फारच कठीण गेले.

विद्यार्थी व विद्यार्थिनी यांच्या सभांतून तर त्या कमिशनचे सर्व पितर उद्धरले गेले; आणि खुद्द इजिप्शियन प्रधानमंडळानें "मिल्नर-मिशन आपण धाडलें तर आम्ही सर्व राजीनामे देऊं" असें ब्रिटिश प्रधानास स्पष्ट कळविलें. याप्रमाणें हें दुर्भागी मिशन इजिप्तमध्यें जन्मण्याच्या अगोदरच इजिप्शियन लोक त्याचा बारावा करून पार मोकळेही झाले. तरी पण कसें बसें चोरट्यानें हें मिशन एकदां इजिप्तमध्यें येऊन उतरलें. मग काय विचारतां? प्रधानमंडळानें पहिल्या धडाक्यास राजीनामा दिला! त्या कमिशनपैकीं प्रत्येकाच्या पाळतीवर इजिप्शियन राहिले.

आणि तो जेथें जेथें म्हणून जाईल तेथें तेथें सुतक्यासारखा त्यांस बहिष्कृत केला. कोणीही त्याला भेटावयास सुद्धां मिळेना; मग विचारविनिमय तर दूरच राहिला; हर्स्ट म्हणून एक कमिशनचा कायदेपंडित होता. तो एक दिवस सहज एका गांवीं कोर्ट बघावयास जाणार होता. ही बातमी कळतांच "तो आल्यास आम्ही सर्व कोर्ट सोडून चालते होऊं" असें स्पष्टपणें सर्व वकिलांनीं न्यायाधिशांस कळविलें! त्यांच्या अपमानार्थ दुकानें बंद ठेविलीं व हरताळ पाडले. 'आपण आलांत कशाला?' आणि 'चालते का व्हानांत!' म्हणून त्यांस कळविण्यांत आलें. सर्व धर्माध्यक्षांनीं त्याचा तीव्र निषेध केला आणि सर्वांत आश्चर्याची व आनंदाची गोष्ट म्हणजे, इंग्रजांच्या ताटाखालचें मांजर होऊन राहिलेल्या इजिप्तच्या सुलतानाच्या कुटुंबांतील मंडळींनींच मुळीं "पूर्ण स्वातंत्र्यच इजिप्तला दिलें पाहिजे" म्हणून ठराव करून त्यास पाठविला! तीन महिने तें कमिशन तेथें माशा मारीत बसलें होतें; पण एक चिटपाखरूं सुद्धां त्यांस भेटावयास गेलें नाहीं! सरतेशेवटीं मिल्नर-कमिशनची धिंड एकदांची निघून परत विलायतेंत गेली; आणि निमूटपणें ज्या झगलूलला एकदां हद्दपार केला होता, त्या राजद्रोही व बंडखोर म्हणून मानलेल्या इजिप्शियन पुढाऱ्याला-त्या बैऱ्याला--इंग्रजांना हुसकून लावूं इच्छिणाऱ्या झगलूललाच शरण जाऊन "बाबा! तुझें म्हणणें तरी काय आहे? काय अटींवर तूं तह करावयास तयार आहेस?" अशी त्याची विनवणी करावी लागली! झगलूलचा याप्रमाणें सर्वस्वीं विजय झाला.

मिल्नरसाहेब इजिप्तमधून हात हालवीत परत इंग्लंडला गेले व तेथें झगलूल पाशाला बोलावून त्याच्याशीं दोन महिने सतत खल करून मिल्नरसाहेबांनीं पार्लमेंटला आपला खलिता सादर केला. या कामीं मध्यस्थ या नात्यानें अदली-पाशाचा इंग्रजांनीं बराच उपयोग करून घेतला.

सर्व राष्ट्रीय महत्त्वाकांक्षांचें केंद्रस्थान झगलूल पाशा आहे. जनतेचा त्याच्यावर अतोनात विश्वास आहे व तोही त्या विश्वासास सर्वथैव योग्य असाच आहे. कैरो येथील अत्यंत प्राचीन, हजारों वर्षें ज्ञानदानाविषयीं सुप्रसिद्ध अशा अल् अझार या विश्वविद्यालयांत याचा शिक्षणक्रम झाला असून तेथून अत्यंत यशस्वी कायदेपंडीत म्हणून तो बाहेर पडला. इजिप्शियन न्यायकोर्टीत 'इजिप्शियन कार्सन्'

म्हणून याचा लौकिक दुमदुमत आहे. त्याची स्पष्ट, जोरदार अशी मांडणी सर्व-प्रसिद्ध आहे. त्यासंबंधीं एक अशी गोष्ट सांगतात कीं, एकदां खुनाच्या आरोपावरून बारा इसमांतर्फे तो काम चालवीत असतां सतत सात तास त्यानें भाषण केलें. तेव्हां कोर्टानें त्याला सांगितलें कीं, 'कोर्टाचा अमूल्य वेळ आपण वक्तृत्व करून वायां घालवूं नका.' 'आरोपींचा जीव त्यापेक्षांही जास्त महत्त्वाचा आहे' असें प्रत्युत्तर देऊन तो लाबडतोब कोर्ट सोडून निघून गेला. दुसरे दिवशीं आल्यानंतर बचावाचें सर्व भाषण पुनः केलें व शेवटीं सर्व आरोपी सुटले. वकील, न्यायाधिश, मंत्री व शिक्षण मंत्री याप्रमाणें त्यानें कामें केलीं असून आज त्याचें वय सुमारें ६५ वर्षांचें आहे. शरीरानें उंचा पुरा असून त्याच्या वतृक्त्वानें लोक मोहित होऊन जातात. आज तो इजिप्शियन जनतेला प्राणाहून प्यारा झाला आहे. यासंबंधानें मे० सर हॅरी बार्नेस् म्हणतो, "मी याच्याबरोबर शेंकडों कोस प्रवास केला. तो श्रीमंत, गरीब, सर्वांचे विचार बोलतो असा मला अनुभव आला. पहिल्या हद्दपारींतून मुक्त होऊन ज्या वेळीं तो परत आला, त्यावेळीं माझ्या डोळ्यांना जें दृश्य दिसलें तें मी कधींही विसरणें शक्य नाहीं. हजारों लोक त्याच्या स्वागतासाठीं जमले होते. पोर्ट सय्यदचे रस्ते माणसांनीं इतके भरून गेले होते कीं, त्यांवरून गाड्या चालविणें तर अशक्यच होतें. रस्ते, घरें, घरांवरील कौलाघरें जिकडे तिकडे माणसेंच माणसें व तींही एकमुखानें या राष्ट्र-वीराचा जयजयकार करीत होतीं. यापेक्षां कैरो येथें त्याचा स्वागतसमारंभ झाला तो अवर्णनीयच होता. त्याजवर गुलाबपुष्पांचा इतका वर्षाव झाला कीं, रस्त्यांवरून गुलाबांचा खच पडला होता. हा सर्व मान त्या इजिप्तच्या राष्ट्रवीरास तो खराखुरा जनतेचा नेता म्हणून मिळाला. इंग्लंडच्या मुत्सद्यांना किंवा लॉर्ड कर्झन यांना या गोष्टींची पर्वा न वाटो; पण इजिप्तच्या आकांक्षा पायाखालीं तुडविणें यापुढें शक्य नाहीं, असेंच ही गोष्ट सांगते. लोकांची स्वातंत्र्यवृत्ति तुम्ही दडपून कशी टाकणार ? व त्याबद्दल मोबदला तरी काय मिळणार ? आजपर्यंतचा सर्व अनुभव वायांच गेला कीं काय ? झगलूलपाशा ग्यारीबाल्डी नसेल किंवा इजिप्तचा मॅझिनीही तो नसेल, परंतु तो काव्हूर तरी खास आहे. 'इजिप्तमधील जहाल पुढारी इजिप्तच्या प्रगतीला मोठीच धोंड आहे' या कर्झन-यांच्या दर्पोक्तींत कांहीं राम नाहीं. 'इजिप्तमध्यें शांतता पाहिजे असेल, तर आमच्या तेथील अधिकाऱ्यांनीं जरा जास्त समंजसपणानें वागलें पाहिजे. आपलें

अंतःकरण खुलें करून बोलण्याचीही लोकांना सवड नाहीं! अशा स्थितीचा परिणाम काय होणार? कॅनॉल संरक्षणाच्या, वॉर ऑफीसच्या विचित्र कल्पना जरा कमी झाल्यास उभय देशांत सलोखा नांदेल. असें मला अद्यापि वाटतें.'

याप्रमाणें इजिप्तसंबंधीं समंजस इंग्रज लोकांचें मत होतें व मिल्नर कमिशननें पार्लमेंटपुढें आपल्या ज्या सूचना सादर केल्या त्या ब्रिटिश सरकारनें स्वीकारल्या, अशी दाट वदंताही होती; व त्याप्रमाणें इजिप्तवरील इंग्रजांचें 'संरक्षकत्व' नाहींसें होईल अशी कल्पना होती. इंग्रजांनींही सुलतानास अदली-पाशाला दुसरें प्रधानमंडळ बनविण्यास सांगावें अशी सूचना केली. अदली पाशा हा इंग्रजांच्या फार विश्वासांतील होता. नंतर अदली पाशाचें शिष्टमंडळ पुन्हां विलायतेस वाटाघाट करण्यासाठीं गेलें. हें शिष्टमंडळ लोकांनीं निवडावें असें झगलूल पक्षाचें मत होतें. तेथें पुष्कळ दिवस निरर्थक वादविवाद करून शेवटीं ब्रिटिश मंत्रिमंडळानें मिल्नर–कमिशनच्या सर्व सूचना फेंटाळून लावल्या. सर्व वादविवाद एका महत्त्वाच्या प्रश्नावर ढांसळून पडला व तो प्रश्न म्हणजे इजिप्त-मधील लष्कर काढून घेण्यासंबंधींचा होय! कैरोमध्यें ब्रिटिश लष्कराचें सर्वथैव वर्चस्व असतां इजिप्शियन स्वातंत्र्य राहिलें कोठें? अर्थात् इंग्रजी सैन्याच्या अस्तित्वानें इजिप्शियन स्वातंत्र्य ही कल्पनाच लोकांस मान्य होईना.

याप्रमाणें निराश होऊन अदलीपाशा परत मातृभूमीस आला व अखेरीस त्याला झगलूलपाशा म्हणत होता तीच गोष्ट मान्य करावी लागली. मिल्नर-कमिशनच्या सूचनाप्रमाणेंही इजिप्तला पूर्ण स्वातंत्र्य मिळत होतें, असें नाहीं. त्या सूचनांत प्रामुख्यानें इजिप्तवरील इंग्रजांचें संरक्षकत्व कमी व्हावें, इजिप्तला आपला दोस्त समजावें, इजिप्तला अंतर्गत कारभारांत पूर्ण स्वातंत्र्य असावें, इंग्रजांनीं परदेशीय रहिवाशांचे हितसंबंध रक्षण करणें व कॅनाल ताब्यांत ठेवणें वगैरे सूचना केल्या होत्या. लॉर्ड कर्झनसाहेबांनीं या सर्व सूचना फेंटाळून लावून तेथें 'हाय कमिशनर' म्हणून एक ब्रिटिश अधिकारी सल्लामसलत देण्यासाठीं नेमावा, अशी सूचना केली. परंतु अशा प्रकारचे सल्लागार कसे असतात, ही गोष्ट इजिप्शियन लोकांस अनुभवानें पटली असल्यानें स्वातंत्र्याच्या पोकळ शब्दांस ते भुलले नाहीत. याशिवाय इजिप्तमध्यें इंग्रजी लष्कर जरूर असावें असेंही कर्झनसाहेबांनीं ठरविलें व त्याप्रमाणें आज चाळीस वर्षें इंग्रजी लष्करानें इजिप्त व्यापला आहेच. आपली राजधानी व सर्व देश परकीय सैन्यानें व्याप-

लेला पाहून इजिप्शियन लोकांस आपल्या स्वातंत्र्याबद्दल फारच मोठा उत्साह वाटत असेल !

अशा स्थितींत सर्व वाटाघाटी फोल होऊन अदली पाशा परत आला. तेव्हां इजिप्तमध्यें इतकी चळवळ झाली कीं, अदली पाशाच्या मागें इंग्रजी लष्कराचा जोर असतांही त्यास काम करणें अशक्य होऊन त्यानें मुख्य प्रधानगिरीचा राजीनामा दिला. युद्धकाळांत इजिप्तनें केलेली अमूल्य मदत विसरून जाऊन, ब्रिटिश मुत्सद्यांनीं वेळोवेळीं इजिप्तच्या महत्त्वाकांक्षा तृप्त करण्याबद्दल वारंवार दिलेलीं आश्वासनें सर्व कस्पटाप्रमाणें लेखून इजिप्तच्या आकांक्षा अशा रीतीनें लाथाडल्या गेल्या व केवळ लष्करी सामर्थ्याच्या जोरावर इजिप्त आपल्या ताब्यांत ठेवूं अशी उन्मत्तपणाची भाषा ब्रिटिश मुत्सद्दी बोलूं लागले. त्याबरोबर इजिप्तचें लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें. इजिप्तचा लोकनायक झगलूल पाशा यानें अत्यंत नेटानें या दडपशाहीच्या धोरणाविरुद्ध चळवळ चालविली. केवळ दडपशाहीच्या जोरावर चळवळ बंद होत नाहीं, हें पाहतांच नोकरशाहीनें झगलूल पाशास अटक करण्याचें ठरविलें.

राष्ट्रीय पक्षाचा पुढारी झगलूल पाशा व त्याचे आठ सहकारी मित्र यांनीं राजकीय चळवळीपासून अलिप्त राहावें असा सेनापति अॅलेंन्बी यानें जाहीर हुकूम काढला. त्यास 'आम्ही राष्ट्रीय पुढारी आहों; राष्ट्राचा आमच्यावर विश्वास नसल्यास राष्ट्रच आम्हांस तसें सांगेल परंतु राष्ट्रांतील बहुमताखेरीज इतर कोणाचा हुकूम मान्य करून आम्ही ही चळवळ बंद ठेवणार नाहीं' असा झगलूलनें जबाब दिला. त्याबरोबर झगलूल व त्याचे पांचसहा सहकारी यांच्या घरांना वेढा देऊन त्यांना अटक करून मोटारींत घालून सुएझ ठाण्याला नेण्यांत आलें. झगलूल व त्याचे सहकारी यांची अशी उचलबांगडी झालेली पाहतांच त्यांच्या अनुयायांनीं दंगा करण्याला सुरुवात केली. कित्येकांनीं युरोपियन वस्तींत शिरून युरोपियनांच्या दुकानांवर दगड फेंकून कांचेचीं तावदानें फोडलीं, कित्येकांनीं रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या युरोपियन लोकांवरही दगड फेंकण्यास सुरवात केली. त्यावरून लष्करनें गोळीबार करून दोन इसम ठार केले व कित्येक घायाळ होऊन पडले, तेव्हां युरोपिअन मोहल्यांतला दंगा शांत झाला. इतर भागांतून धामधूम चालूच होती. ट्रामगाड्यांवर दगडांचा वर्षाव होऊं लागल्यानें त्या गाड्यांची रहदारी बंद पडली.

झगलूलला अटक करून नेत असतां लष्करी अमलदारानें झगलूलच्या बायकोला आपल्या पती बरोबर अटकेंत जाण्याची इच्छा आहे काय, असा प्रश्न केला. त्यावर ती वीरपत्नी म्हणाली, "तुम्ही जनतेचे पुढारी पकडून नेत असल्यामुळें आतां पुढारीपणाची जबाबदारी माझ्या शिरावर येऊन पडली आहे. जनतेची माता या नात्यानें मला ही जबाबदारी पार पाडण्याकरितां मागें राहिलें पाहिजे व ही चळवळ तडीस नेऊन पोंचविली पाहिजे."

कैरो शहराचें उपनगर जिसा नांवाचें असून तेथें सरकारी कचेऱ्या आहेत. झगलूलला पकडल्याची वार्ता कळतांच विद्यार्थ्यांनीं जिसा उपनगराकडे मोर्चा वळविला आणि कित्येक कचेऱ्या लुटल्या. कित्येक युरोपिअन मारले गेले. अखेरीस लष्करी लोकांनीं गोळीबार करून ५ इसम ठार केले व २० जायबंदी केले, तेव्हां हा दंगा थंडावला. झगलूलला पकडल्याबद्दल दंगा करण्याची चिथावणी देणारीं हस्तपत्रकें अलेक्झांड्रिया शहरांत वांटण्यांत आलीं, त्यांत शेवटीं 'ईश्वर झगलूलला दीर्घायुषी करो' अशी प्रार्थना होती.

एल् अझर विश्वविद्यालयांतील विद्यार्थी आपल्या अभ्यासास रामराम ठोकून या चळवळींत सामील झाले. दुय्यम शाळाही ओस पडल्या. हे शाळेंतले विद्यार्थी सरकारी नोकरांना आपापल्या कचेऱ्यांतून हरताळ पाडण्यास विनंति करूं लागले आणि त्या विनंतीचा परिणाम होऊन कित्येक सरकारी नोकरांनीं आपल्या जागांचे राजीनामे दिले. कांहीं विद्यार्थ्यांनीं सरकारी इमारतींस आग लावण्याचा प्रयत्न केला; परंतु सोल्जरांनीं त्यांना हुसकून लाविलें. अलेक्झांड्रिया शहराच्या मध्य-भागीं मोतीचौकांत पांचशें असहकारितावादी जमून धामधूम करीत होते. परंतु पोलिसांनीं त्यांस लेथून घालवून दिलें.

कैरो बंदरांतल्या बोटींतील खलाश्यांनीं खुष्कीवर उतरून प्रथम दंगा मोड-ण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर पोलिस आणि इजिप्शियन व ब्रिटिश लष्करी लोकांचा जमाव जमून त्यांनीं कैरो शहराची नाकेबंदी करून लष्करी कायदा पुकारला आणि शांतता प्रस्थापित केली. लष्करी कायदा मोडणारावर एकदम गोळी झाडण्यांत येईल असें जाहीर करण्यांत आलें.

माल्टा बेटांतून 'केरेस व क्लेमॅटिस' या दोन लढाऊ जहाजांना इजिप्तच्या बंदरांत जाऊन हजर होण्याचा हुकूम झाला. त्याप्रमाणें तीं जहाजें येऊन

दाखल झाली. माल्टा बेटांतील दुसरी ससेक्स पलटण व गॉर्डन पलटणी या पथकांना कैरोला जाण्याकरितां तयार राहण्याला हुकूम सुटले ! लष्करी विमानेंही येऊन दाखल झालीं व तीं आकाशांतून आपल्या पाशवीशक्तीचें प्रदर्शन करूं लागलीं !

झगलूलच्या आठ अनुयायांपैकीं ५ असामींस पकडून सुएझला नेले. बाकीच्या तीन इसमांनीं माफी मागितल्यावरून त्यांना अटक करण्याचा हुकूम रद्द करण्यांत आला.

झगलूल व त्याचे अटकबंद झालेले अनुयायी अथवा त्याच्या पक्षाच्या संस्था यांच्या ज्या ठेवी बँकांतून अगर कोणा व्यक्तीकडे असतील त्यांनीं सेनापति अॅलेन्बी याच्या हुकुमाखेरीज त्या रकमा झगलूल व त्याचे अनुयायी यांस देऊं नयेत असा मनाई हुकूम सुटला.

सुएझ येथें दंगा होऊन कांहीं लोक ठार व जखमी झाले. अलेक्झांड्रिया शहरांतील सरकारी नोकरांनीं ता. २६ ते २८ डिसेंबरपर्यंत हरताळ पाळला. शहरांतून सशस्त्र मोटारी पाहरा करीत असल्यामुळें दंगेखोरांचा जमाव जमूं शकला नाहीं. नील नदींत आठ सशस्त्र आगबोटी मशीनगन्स सज्ज करून नदीच्या पात्रांतून उगमाकडे येरझारा घालूं लागल्या.

कैरो शहरांतील सर्व वाहनें बंद झाल्यामुळें रस्त्यांतील रहदारी बंद पडली. कैरो शहरांतील दंग्यांत १४ इसम ठार व ४० घायाळ झाले. किरकोळ जखमी इसमांची गणती करतां आली नाहीं.

पोर्टसय्यद येथें अस्वस्थता अधिक होऊन २ इसमांनीं परलोकचा रस्ता धरला व दोन जखमी झाले. झिपटा येथेंही दंगा झाला, पण इजिप्शियन शिपायांनींच दंगेखोरांवर गोळ्या झाडून दंगा शांत केला ! अलेक्झांड्रिया येथें ४०० दंगेखोरांस पकडून अटकेंत ठेवलें.

टांटा येथील दंगा मोठ्या प्रमाणावर झाला. कैरोनजीक एक आगगाडी उलथून पाडण्यांत आली, आणि रूळ उखडण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

नोकरशाहीच्या दडपशाहीला उत्तर म्हणून कैरो येथें जाहीर सभा झाली. तींत डॉक्टर वर्गानें प्रामुख्य स्वीकारलें होतें. त्या सभेंत दडपशाहीचा निषेध करण्यांत येऊन ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचा आणि सरकारी व युरोपिअन बँकांतून ठेवी परत घेण्याचा व त्यासंबंधीं जनतेंत चळवळ करण्याचा ठराव

पसार झाला. त्याचा विलक्षण परिणाम होऊन बँकांतून ठेवी काढून घेण्याचा सपाटा सुरू झाला. कोणत्या ब्रिटिश मालावर कसकसा बहिष्कार घालावा यासंबंधीं माहितीपत्रकें तयार होऊं लागलीं.

विद्यार्थ्यांनीं शाळांवर बहिष्कार घातल्यामुळें १३ शाळा बंद ठेवण्यांत आल्या. टांगेवाल्यांनींही संप करून वाहनें बंद केलीं.

इजिप्तच्या स्वातंत्र्ययुद्धांत तेथील स्त्री-समाजानें प्रामुख्यानें भाग घेतलेला आहे. सन १९१९ पासून तेथील स्त्रीसमाजांत विशेष जागृति होऊन 'मिसर महिला स्वातंत्र्यसंघ' किंवा लेडीज् वफद् नांवाची एक संस्था स्थापन करण्यांत आली. ही नवजागृति समाजांतील इजिप्शियन, मुसलमान व ख्रिस्ती वर्गांतील उच्च दर्जाच्या स्त्रियांत प्रथम होऊन त्यांनीं अल्पावधींतच समाजांतील मध्यम वर्ग व अगदीं शेतकरी वर्ग आपलासा करून टाकला. या कामीं संघाच्या स्त्रियांनीं अत्यंत परिश्रम घेतले. स्त्रियांत शिक्षणाचा प्रसार करून केवळ द्रव्यसंग्रहाशिवाय कांहीं महत्त्वाचें कार्य आपणांपुढें आहे याची जाणीव त्यांना करून दिली.

या चळवळीची पुरस्कर्ती झगलूल पाशा यांची स्त्री असून तिचा जन्म अत्यंत उच्च घराण्यांत झालेला आहे. ती अलौकिक बुद्धिमतीही आहे. हिचा बाप मुस्ताफा पाशा फाहमी हा खेदीव दुसरा आबास हिल्मा याचा पंधरा वर्षें सतत मुख्य मंत्री होता व त्याची ही कन्या इजिप्तचा आजचा अनभिषिक्त राजा झगलूल पाशा याची पत्नी आहे. इजिप्तमधील अखिल महिलावर्ग आज तिच्या नेतृत्वाखालीं काम करीत असून मिसर देशाला पूर्ण स्वातंत्र्य मिळावें अशी त्या अहर्निश चिंता वाहत आहेत. व झगलूल पाशाची पत्नीही तिच्यावर पडलेली जबाबदारी योग्य प्रकारें बजावीत आहे.

डिसेंबर २२ सन १९२१ रोजीं झगलूल पाशाला अटक करण्यांत आली, त्यावेळीं लोकांनीं झगलूल पाशाची सुटका व्हावी म्हणून त्याच्या घराभोंवतीं धरणें घेतलें होतें. परंतु लष्करी सामर्थ्याच्या जोरावर ब्रिटिश सरकारनें क्षुब्ध लोकमत शांत केलें. झगलूलबरोबर वनवासांत जाण्याचा त्याच्या स्त्रीचा अगोदर विचार होता, परंतु लष्करी लोकांनीं ज्यावेळीं लोकांवर सरसहा गोळ्या घालण्यास सुरवात केली त्यावेळीं एका पंधरा वर्षांच्या मुलास गोळी लागून तो तिच्या अंगणांत पडला. हा प्रकार पाहतांच तिचें मन कळवळून तिनें आपल्या पतीबरोबर जाण्याचा विचार रद्द केला. व इजिप्तचा नेता झगलूल याची जागा

तिनें स्वीकारली. आपल्या पतीपेक्षां मातृभूमीला आपली आज जास्त गरज आहे अशी तिची खात्री होऊन मोठ्या विवेकानें तिनें मायामोह आंवरला व झगलूलच्या हातून हिसकावून घेतलेलीं राष्ट्रीय पक्षाचीं सूत्रें तिनें धारण केलीं. त्यासंबंधानें ब्रिटिश हायकमिशनरला निरोप पाठवितांना ती म्हणाली कीं, " लॉर्ड अलेंन्बीना सांगा, मी आपल्या पतीचें स्थान घेण्यासाठीं कैरोंतच राहणार ! तुम्हीं झगलूल पाशांच्या देहाला हद्दपार केला तरी त्यांचा आत्मा इजिप्तचा उद्धार करण्यास सदैव आमच्यापाशींच आहे. तुम्ही त्यांना फार दिवस अटक करूं शकणार नाहीं. लोक तुम्हांला स्वस्थ बसूंच देणार नाहींत. कदाचित् बंदिखान्यांत ते मृत्युवश झाले तरी त्यांची जागा भरून काढण्यासाठीं देशभक्तांचा ओघ सारखा लोटत राहील. व इजिप्तमधील स्वातंत्र्यज्योत सारखी प्रज्वलित राहील अशीच मी खटपट करीन." सोफिया हानेम-झगलूलची पत्नी–इनें झगलूल बरोबर जावें अशाबद्दल पुष्कळ खटपट करण्यांत आली; परंतु तिनें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं.

इजिप्तमधील देशभक्तांस अन्यायानें हद्दपार करण्यांत आलें, याचा निषेध म्हणून सोफिया हानेम इनें आपल्या स्त्रीसंघामार्फत इंग्लिश मालावरील बहिष्कारची चळवळ अत्यंत नेटानें चालवून यशस्वी करून दाखविली. ही बहिष्काराची पद्धतीही अगदीं अभिनव अशीच होती. सात आठ बायकांनीं सर्वत्र टेलिफोननें बहिष्काराची हकीकत पसरविण्यास प्रारंभ केला. सुमारें वीस पंचवीस बायका मोटारी व गाड्यांत बसून कैरो व अलेक्झांड्रिया शहरांतील प्रमुख दुकानदारांस जाऊन भेटल्या व त्यांस आपली बहिष्काराची कल्पना समजावून सांगितली. त्यांना प्रथम ही कल्पना हास्यास्पद वाटली. परंतु एका आठवड्यांतच स्त्रीसंघानें बहिष्कार इतका यशस्वी करून दाखविला कीं, दुकानदारांचें एक शिष्टमंडळ स्त्रियांकडे येऊन त्यांच्या साहाय्याची त्यांना याचना करावी लागली. कैरो येथें एक स्त्रियांची बहिष्कार कमिटी असून सर्व देशभर तिच्या उपशाखा पसरल्या आहेत.

या बहिष्कार अस्त्राचा इंग्लिश व्यापाऱ्यांवर इतका विलक्षण परिणाम झाला कीं, सरकारला आपलें धोरण पालटावें लागून इजिप्तवरील संरक्षकत्व काढून घतल्याचें जाहीर करण्यांत आलें; तेव्हां लोकक्षोभ जरासा शांत झाला.

झगलूल पाशाच्या स्त्रीप्रमाणेंच बाही अल्-दाईन बे बरकत या मोठ्या, उच्च व खानदानीच्या घराण्यांतील स्त्रीनें या बहिष्कारच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला होता. एकाद्या पडदानशीन स्त्रीनें उघड रस्त्यावर उपदेश करीत हिंडणें ही गोष्ट एका काळीं अत्यंत कमी प्रतीची समजली जात होती. परंतु देशाभिमानाच्या उत्कट प्रेमानें काम करण्यास निघाल्यावर अशी चाल आड येत नाहीं उलट तिचा गौरवच होतो, असाच अनुभव येथें आला.

सोफिया हानेम ही मोठमोठ्या सभांतून व्याख्यानें देते. व्यासपीठाच्या पाठीमागें एक पडदा टांगला असून त्याच्या मागून ती जेव्हां इजिप्तच्या स्वातंत्र्याबद्दल मोठ्या आवेशानें बोलूं लागते त्यावेळीं श्रोतृसमूहांच्या अंगांत आवेश उत्पन्न होतो असें एका समक्ष हजर असलेल्या गृहस्थानें लिहिलें आहे. आज इजिप्तमध्यें जी सामाजिक व शैक्षणिक चळवळ चालूं आहे तिचें सर्व श्रेय या महिलांच्या चळवळीलाच आहे. ला फेर्मा नॉव्हेली ही स्त्रियांची संस्था महायुद्धापूर्वीच स्थापन झाली असून, शिक्षण, आरोग्य, बालसंगोपन, वगैरे चळवळी ती करीत असते. कैरो येथें अमेरिकन नमुन्यावर सुमारें दीड लक्ष रुपये किंमतीचें संस्थेच्या मालकीचें सुंदर गृह आहे. देशाची बौद्धिक, शारीरिक व आर्थिक उन्नति घडवून आणणें हा संस्थेचा उद्देश आहे. सर्व देशभर नवजीवनाचा अखंड प्रवाह कैरोंतून पसरला जावा अशी त्यांची उत्कट इच्छा आहे. व देशांतील अज्ञान खणून काढून तेथें ज्ञानदीप प्रज्वलीत व्हावा अशाबद्दल त्यांचे अहर्निश प्रयत्न चालू आहेत. ज्या देशांत अशा प्रकारच्या तेजस्वी स्त्रिया निर्माण होतात तो देश किती दिवस पारतंत्र्यांत राहील ?

मागें सांगितल्याप्रमाणें अदली पाशाच्या बाबतींत लॉर्ड कर्झनची निराशा झाल्यामुळें आपल्या इच्छेनुसार वागेल असा मनुष्य लॉर्ड कर्झन पाहूं लागले. लॉर्ड कर्झनचें पहिलें कृत्य म्हणजे स्वातंत्र्य मागण्याच्या गुन्ह्याबद्दल झगलूल पाशाला दूर अशा एका बेटांत हद्दपार करण्यांत आलें. अशा प्रकारें झगलूलला आपल्या मार्गांतून दूर केल्यावर ब्रिटिश सरकारनें सरवत पाशाला हाताशीं धरलें. त्यानंतर इजिप्तच्या लोकांशीं जे करार झाले त्याप्रमाणें तेथील राज्यव्यवस्था गेल्यां मार्चपासून सुरू झाली. इजिप्त देश आजपासून स्वतंत्र झाला आहे, असें इंग्रजसरकारामार्फत जाहीर करण्यांत आलें.

सुल्तान फाउद यास इजिप्तचा राजा करण्यांत आला व १९१४ पासून इजिप्तमध्यें गाजत असलेला लष्करी अम्मल रद्द करण्याचें अभिवचन देण्यांत आलें व सरवत पाशा याच्या अंगावर मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें घालण्यांत आलीं.

सरवत पाशा, लॉर्ड अलेंन्बी व इंग्रज सरकार, नऊ महिने सतत आपली कारवाई करीत होते; इजिप्त देश ब्रिटिश लष्कराच्या मगरमिठींत कायम होता; मुख्य मंत्र्याची नेमणूक ब्रिटिशांनीं केली होती; लष्करी अम्मल आपली सत्ता कडव्या रीतीनें गाजवीत होता आणि जनतेचा एकच खराखुरा पुढारी दूरच्या एका बेटांत हद्दपार केला होता. ब्रिटिश सरकारनें ज्या प्रकारचें स्वातंत्र्य इजिप्तला अर्पण केलें, तशा प्रकारच्या स्वातंत्र्यदानाचें उदाहरण जगाच्या इतिहासांत दुसरें नाहीं. झगलूल पाशाच्या सर्वच अनुयायांस पकडण्यांत आलें नाहीं. जे कांहीं शिल्लक राहिले त्यांनीं इजिप्शियन प्रातिनिधीक मंडळ नांवाची एक संस्था कैरो येथें स्थापन केली. गेल्या जुलैंत झगलूल पाशा आजारी पडला व त्याची आसन्नमरण अशी स्थिति झाली त्यावेळीं या प्रातिनिधिक मंडळानें आपल्या सहीनें एक जाहीरनामा काढून, झगलूल पाशाची ताबडतोब सुटका करावी व आपणास जो संताप आला आहे तो शक्य त्या मार्गांनीं जगातील सुधारलेल्या राष्ट्रांपुढें व्यक्त करावा अशी मागणी केली ! अशा प्रकारचा जाहीरनामा प्रसिद्ध होतांच सह्या करणाऱ्या आठ पुढाऱ्यांस, इजिप्तच्या राजाबद्दल लोकमत कलुषित करण्याच्या आरोपावरून व लोकांत असंतोष फैलावण्याच्या आरोपावरून अटक करण्यांत आली. ब्रिटिश लष्करी कोर्टापुढें त्यांची चौकशी करण्यांत येऊन सेनापतींच्या सल्ल्याप्रमाणें त्यांस मृत्यूची शिक्षा ठोठावण्यांत आली. परंतु मागाहून ती शिक्षा कमी करण्यांत येऊन प्रत्येकीं सात वर्षे सक्तमजुरीची शिक्षा व पांच हजार पौंड दंड याप्रमाणें त्यांना शिक्षा देण्यांत आली.

कोणासही, केव्हांही अटक करणें, सेन्सॉर बसविणें या व लष्करी कायद्याप्रमाणें स्वाभाविक येणाऱ्या अनेक जुलुमांचीं उदाहरणें देतां येतील. परंतु वरील उदाहरणांवरून खऱ्या स्थितीची चांगली कल्पना येईल. अशी स्थिति असतांही ब्रिटिश सरकारनें इजिप्तच्या ललाटावर 'हें स्वतंत्र्य राष्ट्र असून त्याला स्वतःचा राजाही आहे व लोकही सुखानें या स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहेत' अशीं अक्षरें लिहून ठेविलीं. भादांत खोट्या गोष्टी याशिवाय दुसऱ्या कोणत्या असणार ? परंतु अशा

प्रकारची उघड उघड खोटीं विधानें कां करतां येतात याचें कारण सरकारच्या मागें प्रचंड सैन्य, लष्करी कायदा, वृत्तपत्रांची गळेबंदी व या कृत्यांचा निषेध करणारांस सात वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा इतक्या गोष्टी सज्ज आहेत. अशा प्रकारच्या अप्रामाणिक व निंद्य पद्धतीनें राज्यकारभार सतत चालणें शक्य ना .

इंग्लंडनें इजिप्तला स्वातंत्र्य देऊं करून दोन वर्षे होऊन गेलीं. परंतु अद्यापि इंग्लंडचें सैन्य, इंग्लिश अधिकारी आणि इंग्लंडचें वर्चस्व इजिप्तमध्यें कायमच आहे! ही परिस्थिति बदलून खरें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याकरितां झगलूल पाशानें चळवळ सुरू केली होती; पण ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं त्यासच हद्दपार केलें, त्या वेळेपासून इजिप्तमधील चळवळ मंदावली होती. पण अगदीं अलीकडे तिचें पुनरुज्जीवन झालें असून इजिप्तच्या मंत्रिमंडळांतही झगलूलच्या पक्षाची बरीच मंडळी शिरली आहेत. इजिप्तमधील राष्ट्रीय पक्षानें आपलें एक शिष्टमंडळ लॉसेन येथील सहपरिषदेकरितां पाठविलें व त्यास झगलूल पाशाच्या अनुयायांचाही पाठिंबा मिळाला.

या राष्ट्रीय पक्षाची मागणी पुढीलप्रमाणें आहे:—

१ नील नदीच्या नैसर्गिक टापूतला सगळा मुलूख स्वतंत्र झाला पाहिजे व त्यावर इतर कोणत्याही राष्ट्राचें वर्चस्व चालूं नये.

२ १८९९ सालचा सुडान प्रांतासंबंधाचा तह रद्दबातल समजण्यांत यावा.

३ नील नदीच्या यच्चावत् मुलुखांतून ब्रिटिश सैन्य काढून नेण्यांत यावें.

४ नील नदीच्या टापूंतील कोणत्याही भागावर ब्रिटिश राष्ट्र कसलाही हक्क सांगत असेल तर त्यास विरोध करावा.

५ इजिप्तच्या राजकारणाचे प्रश्न सोडविण्यांत इजिप्तनें इंग्लंडची सहकारिता बिलकूल मान्य करावयाची नाहीं.

६ हल्लींच्या अधिकाराच्या बळावर इंग्लंड जर इजिप्तवर कोणतेंही राजकीय धोरण लादूं पाहील, तर तो प्रयत्न हाणून पाडावयाचा.

७ कॉन्स्टांटिनोपल येथील परिषदेंत ठरल्याप्रमाणें सुएझ कालवा हा तटस्थ टापू मानला जावा; व तें ताटस्थ्य राखण्याची जबाबदारी स्वतंत्र इजिप्तवर सोंपवावी.

याप्रमाणें देशांतील राष्ट्रीय चळवळीचा पुरस्कर्ता हद्दपार केला, नाना आमिषें दाखविलीं, दडपशाही अनेक प्रकारची केली; तरीही जेव्हां लोकमत शांत

होईना, तेव्हां सरवत पाशाला आपल्या मंत्रिपदाच्या जागेचा राजीनामा द्यावा लागला. त्यांनीं आपल्या मंत्रीपदाचा राजीनामा दिल्यानंतर लेफ्टीक नेसीम पाशा यांनीं नवीन प्रधानमंडळाची स्थापना केली. त्यामुळें इजिप्तसंबंधीं धोरणाचा सरकारला पुनः विचार करावा लागेल अशी कित्येकांची कल्पना आहे. इजिप्त-मधील राजकीय वातावरण अशा प्रकारचें आहे कीं, सरवत पाशाला राजीनामा कां द्यावा लागला, हें समजण्यास बराच काळ लोटावा लागेल. अंतस्थ स्थिति कांहींही असली, तरी ही गोष्ट मात्र सत्य आहे कीं, सरवत पाशाला राजीनामा द्यावा लागून नवीन प्रधानमंडळ स्थापन झालेलें आहे; व झगलूल पाशाच्या अनुयायांनीं त्याचें अभिनंदनही केलें आहे. राजानें झगलूल पाशाच्या पक्षाची मशीद अल् अझर यांत अगदीं प्रथमच जाऊन प्रार्थना केली व त्यामुळें त्याची लोकप्रियताही वाढली आहे.

इजिप्तमधील वादांत वादग्रस्त प्रश्न मुख्यतः पुढीलप्रमाणें आहेतः—

(१) इजिप्तमध्यें ब्रिटिश साम्राज्याच्या दळणवळणाची सुरक्षितता (२) पर-शत्रूपासून इजिप्तचें संरक्षण (३) परदेशस्थांचें व अल्पसंख्यांकांचें संरक्षण (४) व सुदान. इजिप्तला दिलेल्या सुधारणांत हीं राखीव खातीं आहेत व इजिप्तला स्वातंत्र्य दिल्याचें जाहीर केलें असलें तरीही हीं खातीं पुष्कळच वर्षें राखिव खातींच राहतील असा तज्ज्ञांचा अजमास आहे. ब्रिटनची साम्राज्यतृष्णा नष्ट झाली नाहीं तोंपर्यंत या प्रश्नांचा निकाल लागणें कठीण आहे!

याशिवाय इतर किरकोळ तक्रारी दूर करण्यांत आल्या असून गेल्या वर्षी ५ जुलै रोजीं इजिप्तमधील लष्करी कायदा काढून घेण्यांत आला आहे. राहिलेलीं खातीं इजिप्शियन लोकांच्या स्वाधीन करण्यांत आलीं आहेत. फक्त हाय कमिशनर म्हणून ब्रिटिशांचा अधिकारी सल्लामसलत (!) देण्यासाठीं तेथें राहण्यांत यावयाचा आहे. लष्करी कायद्याचा दुस्सह जाच कमी करण्यांत आला, झगलूल पाशाचीही सुटका करण्यांत आली व सन १९१३ पासून केवळ नाममात्र असलेली लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची बैठक पुनः भरण्याचें ठरून त्याप्रमाणें निवडणुकीही झाल्या व त्यांत झगलूल पक्षाचे अनुयायी मताधिक्यानें निवडून आले.

इजिप्तला मिळालेलें स्वातंत्र्य अगदीं पोकळ असून त्यांत कांहींच अर्थ नाहीं, ही गोष्ट झगलूल पाशानें पूर्ण ओळखूनही गेल्या निवडणूकींत आपल्या अनुयायांसह

भाग घेतला. अनत्याचारित्वानें राज्यक्रान्ति करावयाची असल्यास जनसंमतीच्या जोरावर अस्तित्वांत असलेलें राज्ययंत्र हस्तगत करून घेणें हीं राजकारणांतील मुख्य किल्ली आहे; अर्थात् तें राज्ययंत्र हस्तगत करून घेतल्यावर बहुमताच्या जोरावर त्याची दिशा ठरविणें, हें कुशल कर्णधाराचें काम आहे व झगलूल पाशा या दिव्यांतून कसा पार पडतो ही पाहण्यासारखी गोष्ट आहे.

इजिप्तला मिळालेल्या सुधारणा अगदीं तुटपुंज्या असून त्यानें स्वातंत्र्याची भूक शमणें शक्यच नाहीं व त्याप्रमाणें झगलूल पाशानें विस्तृत प्रमाणावर प्रचंड चळवळ करण्याचें जाहीर करून गेल्या निवडणुकींत त्याच्या पक्षानें कौन्सिलांतील बहुतेक जागा काबिज केल्या आहेतही आतां डाव कोण जिंकतो हें लवकरच समजून येईल !

---

## हिंदुस्थान व इजिप्त.

'इजिप्तला पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे,' 'इंग्रजी छत्र (Protetcorate) नको' या मूलभूतध्येयाबद्दल इजिप्तमध्यें तख्तनशीन सुलतानापासून तों अगदीं सामान्य माणसापर्यंत सर्वांचें एकमत आहे. व याचें प्रत्यंतर मिल्नर मिशन इजिप्तमध्यें आलें त्यावेळीं पूर्णपणें आलेलें आहे. हिंदुस्थानांतील स्थितीसंबंधानें विचार करतां, येथें अद्याप ध्येयाबद्दलच कोणाची एकवाक्यता नाहीं. कोणी पूर्ण स्वतंत्र होऊं म्हणतो, कोणी वसाहतीच्या स्वराज्यावर तृप्त होण्यास तयार आहे, कोणाला नुसती प्रांतिक स्वायत्तता पुरते, तर कांहीं महानुभावांना देशी लोकांच्या कसल्याहि राज्यपद्धतीपेक्षां परकीयांच्या दास्यांतच गोडी वाटते. या विविध ध्येयांप्रमाणें मार्गांतही विविधता अर्थातच उत्पन्न होऊन, स्वराज्यप्राप्ति हें जें बहुजनसमाजाचें ध्येय त दूरावून आपसांतच नसते वादविवाद उत्पन्न होऊन द्वेष, मत्सर वगैरे परकीय नोकरशाही स्थिरावण्यास कारणीभूत होणारे ग्रह जोरावूं लागले.

एक ध्येय निश्चित करून तें साध्य करण्याला प्रत्येकाला आपल्या शक्ति बुद्धीप्रमाणें मुभा पाहिजे व या बाबतींत इजिप्तचें उदाहरण घेण्यासारखें आहे. युद्ध पुकारण्यापूर्वी आपल्या सैन्याची तयारी कितपत आहे, हें पाहून मग कुशल सेनापती युद्धाची द्वाही फिरवितो; त्याचप्रमाणें ज्या जमलेल्यासाठीं आपण एकादें

उद्दिष्ट साधण्याचा प्रयत्न करणार त्यांच्यांत ऐक्याची सामुग्री भरपूर आहे कीं नाहीं, हें पाहणें पुढाऱ्याचें कर्तव्य असतें व याप्रमाणें ऐक्याची गांठ दृढ सांधलेली असल्यावर चळवळीच्या पुढाऱ्याला एकदम हद्दपार केला किंवा बंदिवासांत टाकला, तरी त्यांनीं आंखलेला मार्ग न विसकटतां त्यांच्या उद्दिष्टाची गाडी आपला मार्ग पूर्वीप्रमाणेंच आक्रमण करील !

इजिप्त व हिंदुस्थान यांमध्यें बऱ्याच गोष्टींचें साम्य आहे. दोघांवरही एकाच परकीय सत्तेचा वरवंटा फिरतो; हा सारखवटपणाचा मुख्य भाग सोडून दिला, तरी तेथील पुढाऱ्यांनीं जे मार्ग अवलंबिले त्या मार्गांतही अनेक प्रकारें साम्य आढळून येतें. इजिप्तच्या स्थितीची पहाणी करण्यासाठीं मिल्नर कमिशन आलें; परंतु तेथील लोकांनीं एकमतानें व इतका कडक बहिष्कार त्या मिशनवर घातला कीं, त्याला आंबट तोंड करून शेवटीं परत फिरावें लागलें ! हिंदुस्थानांत कौन्सिलांवर बहिष्कार पुकारण्यांत आला व तीं कौन्सिलें खुलीं करण्यास येणाऱ्या बादशहांच्या काकांवरही बहिष्कार पुकारण्यांत आला. पण दोन्ही देशांतील बहिष्कारांची तुलना करूं लागल्यास हिंदुस्थानच्या वांट्यास अपयशाखेरीज कांहींच आलें नाहीं. कौन्सिलांत एक विवक्षित वर्ग गेला नाहीं, तरी जनतेचे प्रतिनिधि म्हणून राजरोसपणें दुसरा एक आंत शिरलाच होता व त्यानें काकांवरील बहिष्कार काय किंमतीनें लेखला, ही गोष्ट सर्वश्रुत अशीच आहे.

इजिप्तमधील स्वातंत्र्याच्या झगड्यांत तेथील स्त्रियांनीं व विद्यार्थ्यांनीं जी कामगिरी केली ती अनुपम अशी आहे. मिल्नर–कमिशनवर बहिष्कार, विदेशी मालावर बहिष्कार वगैरे कामांत तेथील स्त्री-वर्गानें केलेली कामगिरी केवळ अमोलिक अशी आहे. हिंदुस्थानांतील स्त्रीवर्ग आपल्या देशस्थितीसंबंधानें अद्याप जागाच झाला नाहीं असें म्हणावें लागतें व हीच गोष्ट विद्यार्थी-वर्गाच्या संबंधानें !

निःशस्त्र चळवळीच्या जोरावरच आपलें उद्दिष्ट साध्य करून घ्यावयाचें असेल तर देशांत पूर्ण ऐक्य नांदलें पाहिजे. हिंदुस्थानांत दुर्दैवानें तशी स्थिति नाहीं. केवळ साधनभेदामुळें देशांतील अनुभवी, कसलेले व अलोट स्वार्थत्यागी असे पुढारी गमावण्यासही कित्येकांस दिक्कत वाटत नाहीं ! स्वार्थत्याग व ऐक्य यांच्या जोरावर नोकरशाहीच्या नैतिक दौर्बल्यावर हल्ले केल्यास शांतवृत्तीचा प्रतिकार यशस्वी होईल असें इजिप्तचा इतिहास सांगतो !

## —५—

# कोरियाची करुणकहाणी.

Assuredly, if the defects of the past are to be rectified, if the agony of the present is to cease, if future oppression is to be avoided, if thought is to be set free, if liberty to act is to be recognised, if we are to attain to any progress, if we are to deliver our children, from the painful, shameful heritage of bondage, if we are to leave blessing and happiness intact for those who succed us the first of all necessary things is the full independence of our people.

—*Korean Declaration of Independence.*

स्वातंत्र्याच्या सर्वच कथा रमणीय, स्फूर्तिदायक व तेजस्वी अशा असतात. स्वातंत्र्ययुद्धांत अचाट साहस, अलोट धैर्य, आत्यंतिक स्वार्थत्याग यांचीं जितकीं मनोवेधक उदाहरणें सांपडतात, त्याचप्रमाणें स्वातंत्र्य-पथ अतिशय कष्टाचा, पदोपदीं निराशा उत्पन्न करणारा व कंटकमय असा असल्यानें सुखदुःखाच्या संमिश्र भावनांनीं विचारशक्तीला जें एक प्रकारचें आंदोलन मिळत असतें, त्यांतच स्वातंत्र्यगीतांचें खरें मोहकत्व आढळून येतें. विशेषतः स्वातंत्र्याच्या युद्धांत पदोपदीं जे अत्यंत कष्टप्रद अनुभव येतात त्यांची यथातथ्य कल्पना समदुःखी अंतःकरणाशिवाय योग्य प्रकारें इतरांस करतां येणें शक्य नाहीं. तसाच प्रसंग प्रस्तुत ठिकाणीं वर्णन करण्याचें योजिलें आहे.

रशियासारख्या अत्यंत प्रबल राष्ट्रास अद्भुत पराक्रम गाजवून एका तडाक्यांत धुळीस मिळविलें त्याबरोबर जपानचा यशोदुंदुभी सर्व जगावर गर्जूं लागला, व त्याबद्दल आम्हां हिंदी लोकांसही जपानबद्दल अत्यंत आदर व अभिमान वाटूं लागला. जपाननें आपल्या वैभववृद्ध्यर्थ जीं कांहीं अलौकिक कृत्यें केलीं, आपल्या स्वातंत्र्यरक्षणार्थ जे अचाट पराक्रम केले, आपल्या स्वातंत्र्याचा अपहार करण्यास उत्सुक झालेल्या शत्रूंचीं नरडीं फोडतांना ज्या जपानचें आपण मनःपूर्वक कौतुक केलें, त्याच जपाननें आपले रक्तबंबाळ झालेले हात बिचाऱ्या कोरियाच्या गळ्याभोंवतीं वेष्टून त्याच्या स्वातंत्र्याचें अपहरण चालविलें आहे. त्याच्या

प्रतिकारार्थ कोरियन देशभक्तांनीं किती प्रचंड स्वार्थत्याग चालविला आहे, अत्यंत अमानुष अशा छळास ते कसे बळी पडत आहेत व छोट्या राष्ट्रांच्या संरक्षणार्थ महायुद्धांत आम्हीं भाग घेतला असें दिमाखानें म्हणणारीं राष्ट्रें किती बेशरमपणें हें कोरियाचें अपहरण उघड्या डोळ्यांनीं पहात आहेत, ती करुणकथा येथें वाचकांना सांगण्याचा मानस आहे.

जपानी समुद्र व पिंवळा समुद्र या दोन समुद्रांच्यामध्यें निफोन. बेटाच्या अंगाला जो भाग समुद्रांतून वर आला आहे तो कोरियाचें द्वीपकल्प या नांवानें भूगोलांत प्रसिद्ध आहे. भूगोलांत बेल्जम, बास्फरस, इजिप्त वगैरे ठिकाणांना राजकीय दृष्ट्या आज जें महत्त्व आहे तेंच महत्त्व कोरियाला आहे. कोरियाच्या खिडकींत बसून रशिया, चीन व जपान यांच्यावर देखरेख अगदीं सुखानें करतां येते, अशी त्याची उत्कृष्ट निसर्गसिद्ध रचना आहे. ज्या वेळीं जपान जागृत होऊन आपल्या सभोंवतीं पाहूं लागला, त्या वेळीं कोरियाचें राजकीय महत्त्व त्याच्या लक्षांत येऊन त्यानें आपली आशाळभूत दृष्टि त्यावर टाकली. जपानचें अभ्युत्थान व कोरियाचा अध:पात या गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून घडून आल्या असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. सन १८५२ सालीं जपाननें कोरिया गिळंकृत करण्याचा प्रथम प्रयत्न केला; परंतु त्या वेळीं त्याची पूर्ण तयारी झाली नसल्यानें चीनच्या दटावणीबरोबर त्यास तो प्रयत्न सोडून द्यावा लागला. जपाननें तात्पुरता हा प्रयत्न सोडून दिला, तरी त्याची अंतस्थ कारवाई सुरूच असून संधी केव्हां सांपडते याबद्दल तो अगदीं टपून बसला होता व तशी संधी त्याला मिळालीही. १८७६ सालीं कांहीं जपानी व्यापारी कोरियांत जबरदस्तीनें उतरत असतां कोरियन लोकांनीं त्यांची कत्तल केली. ही संधी साधून जपाननें आपला हेतु सफल करून घेतला व व्यापारासाठीं कांहीं बंदरें खुलीं करून घेतलीं. सन १८८२ सालीं ब्रिटन, अमेरिका या राष्ट्रांशींही कोरियाला व्यापारी तह करावे लागले; परंतु अमेरिका व ग्रेटब्रिटन यांनीं या तहांत असें बांधून दिलें कीं, कोरियावर परचक्र आलें असतां त्यांनीं कोरियास मदत करावी. जपानचा कोरियांत चंचुप्रवेश झाला तरी त्याचें आसन मात्र तेथें अद्याप स्थिर झालें नव्हतें. तो चीनला थोडासा दबकत असे; परंतु चीनबरोबर युद्ध झाल्यास आपण चीन सहज कोलवूं अशी त्याला खात्री वाटतांच त्यानें चीनशीं करार करून उभयतांनीं आपआपलीं सैन्यें कोरियांतून काढून न्यावीं असें ठरलें. सैन्यें काढून घेतांच जपाननें

आपल्या हस्तकांकरवीं तेथें एक बंड उभें केलें व तें बंड मोडण्यासाठीं म्हणून एकदम दहा हजार सैन्य कोरियांत नेऊन उतरविलें. यामुळें चीन व जपान यांच्यांत युद्ध होऊन चीनचा सपशेल पराभव झाला व कोरियांत वाटेल तसा धुडगूस घालण्यास जपानला एक प्रकारें मुभाच सांपडली. त्यानें कोरियाच्या बादशहा-कडून जबरदस्तीनें एका तहनाम्यावर सही करून घेतली. हा तहनामा कोरियाच्या स्वातंत्र्याची हानी करणारा असल्यानें कोरियन लोकांस आवडला नाहीं. तेव्हां जपानी लोकांनीं बादशहासच तुरुंगांत टाकून आपला एक हस्तक कारभार पाहण्यास नेमला; परंतु बादशहा तेथून मोठ्या युक्तीनें सुटून रशियन वकिला-तींत आश्रयाला गेला. त्या वेळीं रशियाशीं युद्ध करण्याची जपानची तयारी नसल्यानें कोरिया तात्पुरता जपानच्या मगरमिठींतून मुक्त झाला; पण या मिळालेल्या संधीचा कोरियानें योग्य उपयोग करून न घेतल्याकारणानें त्यास स्वातंत्र्यवंचित व्हावें लागलें.

या संधीचा कोरियानें सदुपयोग करावा असे कित्येक देशभक्तांनीं प्रयत्न केले. त्यांत फिलिप जयसोहन हा प्रमुख होता; परंतु कोरियाचा त्या वेळीं इतका नैतिक अधःपात झाला होता कीं, त्याच्या इच्छेप्रमाणें देश जागाच होईना! तरीही तो हताश न होतां त्यानें लोकजागृतीचें कार्य सुरू केलें. त्यानें प्रथम दोन वृत्तपत्रें काढलीं व 'स्वातंत्र्य-संघ' नांवाची संस्था स्थापन करून सर्व देशभर त्याच्या शाखा पसरविल्या. अवघ्या तीन महिन्यांत मंडळास दहा हजार सभासद मिळविले. देशांतील लांचखाऊ नोकरशाहीचीं दुष्कृत्यें भर चवाठ्यावर या मंडळाकडून आणलीं जात; याच वेळीं कोरियन सैन्याचें शिक्षण रशियाकडे सोंपविण्यांत आलें. आपलें सैन्य परावलंबी होणार ही कल्पनाच या देशभक्तांस असह्य वाटून त्यांनीं ही योजना रद्द करण्याबद्दल बादशहास विनंति केली. बादशहा तिकडे काणाडोळा करतो असें आढळून येतांच हा हुकूम रद्द झाल्याखेरीज आम्ही येथून हलत नाहीं असें म्हणून या दहा हजार लोकांनीं राजवाड्यासमोर धरणें धरलें. तेव्हां लोकमताचें हें उग्र स्वरूप पाहतांच बाद-शहानें नरमून त्यानें आपला हुकूम रद्द केला. यानंतर जयसोहन हा अमेरिकेंत गेला व सिंगमनारी यांच्याकडे लोकमताचीं सूत्रें सोंपविण्यांत आलीं. सिंगमनारी यानें आपलें काम चोख रीतीनें बजावलें. अनेक उपयुक्त चळवळी सुरू केल्या. परकीयांना देण्यांत येणाऱ्या सवलतीवर करडी नजर, जमाबंदीच्या कामांत

सचोटी, प्रातिनिधिक संस्थांची मागणी वगैरे चळवळी त्यानें सुरू केल्या. लोकांवर त्याचें अत्यंत वजन वाढलें. स्वातंत्र्यसंघाची शक्ति वाढूं लागली. ही गोष्ट बादशहास व नोकरशाहीस भीतिप्रद वाटून स्वातंत्र्य-संघ रद्द करण्याचा त्यानें हुकूम फर्माविला; परंतु कोरियन देशभक्तांचें संघट्टण जास्त असल्यानें त्यांनीं ह्या हुकूम अमान्य करून आम्हां सर्वांसच पकडा म्हणून अहमहमिकेनें हजारों स्वातंत्र्यभक्त पोलिसांपुढें येऊन उभे राहिले. सर्वांस पकडणें अर्थातच शक्य नसल्यानें त्यांतील फक्त सतरा पुढाऱ्यांस अटक करण्यांत आली. परंतु यामुळें लोकक्षोभाचा वणवा इतका भडकला कीं, अवघ्या पांचच दिवसांत त्यांस मुक्त करावें लागलें.

परंतु नोकरशाहीच्या अनियंत्रितपणास यामुळें खीळ पडली नाहीं, स्वातंत्र्य-संघाची चळवळ तरवारीच्या जोरावर मोडण्याचें तिनें ठरविलें. परंतु देश-भक्तांचा उज्ज्वल त्याग पाहून पोलिसांनीं त्यांजवर हत्यार चालविण्याचें नाकारून आपले बिल्ले सरकारी अधिकाऱ्यांपुढें फेंकून देऊन तेही स्वातंत्र्य-संघांत सामील झाले. लोकमत शांत होत नाहीं असें पाहतांच बादशहांनीं सुधारणा देण्याबद्दल आश्वासन दिलें, परंतु बादशहा ती गोष्ट लवकरच विसरून राजकीय चळवळ करणाऱ्यांपैकीं प्रमुख इसमांस उचलून राजद्रोहाच्या आरोपावरून त्यास जबर शिक्षा ठोठावल्या, त्यांचा अमानुष छळ करण्यांत आला. त्यांत सिंगमन री हाही सांपडला. त्याला हातापायांत बिड्या घालून जमिनीवर खिळून टाकला होता. त्याला मृत्यूची शिक्षा सुनावण्यांत आली, तेव्हां आपल्या हाल-अपेष्टा तरी चुकतील या आशेनें तो अत्यंत हर्षभरित झाला! इतका त्याचा छळ होत असे; परंतु परमेश्वराची लीला अगाध! दुसऱ्या दिवशीं त्याला फांशीं देण्यास नेण्याऐवजीं त्याच्या शेजारचाच मनुष्य फांसावर चढविला गेला. पुढें सहा वर्षांनीं त्याची सुटका होऊन तो अमेरिकेंत गेला व तेथें एम्. ए., पी. एच्. डी. झाला. याला म्हणतात दैवयोग!

यानंतर लवकरच रूसो जपानी युद्धास सुरवात झाली. त्यांत जपाननें आपल्या अलौकिक पराक्रमानें रशियास कसा चीत केला, ही गोष्ट इतिहासज्ञांस विदितच आहे. या युद्धांत जपानला अभूतपूर्व असा जय मिळाल्यानें त्यानें कोरियाच्या स्वातंत्र्याबर राजरोस हल्ला करण्याचें ठरविलें. रशियाशीं युद्ध करण्याकरितां म्हणून जपाननें कोरियामधून आपलें सैन्य नेण्यास मार्ग मागितला

व १९०४ च्या तहाप्रमाणें कोरियानें तो दिला. युद्ध समाप्त होतांच सैन्य हालविण्याचें वचनही जपाननें कोरियाला दिलें. परंतु जपान विजयी होतांच हीं सर्व अभिवचनें विसरून आज तागाईत जपानी सैन्य, कोरियांत 'कोरियन लोकांचे हक्क व स्वास्थ्य संरक्षण करण्यासाठीं' आहेच. अशा प्रकारच्या विश्वासघाताचें कोरियाच्या जोडीला इजिप्तचें उदाहरण इतिहासानें नमूद करून ठेविलें आहे.

राजकारणांत जपान इंग्लंडचा शिष्य समजला जातो. परंतु कोरियाच्या बाबतींत शिष्यानें गुरुवर सर्व प्रकारानें मात केली आहे. कोरियांत स्थिर होतांच, ताबडतोब १९०५ सालीं जपाननें कोरियाच्या राज्यकारभाराचीं सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. या कामीं जपाननें जी पशुवृत्ति स्वीकारली, जें निंद्य वर्तन केलें, विश्वासघात केला त्याला इतिहासांत जोड नाहीं! जपानी सैन्यानें राजवाड्यांस वेढा देऊन बादशाहास व प्रधानास तहावर सही करण्याविषयीं सक्ति केली. बादशहानें सही केलीच नाहीं व कोरियानें या तहास केव्हांच संमति दिली नाहीं. एखाद्या चोराच्या स्वाधीन आपला खजिना आपण किती खुषीनें करतों, त्याच प्रकारची ही खुषी होती. तथापि जपाननें सर्व जगभर जाहीर केलें कीं, कोरियानें स्वखुषीनें तह केला! अशा प्रकारचा स्वातंत्र्यावर घाला पडलेला पाहून कित्येक देशभक्तांनीं पारतंत्र्यांत राहण्यापेक्षां मृत्यू बरा म्हणून आत्महत्या करून घेतली!

याप्रमाणें सत्ता हातीं येतांच जपाननें कोरियाचें सर्व बाबतींत अस्तित्वच नष्ट करण्याचा चंग बांधला. कोरियन भाषा शिकविणें बंद करण्यांत आलें, शाळेंत शिकविलीं जाणारीं पुस्तकें जपान सरकारनें मंजूर केलेलीं नेमण्यात आलीं. लोकांच्या जमिनी लुबाडण्यांत आल्या, सर्व व्यापार हस्तगत करण्यात आला, न्याय कचेऱ्यांत जपानी न्यायाधीश नेमण्यात आले. शहरें, प्रांत, जिल्हे यांचीं कोरियन नांवें बदलून त्यांच्या जागीं जपानी नांवें ठेवण्यांत आलीं. जपानी अधिकारी, जपानी पोलिस व सर्व राज्यकारभार जपानमय होऊन गेला. याशिवाय जेवढं कोरियन लोकांना महत्त्वाचें, अभिमानाचें व ऐतिहासिकदृष्ट्या जें जें म्हणून स्फूर्तीचें त्या सर्व वस्तूंचा नाश करण्याचा उपक्रम राजरोस सुरू झाला. कोरियन इतिहास, कोरियन वाङ्मय सर्व आगीच्या भक्ष्यस्थानीं अर्पण करण्याचा क्रम आजतागायत सुरू आहे. जगाच्या पाठीवरून कोरियाचें नांव पार पुसून जपानच्या अधिकाराखालील तो एक सामान्य प्रांत करण्याचा जपानचा उद्योग

सुरू आहे. सन १९१० सालीं कोरिया हा एक जपानचाच प्रांत आहे असें जाहीर करण्यांत आलें. कोरिया सर्व जपानमय करण्याचा धुमधडाका सुरू झाला. ४२०० वर्षांची ज्या कोरियाची संस्कृति-ज्या संस्कृतींतून जपानची संस्कृति निर्माण झाली, दोन कोटी लोक ज्या संस्कृतींत वाढलेले, व ४२०० वर्षें ज्यांनीं अखंड स्वातंत्र्याचा मनमुराद उपभोग घेतला, तो कोरिया पृथ्वी-पटावरून कायमचा नष्ट करण्याचा अत्यंत आसुरी प्रयत्न जपाननें उघड उघड चालविला आहे.

सर्व देशभर लष्करी सत्ता थैमान घालीत आहे. कोरियन लोकांचा प्राण जपानी सैनिकांच्या हातचा मळ होऊन बसला आहे. लहरीस येईल तेव्हां कोणाची चौकशी न करतां प्राण घेणें अगर फटके मारणें हा रोजचा क्रम होऊन बसला आहे. देशांत गुप्त पोलिसांचा अत्यंत सुळसुळाट झाला आहे. सर्व कोरियन लोकांची नोंद करण्यांत येऊन त्यांस नंबर देण्यांत आले आहेत. ते नंबर पोलिसांच्या वहींत नोंदले गेले असून, एखाद्या कोरियन मनुष्यास पर-गांवीं जाणें असेल तर, गांवाचें नांव, काय कामास जातो तें, पोलिसांस कळवून त्याचा दाखला घेतल्याखेरीज त्यास गांव सोडतां येत नाहीं. व्यक्तिगत स्वातंत्र्य पार नाहींसेंच झालें आहे. बँकांतून पोलिसांच्या परवानगीखेरीज त्यांस पैसे काढतां येत नाहींत आणि प्रत्येक संपन्न कोरियन मनुष्याच्या घरचा कारभार पाहण्यास जपानीच दिवाण नेमला पाहिजे असा सक्त नियम असून तो दिवाण पोलिसच्या शिफारशीचा असावा लागतो व त्यानें आपल्या धन्याचा सर्व कार-भार पहावयाचा ! याप्रमाणें कोरियन मालकाचें जीवित सर्वथैव आपल्या जपानी दिवाणाच्या मर्जीवर अवलंबून आहे. जाहीरसभा, भाषास्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य या सर्व गोष्टी कोरियांतून अदृश्य झाल्या असून आज दोन कोटी लोकसंख्येच्या देशांत एकही वृत्तपत्र नाहीं. लष्करी कामाकरितां म्हणून मोठमोठ्या जमिनी मूळ किंमतीपेक्षां वीसपट कमी किंमतीनें हिरावून घेण्यांत येऊन त्या जमिनी जपानी शेतकऱ्यांस व्यापाराकरितां देण्यांत आल्या. जवळ जवळ ३/४ जमीन याप्रमाणें हिरावून घेण्याचा जपान्यांनीं प्रयत्न केला. तेव्हां लोकमत इतकें क्षुब्ध झालें कीं, जपान्यांनीं तो विचार तात्पुरता सोडून दिला.

जपानी लोकांनीं याप्रमाणें कोरियन लोकांच्या प्रत्यक्ष जीविताबरच घाला घातल्यानें लोक अत्यंत खवळले. अशा स्थितींत मार्क्विस इटो यानें कोरियाच्या

गळ्याभोंवतालचें पारतंत्र्याचे पाश जास्त घट्ट करणाऱ्या अशा अटी कोरियावर लादल्या. यावेळीं कोरियन लोकांनीं अमेरिकेला आपल्या वचनाची आठवण देऊन कोरियाच्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्याबद्दल विनंति केली; परंतु लहान राष्ट्रांच्या स्वातंत्र्य रक्षणासाठीं महायुद्धांत उडी घेणाऱ्या अमेरिकेनें त्यावेळीं आपल्या कानावर साफ हात ठेविले! कोरियन लोकांत असंतोष दिवसानुदिवस जास्त वाढत चालला, व त्यांतच मार्किस इटोची एका देशभक्त कोरियनानें प्राणाहुति घेतली. तेव्हांपासून कोरियामध्यें पाशवी स्वरूपाचा लष्करी कायदा पुकारण्यांत आला. कित्येक देशभक्तांना आपल्या मातृभूमीची अशी होत असलेली अवहेलना न पाहवल्यामुळें त्यांनीं आत्महत्याही करून घेतल्या! जपानी लोकांनीं या देशभक्तांचा अत्यंत अमानुष प्रकारें छळ चालविला; त्याचीं वर्णनें ऐकून अंगावर शहारे येतात, डोळे अश्रूंनीं भरून येतात व जपान्यांच्या नीच वर्तनानें अत्यंत संताप उत्पन्न होतो. व परमेश्वरा! तूं अनाथांचा नाथ, सत्यासाठीं, स्वातंत्र्यासाठीं, एका अत्यंत उच्च अशा तत्त्वासाठीं हजारों देशभक्त आत्मोत्सर्ग करीत असतां तूं अद्यापिही त्यांचा किती अंत पाहणार? असे विचार अंतःकरणांत कोलाहल उडवितात. चेंगिजखान, नादीरशहा या जुन्या क्रूरकर्म्यांपासून तों तहत आजपर्यंत सर्व जुने नवे छळाचे प्रकार कोरियांत जपानी लोकांनीं सुरू केले असून त्या कामांत त्यांनीं अग्रस्थान पटकावलें आहे. तरीही जपानचा गौरव मुक्तकंठानें ते सर्व जगभर होत आहेच. हा सर्व कशाचा महिमा?

इ. स. १९१६–१७ सालीं ८२,१२१ कोरियन देशभक्तांस बिनाचौकशी शिक्षा ठोठावण्यांत आल्या. दवाखान्यांतून जखमी लोकांस फरफटत ओढून नेऊन येथें अमानुषपणें त्यांस फटके मारण्यांत आले. हा प्रकार इतका वाढला कीं, लोकांस नको येथें रहाणें, असें होऊन सुमारें पाऊणशें लक्ष लोकांनीं देशत्याग केला. वाटेंत त्यांचे अत्यंत हाल झाले. त्यांतच कित्येक मृत्युमुखाही पडले; परंतु घरच्या यमयातनेपेक्षां प्रत्यक्ष यमाची भेटच त्यांस सुखावह वाटली. हा देशत्यागाचा क्रम अद्याप अव्याहत चालला आहे. अशा प्रकारच्या अनन्वित जुलमानें वैतागून कांहीं क्षात्रवृत्तीच्या कोरियन वीरांनीं 'पुण्यपथक' नांवाचें स्वयंसेवकांचें एक पथक उभारून गनिमीकाव्यानें जपानी लोकांवर सतत हल्ले करण्यास सुरुवात केली. परंतु जपान्यांच्या लष्करी सामर्थ्या-

पुढें या मूठभर लोकांचा किती निभाव लागणार ? या चळवळीचा फायदा घेऊन जपान्यांनीं गांवेंच्या गांवें जाळून बेचिराख केलीं. दिसेल त्याला गोळ्या घालण्यांत येऊं लागल्या. वायकांवर जुलूमजबरदस्ती सरसहा सुरू झाली ! या स्वातंत्र्याच्या चळवळींत प्रमुख भाग कोरियन ख्रिश्चनांनीं घेतला आहे. अर्थात् जपान्यांचा सर्व दांत त्यांच्यावर आहे. सन १९११ सालीं लष्करी गव्हर्नर जनरल टेराची यानें सरसहा ख्रिश्चनांना छळण्यास सुरवात केली. त्यांच्या-कडून कबुलीजबाब घेण्याबद्दल त्यांचे असे अनन्वित हाल करण्यांत आले कीं, त्यांचे आक्रोश अमेरिकेपर्यंत जाऊन पोहोंचून जपान्यांचीं सर्व कृष्णकारस्थानें चव्हाट्यावर आलीं.

अशा वेळीं विल्सनसाहेबांनीं स्वयंनिर्णयाची चतुर्दशसूत्री गाइली. आतां आपल्या गाऱ्हाण्यांकडे जरा तरी जगाचें लक्ष जाईल, अशी कोरियनांस फार आशा वाटली, परंतु उच्च तत्त्वें फक्त बोलण्यासाठीं असतात, असा अनुभव कोरियनांस लवकरच आला. पाश्चात्य मुत्सद्दी कोणाही कोरियन पुढाऱ्याची नुसती गांठही घेईनात. अशा प्रकारें सर्वत्र निराशा झाल्यावर लोक अत्यंत संतप्त झाले; परंतु पुढाऱ्यांनीं त्यांस आंवरून धरून अनत्याचारी असहकारितेची चळवळ करण्याचें ठरविलें. याच सुमारास कोरियाचा बादशहा मृत्यु पावला. कोणी म्हणतात त्यानें आत्महत्या केली असावी. तेव्हां राजा म्हणून कोणास मानावें असा विचार चालला असतां, कोरियन देशभक्तांनीं मोठ्या धैर्यानें लोकसत्ता स्थापन करून हीच आमची खरी शासनसंस्था असें जाहीर केलें.

कोरियाचें स्वातंत्र्य जाहीर करण्याचा एक दिवस मुक्रर करण्यांत आला. सर्व देशभर अत्यंत सावधपणें व गुप्तपणें स्वातंत्र्याचा जाहीरनामा व कार्यक्रम प्रसृत करण्यांत आला. जपानी नोकरशाहीला देशांत कांहीं खळबळ चालली आहे इतका सुगावा लागला; परंतु तिच्या स्वरूपाचा मात्र अंत लागला नाहीं. तेव्हां त्यांनीं बादशहाच्या मृत्युसंबंधीं दुःखप्रदर्शनाच्या सभाच भरवूं नयेत असा हुकूम काढला ! राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं आपला दिवस बदलला. लोकसत्तेचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्याचा मार्ग कोरियन देशभक्तांनीं अत्यंत शांततेचा पण तितकाच धैर्याचा असा योजिला. जाहीरनाम्यावर सह्या करणाऱ्या बत्तीस पुढा-ऱ्यांनीं प्रमुख जपानी अधिकाऱ्यांस मेजवानीस बोलावलें. भोजन झाल्यानंतर मुकाट्यानें स्वातंत्र्याचा जाहीरनामा त्यांस वाचून दाखविला व त्याचक्षणीं पोलीस

अधिकाऱ्यांस ही सर्व हकीकत कळवून आपणास पकडण्याबद्दल विनंति केली. पोलिसांनीं त्यांची उचलबांगडी केली व शहरांतून त्यांची गाडी जाऊं लागतांच हजारों कोरियन हातांतून कोरियन निशाणें घेऊन देशभक्तांचा जयजयकार करीत असल्याचें जपानी अधिकाऱ्यांस आढळून आलें. त्यामुळें ते अत्यंत आश्चर्यचकित झाले.

कोरियन लोकांनीं आपल्या स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यांत आपली संस्कृति पांच हजार वर्षांची जुनी असून आतांपर्यंत आपण स्वातंत्र्याचा कसा उपभोग घेत आलों व आज राष्ट्रीय जागृतीच्या काळांत आपलें कर्तव्य काय, याचा इतिहास अत्यंत सुंदर व तेजस्वी रीतीनें दिला आहे, हें त्यांतील कांहीं उतारे खालीं दिले आहेत त्यावरून लक्षांत येईल:—

" आम्हीं कोरियाचें व कोरियन लोकांचें स्वातंत्र्य जाहीर करीत आहों. सर्व राष्ट्रें समान आहेत हें सर्व जगाला साक्षी ठेवून आम्हीं सांगतों व हा समानतेचा ठेवा, जन्मसिद्ध हक्क म्हणून, आमच्या वंशजांकडे जाईल. पांच हजार वर्षांचा इतिहास व दोन कोटी लोकांची संमति याच्या जोरावर हा जाहीरनामा आम्ही काढीत आहों. या नवजागृतीच्या काळीं आमच्या वंशजांना त्यांचें कर्तव्य काय, हें समजण्यासाठीं हा जाहीरनामा काढलेला आहे. मनुष्यमात्राचा योग्य हक्क, प्रचलित युगांतील चैतन्यमय तत्त्व व परमेश्वराराधनेचा हाच एक मार्ग आहे. हें तत्त्वच असें आहे कीं, तें कोणास नष्ट करतां येत नाहीं; दडपून टाकतां येत नाहीं; अगर त्याची वाढही खुंटवितां येत नाहीं.

" हजारों वर्षें स्वातंत्र्य भोगल्यावर नवयुगास प्रारंभ होतांच पारवीशक्तीचा जोर चढला व त्यांत आमच्या स्वातंत्र्याची आहुती पडली. आज सतत ४ वर्षें परवशतेचा कटु अनुभव आम्हीं घेत आहोंत. आमचें आचारविचारस्वातंत्र्य सर्व नाहींसें झालें आहे. आणि जगाच्या चढाओढींत आमचा टिकाव न लागेल अशा प्रकारें आम्हांला दुबळी करण्यांत येत आहे.

" गतकालांतील पातकांतून मुक्तता व्हावयाची असेल, हल्लींचे कष्टतर दिवस लवकर जावयाचे असतील, भावी संकटपरंपरा टाळावयाची असेल, विचार-स्वातंत्र्याला मोकळीक पाहिजे असेल, स्वेच्छेनें वागण्याचें स्वातंत्र्य पाहिजे असेल, आपल्या वंशजांच्या या दुस्सह व लाजिरवाण्या गुलामगिरीच्या जीवितां-तून उद्धार करावयाचा असेल, व तें सुखासमाधानांत नांदावें अशी इच्छा असेल

तर प्रथम स्वातंत्र्य पाहिजे. दोन कोटी लोकांनीं निश्चय केल्यावर अशक्य काय आहे ? कोणतीं बंधनें आपणांस आड येतील ? व आपणांस संपादन करतां यावयाचें नाहीं असें काय आहे ?

" जपाननें आमच्या संस्कृतीचा धिःकार केला किंवा आम्हांस योग्य प्रकारें बागविलें नाहीं या गोष्टीचा आम्हांस उच्चारच करावयाचा नाहीं. त्या बाबतींत आमच्याकडेच बोल आहे. दुसऱ्याचे दोष काढीत बसण्यांत कालापव्यय न करणेंच बरें ! आज आम्हांला आमचें घर उभारावयाचें आहे. तें कोणी मोडलें, कसें मोडलें याबद्दल आतां वादविवाद नकोत. आपल्या सद्सद्विवेक-बुद्धींच्या टोंचणीमुळें आपल्यापुढें काय आहे याची योग्य कल्पना आहे. गतगोष्टींबद्दल रागावून आपलें मन अस्वस्थ करून घेऊं नका.

" आज जपानी सरकार केवळ पाशवी बळानें भारून गेलें आहे. त्याला सत्पथावर आणण्याची अत्यंत महत्त्वाची कामगिरी आपणांकडे आहे. नवयुग उदित झालें असून पाशवीशक्तीचा जुना काळ आतां संपला आहे. यापुढें सत्य व धर्म यांचा उदय होणार आहे. गतकाळावरील आवरण नाहींसें होऊन नवप्रभा फांकली आहे, व त्या नवप्रकाशानें आम्ही जागृत झालों आहों. आमचे वैभवशाली पूर्वज या पुण्यप्रद कार्यांत आम्हांला आमचें उद्दिष्ट साधण्या-साठीं सर्व प्रकारें मदत करतील या स्फूर्तिदायक आशेनें आम्ही आपला मार्ग आक्रमण करीत आहों."

या जाहीरनाम्याखालीं पुढीलप्रमाणें तीन कलमें घातलीं होतीं:--

( १ ) सत्य, धर्म व जीवित यासाठीं आम्हीं जनतेच्या विनंतीवरून त्यांची स्वातंत्र्यइच्छा प्रकट करण्यासाठीं हें काम पत्करलें आहे.

( २ ) ज्यांना हीं तत्त्वें मान्य असतील त्यांनीं नेहमीं आनंदानें ही आपली इच्छा व्यक्त करावी.

( ३ ) आपलें वर्तन अखेरपर्यंत अत्यंत सरळपणाचें व आपल्या लौकिकास साजेसें असावें, अशासाठीं प्रत्येक काम उत्कृष्टपणानें केलें पाहिजे.

कोरियन लोकांनीं हा स्वातंत्र्यदिन सणाप्रमाणें पाळला. जपानी लोकांस ही गोष्ट कशी सहन होणार ? त्यांनीं पूर्वी केले नाहींत अशा अत्याचारांस आतां सुरुवात केली. सैनिकांना पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें. कोरियन मनुष्य दिसला कीं, कोणाचे हात तोड, कोणाचे कान काप, कित्येकांचीं बोटेंच तोड-

ण्यांत आलीं, कित्येकांचीं नाकेंच उडविलीं, कित्येकांना भोसकून मारण्यांत आलें ! कोरियन लोकांनीं याला उत्तर म्हणून सर्व व्यवहार अजीबात बंद ठेवला. दुकानें बंद झालीं, बाजार ओस पडला, शाळा उघडल्या; पण आंत विद्यार्थीच दिसेनात. सर्वत्र ही स्थिति झाली; तेव्हां जपानी अधिकाऱ्यांनीं जीं मुलें शाळेंत येणार नाहींत त्यांस सर्टिफिकिटेंच मिळणार नाहींत असें जाहीर केलें. विद्यार्थी बाह्यात्कारी नमल्यासारखें करून शाळेंत गेले. शाळेंत मोठमोठे जपानी अधिकारी जमले होते. समारंभ संपतांच एक तेरा वर्षांचा छोकरा जणूं काय एकादें भाषण म्हणण्यास येतो त्याप्रमाणें पुढें आला; त्याची मुद्रा अत्यंत गंभीर होती. ती पाहून अधिकाऱ्यासही कौतुक वाटलें. शेवटीं तो म्हणाला, 'एवढी गोष्ट केली म्हणजे समारंभाचा शेवट गोड झाला.' असें म्हणून, त्यानें आपल्या खिशांतून कोरियन निशाण पटकन् बाहेर काढून तें वर उडविलें व मोठ्यानें कोरियाचा जयजयकार करीत म्हणाला, 'माझा देश परत द्या.' तो मुलगा असें म्हणतांच शाळेंतील सर्वच मुलें त्यास सामील होऊन कोरियाचा जयजयकार करूं लागलीं. नंतर मुलांमुलींनीं एक जंगी मिरवणूक काढली. पोलिसांनीं ती तरवारीच्या जोरावर उधळून देऊन मुलेंमुली मिळून ४०० विद्यार्थी पकडले. या स्वातंत्र्ययुद्धांत कोरियन मुलांमुलींची कामगिरी अवर्णनीय अशी झाली आहे.

जपानी लोकांनीं आपली मनुष्यवृत्ति सर्वच सोडली होती. मिरवणुकींत पकडलेल्या मुलींस रस्त्यांत नागव्या करून त्यांस फटके देण्यास त्यांना दिक्कत वाटली नाहीं. स्त्रियांस फटके मारण्यास जपानी कायद्यानें संमति दिली आहे, असे बेशरमपणाचे उद्गार काढण्यासही त्यांस लाज वाटली नाहीं. अशा जुलमास बळी पडलेल्या स्त्रियांची स्थिति एका चक्षुर्वैसत्यनें पाहिली. तो म्हणतो, 'त्यांची स्थिति पाहून सर्वांचीं अंतःकरणें गहिंवरलीं. अशा स्थितीपेक्षां मृत्यूही बरा असे स्त्रियांचे उद्गार निघत होते. या सैतानी अमलांत सन १९१९ च्या मार्च व जून या तीन महिन्यांत एकंदर १६६१८३ इसमांस पकडण्यांत आलें. व ८३५१ लोकांचा अमानुष छळ करण्यांत आला, असें सरकारी आंकडेच सांगतात. फक्त सात आठवड्यांत २००० स्त्रीपुरुषांस मृत्युमुखीं लोटण्यांत आलें. यावरून तेथील छळाची साधारण कल्पना येईल.

परंतु अशा प्रकारचे अमानुष छळ चालू असतांही कोरियन वीर आपल्या ध्येयापासून किंचितूही च्युत झाले नाहींत व अशा धुमश्चक्रींतच १ मार्च सन

१९१९ रोजीं कोरियन लोकांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर करून सिंगमन री यास आपला पहिला अध्यक्ष निवडला व आपल्या लोकसत्तेमार्फत राष्ट्रसंघाकडे दाद मागण्याकरितां त्यास आपला प्रतिनिधि म्हणून पाठविला. राष्ट्रसंघापुढें मोठ-मोठ्या राष्ट्रांच्या नौबती झडत असल्यानें कोरियाच्या करुणकहाणीकडे लक्ष देण्यास त्यांस सवड झाली नाहीं !

त्यानंतर जपानी अत्याचारांस अतिशय जोर चढला. परंतु कोरियन वीर त्यांस दाद न देतां त्यांनीं २३ एप्रिल १९१९ रोजीं लोकसत्ताक कोरियाची घटना प्रसिद्ध केली. व त्या घटनेप्रमाणें कोरियांतील तेरा प्रांतांतील लोकांस लोकसभेंतील प्रतिनिधि निवडण्यास फर्माविलें. लोकसत्तेच्या या तात्पुरत्या घटनेंत पुढील मुख्य उद्देश आहेत. स्त्री-पुरुषांना शैक्षणिक, औद्योगिक व राज-कीय समानता, लेखन, भाषण व धर्मस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य. हीं सर्व मान्य करण्यांत आलीं. त्याचप्रमाणें फांशीची शिक्षा रद्द करण्यांत आली व सक्तीचें लष्करी शिक्षण देण्याचीही योजना आंखण्यांत आली. याप्रमाणें परसत्तेचा वरवंटा फिरत असतांही कोरियन लोकांनीं आपलें लोकसत्ताक राज्य स्थापन करून युरोपांत, राष्ट्रसंघापुढें, आपली गाऱ्हाणीं मांडण्यासाठीं प्रतिनिधी रवाना केले. त्याप्रमाणें इ. की-व्हॅन व्हॅंग नांवाचा एक प्रतिनिधि लोकसभेनें इंग्लंडांत रवाना केला व त्यानें सन १९२१ सालीं ब्रिटिश मंत्रि-मंडळापुढें आपली लेखी कैफियत मांडली. त्यांत आतांपर्यंत घडत आलेल्या सर्व गोष्टी नमूद केल्या असून इंग्लन्ड, अमेरिका व जपान यांनीं केलेले तह कसे पाळले नाहींत व त्यामुळें पांच हजार वर्षे अखंड स्वातंत्र्याचा उपभोग घेत असलेला कोरिया आज स्वातंत्र्यवंचित कसा झाला आहे, याची अत्यंत हृदय-स्पर्शी अशी करुणकहाणी दिली आहे. तथापि कोरियाकडे अद्याप कोणासही लक्ष देण्यास सवड सांपडली नाहीं व त्यांचे हाल अद्याप सुरूच आहेत. जपानी लोकांचा जाच सहन होत नाहीं म्हणून लक्षावधी कोरियन लोक मँच्यूरियांत गेले. त्यांच्या जमिनी जपानी लोकांस देण्यांत आल्या. याप्रमाणें लक्षावधी एकर सुपीक जमीन जपानी लोकांनीं हिरावून घेतली आहे. कोरियन शिक्षणाच्या शाळा स्वराज्य असतांना दोन हजारांवर होत्या, त्या पार नाहींशा करून त्या जागीं जपानचें शिक्षण देणाऱ्या आठशें शाळा उघडण्यांत आल्या आहेत. मोठमोठ्या पगाराच्या सर्व जागांवर जपानी लोकांची भरती होत असून कोरियन लोक मातीमोल झाले आहेत.

कोरियांत कोरियन संस्कृति नष्ट करण्याचा, एवढेंच नव्हे, जगाच्या नकाशावरून कोरियाचें नांव पुसून टाकण्याचा जपाननें चंग बांधला आहे असें दिसतें. सुमारें पन्नास हजारांवर कोरियन देशभक्त देशभक्तीच्या घोर अपराधाबद्दल तुरुंगांत अनन्वित प्रकारचे हाल सोशीत पडले आहेत.

परवां जपानांत नुकताच धरणीकंप झाला, त्या वेळीं धरणीकंपानंतर कित्येक ठिकाणीं लुटालुटी झाल्या,त्या कोरियन लोकांनींच केल्या अशा संशयावरून क्रुद्ध झालेल्या जपान्यांनीं हजारों कोरियन लोकांची कत्तल उडविली. कोरियांतील स्वातंत्र्याची ज्योत कायम विझवून टाकण्याचा जपानी लोक आपल्याकडून अतिशय प्रयत्न करीत आहेत व नानाप्रकारचीं कारस्थानें रचून देशभक्त कोरियनांच्या त्यांत आहुत्या घेत आहेत !

अशा प्रकारची कोरियाची करुणकहाणी आहे. स्वातंत्र्याचा मार्ग किती बिकट आहे, त्यांत संकटांचे पर्वत कसे आडवे पडतात याची यावरून कल्पना येईल. तथापि त्यांतून मार्ग काढणाराच अंतीं विजयी होतो, अशी इतिहासाची साक्ष आहे व या आत्मोद्धाराच्या चळवळींत शेवटीं कोरियन लोक विजयी होऊन आपली मायभूमि उद्धरतील असा आम्हांस पूर्ण विश्वास आहे.

—६—

# स्वराज्योन्मुख हिंदुस्थान

Home rule is my birth-right and I shall have it.

*Lok. Tilak.*

If the British rulers of India propose to give us mere security of life and property by denying us honour and liberty we must refuse to have them. *There is no life without freedom and there is no freedom without Swarajya or Self-government.*

*Lala Lajpatrai.*

हिंदुस्थानांत परकी सत्ता स्थापन झाल्यास उणींपुरीं दीडशें वर्षे झालीं. मूठभर वणिग्वृत्तीच्या लोकांनीं एका खंडाएवढा विस्तृत, तीस कोटी लोकसंख्येनें गजबजलेला असा अफाट देश आपल्या नियंत्रणाखालीं कसा आणला ही गोष्ट जितकी आश्चर्यजनक तितकीच बोधप्रद खरी, पण ती विवरण करण्याचें हें स्थळ नव्हे.

दास्यासारखी अखिल जगांत अत्यंत दुस्सह अशी गोष्ट नाहीं! तरी त्यांतल्या-त्यांतही क्वचित् प्रसंगीं आर्थिक दास्यांतून मनुष्याला मुक्त होतां येतें, शारीरिक दास्यविमोचनही करतां येतें; तथापि मानसिक-बौद्धिक दास्यांतून सुटका होणें ही गोष्ट मात्र दुरापास्त आहे. हिंदुस्थानांत परकीय सत्तेचे जे अनेक अनर्थावह परिणाम झाले, त्यांत जनतेचें बौद्धिक स्वातंत्र्य नष्ट करण्याचा जो निष्ठुर प्रयत्न करण्यांत आला तो हिंदुस्थानच्या आजपर्यंतच्या इतिहासांत अश्रुतपूर्व असा आहे. 'माझा देश गेला, माझ्या सर्वस्वाचा अपहार झाला, तरी जावत्कालपर्यंत मी मनानें स्वतंत्र-पूर्ण स्वतंत्र-आहें तोंपर्यंत मला माझ्या देशाच्या उद्धाराची आशा आहे व तशी मी खटपटही करणार' अशी प्रेरक बुद्धि मनुष्याच्या अंतः-करणांत जागृत असते तोंपर्यंतच स्वतंत्र होण्याची आशा! परंतु अशा बुद्धीचा अंकुर वाढूंच द्यावयाचा नाहीं किंवा वाढूं लागल्यास तो करपवून टाकण्याचा अट्टहास करावयाचा अशी पाश्चात्य राजकीय मुत्सद्यांची नीति असल्यानें हिंदुस्थानच्या मनावर त्याचें यथाशास्त्र प्रयोग करण्यांत आले व त्याचें इष्ट असें फलही दिसूं लागलें!

एक सत्ता जाऊन तिच्या जागीं सर्वस्वीं परकी सत्ता आपल्या डोक्यावर नाचूं लागली आहे, याची जाणीव अव्वल इंग्रजींत फारच थोड्यांना झाली. परकीय सत्ता सर्व बाजूंनीं आपलें स्वत्व नाहींसें करीत आहे याची कल्पना न झाल्यामुळें अर्थातच तींतून मुक्त होण्याची खटपट होणें दूरच राहिलें. पाश्चात्य विद्येचा बराच प्रसार होईपर्यंत हीच स्थिति कायम होती. आरंभीं राजकीय चळवळ करण्यासाठीं पुणें, कलकत्ता, मुंबई वगैरे ठिकाणीं कांहीं संस्था निघाल्या तरी, पारतंत्र्याची जाणीव जनतेंत उत्पन्न करून देऊन राजकीय मोक्ष साधावयाचा ही कल्पना त्या वेळीं लोकांच्या डोळ्यांपुढें नव्हती. परकीय सत्ताच किती व कशी सुखावह होईल या धोरणानें सर्व प्रयत्न चालले होते; व १८८५ सालीं काँग्रेस स्थापन झाली, तिच्यापुढेंही याहून व्यापक असें ध्येय नव्हतें. हीच स्थिति सन १९०५ सालापर्यंत कायम होती. परंतु तेव्हांपासून ही स्थिति पालटली. हिंदी राजकारणांत सन १९०५ ते १९०८ हा काल संक्रमणावस्थेचा व फार महत्त्वाचा असा गेला.

मध्यंतरीं महाराष्ट्रांत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लोकजागृति करून अमोलिक देशसेवा केली, त्याबद्दल त्यांचें उतराई होणें अशक्य आहे. पाश्चात्य सुधारणेच्या झगझगाटानें शिक्षित वर्ग दिपून जाऊन स्वत्वास पारखा होऊं लागून आत्मवंचना करूं लागला, ही गोष्ट त्या देशाभिमानी वीरास न साहून त्यांनीं अत्यंत तीक्ष्ण अशा लेखनप्रहारानें जनतेच्या बुद्धीवर पडलेलें पाश्चात्य मोहाचें पटल पार फाडून काढलें. शिक्षित वर्गांत एकप्रकारचा उत्साह संचरला, आपणांसही स्वत्व आहे, आपणांसही वैभवशाली असा इतिहास आहे, आसेतुहिमाचल आपणही साम्राज्यें कमाविलीं व उपभोगिलीं आहेत, अर्थात् आपणांस स्वराज्य संपादन करून तें उत्कृष्ट प्रकारें चालवितां येणेंही अशक्य नाहीं, अशी भावना उत्पन्न झाली. जनतेंत विलक्षण जागृति झाली. शास्त्रीबोवानंतर लोकमान्य टिळकांनींही तीच परंपरा अव्याहत अशी चाळीस वर्षें चालवून अखिल भारतवर्षाच्या तोंडून 'स्वराज्य हें माझें ध्येय' ही गोष्ट वदविली. असो.

सन १९०५ पर्यंत हिंदी राजकारण एकमुखी चालत असे. हिंदी राष्ट्रीय सभा हें तें राष्ट्राचें मुख असून, तद्द्वारां हिंदी राष्ट्र राजकीय चळवळी करी! पण १९०५ ते १९०८ या कालांत ही घडी विस्कटून नोकरशाहीचे बगलबच्चे, मवाळ व राष्ट्रीय असे वेगवेगळे राजकीय पंथ निर्माण झाले. बहुजनसमाजाचा पाठिंबा स्वाभाविकपणें राष्ट्रीय पक्षाला होता. या कालांतच हिंदी राष्ट्राचें ध्येय स्वराज्य आहे,

ही गोष्ट प्रथम उच्चारिली गेली; तथापि ती रूढ होण्यास देशांतील पुढाऱ्यांस अनेक हालअपेष्टा, दुस्तर असा कारागृहवास, हद्दपारी वगैरे नानाप्रकारचे जुलूम सोसावे लागले. बंगालच्या फाळणीनें या राष्ट्रजागृतीच्या कार्यास चांगलीच मदत केली. सर्व हिंदुस्थान खडबडून जागा होऊन सर्व लोकांनीं लॉर्ड कर्झनच्या या अन्यायाचा निषेध केला, व एवढ्यावरच न थांबतां, राजकारणांत यशस्वी ठरलेलें बहिष्कार अस्त्र प्रथम त्यावेळीं उपयोगांत आणलें गेलें व तें इतकें प्रभावी ठरलें कीं, अशक्य म्हणून ठरविली गेलेली बंगालची फाळणी रद्द करावी लागली.

याच सुमारास सुरतेची प्रसिद्ध अशी कॉंग्रेस भरली. ती कॉंग्रेस मोडण्याला जीं अनेक कारणें झालीं त्यांत एक प्रमुख कारण म्हणजे हिंदी राष्ट्राचें ध्येय काय असावें यासंबंधीं झालेला मतभेद हें होय! यापूर्वी कलकत्त्याच्या कॉंग्रेस-मध्यें, दादाभाई नवरोजी सारख्या पाश्चात्य राजकारणांत मुरलेल्या मुत्सद्यानें स्वराज्याशिवाय हिंदी राष्ट्राला तरणोपाय नाहीं, हें सूत्र अध्यक्षपदावरून बोलून दाखविलें. व हें ध्येय साध्य करण्यासाठीं, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व बहिष्कार इतक्या चळवळी राष्ट्रीय सभेनें कराव्या अशा सूचनाही केल्या. सुरतेची कॉंग्रेस या ध्येयापासून दूर जाऊं नये अशी राष्ट्रीयपक्षाची तळमळ, तर मवाळवर्गाला इतक्या लांब पल्ल्याची उडी इतक्यांतच मारूं नये असें वाटे. राष्ट्रीय सभा म्हणजे हिंदी राष्ट्रांच्या आकांक्षा खुल्या दिलानें व्यक्त करणारी व साध्य करण्याचा प्रयत्न करणारी संस्था असा राष्ट्रीय पक्षाचा आग्रह! परंतु तत्कालीं तरी मवाळपक्ष जोरावर असल्यानें राष्ट्रीयपक्ष कांहीं काळपर्यंत राष्ट्रीय सभेंतून अलिप्त राहिला व मवाळ पक्षानें आपलें प्रतिगामी धोरण कांहीं काळपर्यंत तसेंच चालू ठेविलें!

परंतु क्षुब्ध झालेलें लोकमत तेवढ्यानें शांत झालें नाहीं. बंगालमधील कांहीं तरुणांनीं अत्याचारासारख्या मार्गाचा अवलंब करून अनेक गुप्त कट उभारले; व त्यांच्या जोरावर ब्रिटिश सत्ता उलथून पाडण्याचा प्रयत्न केला पण तो प्रयत्न अयशस्वी ठरून उत्कट देशभक्तीनें प्रेरित झालेले अनेक तरुण मृत्युमुखीं पडले, शेंकडों तरुणांना कारागृहवास सोसावा लागला; व कित्येकांना हद्दपार व्हावें लागलें. इतिहासांत अलिपूर बॉंब प्रकरण व माणिकतोळा प्रकरण या नांवानें या गोष्टी प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रांत अशाच प्रकारचा प्रयत्न करण्यांत आला व तो नाशिक प्रकरण म्हणून लोकविश्रुत आहे. हा प्रयत्नही अयशस्वी ठरून महाराष्ट्रांतील अनेक तरुणांना नाना-प्रकारच्या हालअपेष्टा, कारागृहवास, हद्दपारी, फांशी वगैरे शिक्षा भोगाव्या लागल्या.

यानंतर सरकारनें आपलें ठेवणींतील दडपशाहीचें अस्त्र बाहेर काढलें. पंजाबचा सिंह लाला लजपतराय यांस आकस्मिकपणें उचलून कोठें अज्ञात ठिकाणीं हद्दपार करण्यांत आलें. महाराष्ट्रांत लोकमान्य टिळकांवर सरकारची वक्रदृष्टि फिरून त्यांजवर राजद्रोहाचा आरोप ठेवण्यांत आला व त्यावरून त्यांस साडेसहा वर्षांची शिक्षा देण्यांत येऊन मातृभूमीपासून दूर अशा ठिकाणीं बंदिवासांत ठेवण्यांत आलें. वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा थैमान घालूं लागला, शेंकडों वृत्तपत्रें त्यास बळी पडलीं. खुल्या दिलानें राष्ट्रीय हिताची एकादी गोष्ट बोलणेंही अशक्य झालें, परंतु सरकारनें अशा प्रकारें लोकमत दडपून टाकण्याचे नानाप्रयत्न केले, तरी लोकमत त्यामुळें शांत झालें नाहीं. परसत्तेचा जांच लोकांस पूर्णपणें जाणवूं लागून स्वराज्याखेरीज लोक शांत होणें शक्य नव्हतें. त्या वेळीं नोकरशाहीनें स्वराज्यज्योतीवर दडपशाहीची राख पसरली तरी ती पूर्णपणें विझून न जातां तशीच धुमसत राहिली. परंतु देशांतील लोकनायक नोकरशाहीच्या रोषामुळें कांहीं काळ तरी मातृभूमीस पारखे झाले असल्यानें-लो० टिळक यांस मंडालेस अटकेंत टाकलें होतें, लालाजीस मातृभूमीस येणें अशक्य-प्राय झाल्याकारणानें त्यांनीं अमेरिकेंत वास केला, बाबू अरविंद घोष यांनीं राजसंन्यास घेऊन ते पांडिचरीस तपश्चर्या करीत बसले, सुरेंद्रादि मंडळी एके काळीं राष्ट्रीय चळवळीचे अध्वर्यू गणलीं गेलीं होतीं त्यांचा या दिव्यांत निभाव न लागून ते मवाळ कंपूंत सामील होण्याच्या तयारीस लागले. एकंदरीनें सन १९०८ पासून १९१४ हा काळ बऱ्याच अंशीं नाउमेदीचा असा गेला. परंतु लो० टिळकांनीं जें तत्त्वज्ञान जनतेपुढें मांडलें होतें तें जिवंत चैतन्यमय असें असल्यानें, त्यांनीं उत्पन्न केलेली स्वराज्याची कल्पना नष्ट न होतां ती सुप्तावस्थेंत कां होईना, पण जीव धरून होती. लोकांत उत्पन्न झालेला असंतोष कमी न होतां तो वाढीसच लागूं लागल्याचें पाहून, धूर्त अशा नोकरशाहीनें मोर्ले मिंटो-सारख्या सुधारणांचा तुकडा लोकांच्या तोंडावर टाकून दिला.

सन १९१४ नंतर हिंदी राजकारणांत बरीच उत्क्रांति झाली. लो० टिळक आपला सहा वर्षांचा कष्टतर बंदिवास भोगून परत आले, त्यानंतर लागलीच युरोपांत महायुद्धाचा वणवा पेटून ब्रिटिश साम्राज्यही त्यांत समाविष्ट झालें. महायुद्धांत सामील होतांना ब्रिटिश मुत्सद्यांनीं जीं अनेक कारणें जाहीर

जाहीर केलें; शिवाय साम्राज्याला महायुद्धांत मदत करण्यासाठीं हिंदुस्थानानें आपल्या शक्तीच्याबाहेर द्रव्यबल व मनुष्यबल दिलें. या सर्व गोष्टींचा फायदा घेऊन सहा वर्षांपूर्वी जबरदस्तीनें दडपून टाकलेली जनतेची स्वराज्याची आकांक्षा पुनः नेटानें पुढें मांडण्याचें ठरवून त्याप्रमाणें केवळ स्वराज्याचीच चळवळ करण्यासाठीं सन १९१६ सालीं बेळगांव येथें लो॰ टिळक यांनीं 'हिंदी स्वराज्यसंघ' स्थापन केला. सन १९१४ पासून हिंदी राजकारणाचा इतिहास म्हणजे लो॰ टिळकांच्या चळवळीचा इतिहास होय! बंधमुक्त झाल्यापासून देह ठेवीपर्यंत लो॰ टिळकांनीं अखिल हिंदुस्थानांत स्वराज्याची चळवळ करून सर्व देश हालवून सोडला. अर्थात् १९१४ सालानंतरच्या चळवळीचा इतिहास म्हणजे लोकमान्यांच्या चळवळीचाच इतिहास असल्यानें त्यांचाच प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. बेळगांव येथें प्रांतिक परिषदेच्या बैठकीसाठीं महाराष्ट्रांतील सर्व पुढारी जमले असतांच तेथें कॉंग्रेसमध्यें शिरण्याचाही ठराव पास होऊन आतांपर्यंत कॉंग्रेसपासून अलिप्त राहिलेल्या राष्ट्रीय पक्षानें तींत घुसून तेथें आपलें मताधिक्य करून कॉंग्रेसच्या तोंडानें हिंदी लोकांच्या खऱ्याखुऱ्या आकांक्षा वदविण्याचा निश्चय ठरला. व त्याच वेळीं स्वराज्यसंघाचीही प्राणप्रतिष्ठा झाली. लो॰ टिळकांनीं हें धडाडीनें पाऊल टाकलें तरी अद्यापिही 'स्वराज्य' शब्द जाहीरपणें उच्चारणें ही गोष्ट फार कठीण होती. स्वराज्यसंघाचे उद्देश समजावून देण्यासाठीं लो॰ टिळकांनीं बेळगांव व नगर येथें जीं व्याख्यानें दिलीं तीं नोकरशाहीला भयंकर राजद्रोहाच्या स्वरूपाचीं वाटून लो॰ टिळकांवर एकदम नोटिसा काढून चाळीस हजारांचे दोन जामीन त्यांजकडे मागण्यांत आले. याच-वेळीं लो॰ टिळक यांनीं आतांपावेतों जी अपूर्व देशसेवा केली त्याबद्दल त्यांचें उतराई होण्यासाठीं अखिल महाराष्ट्रानें त्यांस एक लक्ष रुपयांची थैली अर्पण केली. अखिल हिंदुस्थानांत अशा प्रकारचा हा पहिलाच समारंभ होय. जनता याप्रमाणें लोकमान्यांचे जयजयकार करीत आहे तों नोकरशाहीनें त्यांवर नवीनच खटल्याची उभारणी केल्याचें वर सांगितलेंच आहे. त्यांतही लो॰ टिळक आपल्या नेहमींच्या धैर्यानें नोकरशाहीशीं लढून शेवटीं स्वराज्याची मागणी करणें यांत गैरसदनशीरपणा नसून त्याप्रमाणें ती मागणी करावयाचा कोणाही प्रजा-जनास हक्क आहे असें नोकरशाहीच्या तोंडून त्यांनीं वदविलें.

आज स्वराज्य शब्द उच्चारणें सहज सुलभ झालें आहे. कोणीही तो उच्चा-

रावा. परंतु हा शब्द सामान्य जनतेच्या अंतःकरणापर्यंत बिंबविण्यासाठीं लोकमान्यांस किती कष्ट पडले, किती देहदंड सोसावा लागला, आपलें आयुष्य त्यापायीं कसें वेचावें लागलें, स्वकीयांकडूनही पदोपदीं त्यांच्या मार्गांत संकटांचे पर्वत कसे रचले जात, याची आठवण कित्येक लोक विसरतात ! आज मवाळही स्वराज्य हेंच आमचेंही ध्येय आहे, असें मुक्तकंठानें म्हणत आहेत व खुद्द बादशहाही, हिंदुस्थानला स्वराज्य देणें हेंच आमचें ध्येय आहे, असें जाहीर करतात; परंतु त्यांच्या तोंडून हे शब्द वदविण्यास किती देशभक्तांस काय मोलाचा स्वार्थत्याग करावा लागला, इकडे दुर्लक्ष होतां उपयोगी नाहीं. एकाद्या सुंदर, फलदायी वृक्षाचें रोपटें लावल्यावर त्याची प्रथम निगा राखणाराचेंच महत्त्व असतें. वृक्ष जोराला लागल्यावर वर्षाऋतूंतील वर्षावापेक्षां त्याला जास्त जीवनाची गरजच उरत नाहीं.

लो० टिळकांनीं याप्रमाणें स्वराज्याची चळवळ करण्यासाठीं स्वराज्यसंघाची प्राणप्रतिष्ठा केली तरी संघाचें ध्येय कॉंग्रेसच्या ध्येयापासून भिन्न नव्हतें. कॉंग्रेसचें प्रत्यक्ष काम करण्यासाठीं एक नवीन पूरक अशी संस्था त्यांनीं काढिली इतकेंच. यानंतर त्यांनीं अत्यंत महत्त्वाचें असें केलेलें काम म्हणजे लखनौ कॉंग्रेसमध्यें घडवून आणिलेली हिंदुमुसलमानांची एकी ! राष्ट्राचें ध्येय साधण्यास राष्ट्रांत एकजूट असावी लागते, त्याखेरीज उद्दिष्ट साध्य होणें फार प्रयासाचें काम आहे, हें जाणून लो० टिळकांनीं राष्ट्रांतील हिंदु व मुसलमान या ज्या प्रमुख जाती त्यांचें ऐक्य घडवून आणलें. 'फोडा व झोडा' त्या नीतीवर आजपर्यंत नोकरशाही आपला कारभार चालवीत असे व त्याचसाठीं मुसलमानवर्गाला हातीं धरून, हिंदी राष्ट्राच्या आकांक्षा दडपून टाकण्याचा प्रयत्न केला जाई. लोकमान्यांनीं महत्प्रयासानें लखनौ येथें मुसलमान पुढाऱ्यांची समजूत पाडून त्यांस राष्ट्रीय सभेंत सामील करून घेतलें व ऐक्याचा दुवा सांधून घेतला !

याच सुमारास म्हणजे ता. २० ऑगस्ट १९१७ रोजीं हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें हें साम्राज्य सरकारचें ध्येय आहे, असें बादशहांच्या वतीनें भारतमंत्र्यांनीं जाहीर केलें.

यानंतर लोकमान्यांनीं स्वराज्यमतप्रसारार्थ अखिल भारतवर्षांत मोहीम काढून कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत व कराचीपासून कलकत्त्यापर्यंत, निर्जन

स्वराज्य पाहिजे, स्वराज्य हा जनतेचा जन्मसिद्ध हक्क आहे,' या घोषाचा जयध्वनि पसरून दिला. लोकमान्यांनीं स्वराज्याच्या ज्या मोहिमा काढिल्या, त्या प्रसंगीं त्यांच्या सर्वत्र निघालेल्या मिरवणुकी, त्यांचे झालेले जयजयकार व लोकांच्या अंतःकरणापर्यंत नेऊन भिडविलेली स्वराज्याची कल्पना, या गोष्टींचीं दृश्यें ज्यांनीं पाहिलीं असतील, त्यांना लोकमान्यांच्या चळवळीचें स्वरूप सहज समजेल. दिल्ली, आग्रा, अमृतसर, कलकत्ता, कराची, लखनौ, मुंबई, पुणें, नागपूर, मद्रास वगैरे ठिकाणीं त्यांचा झालेला जाहीर सत्कार, त्यांस मिळालेलीं सहस्रावधि मानपत्रें, त्यांच्या व्याख्यानांस लोटत असलेला अफाट जनसंमर्द, सहस्र कंठांतून एकसमयावच्छेदेंकरून 'लो॰ टिळक महाराजकी जय' म्हणून होत असलेला जयजयकार हें पाहण्याचें भाग्य ज्यांना लाधलें, त्यांना या हिंदवीरानें जनतेच्या अंतःकरणावर काय प्रभाव गाजविला होता याची कल्पना येईल. रेल्वेमार्गापासून फार दूर अशा पन्नास पाउणशें कोसांवरून टिळक महाराजांचें दर्शन घेण्यासाठीं रस्त्याच्या कडेला बसलेली, दमून गेलेली भाविक मंडळी पाहिली म्हणजे या हिंदुस्थानच्या अनभिषिक्त बादशहावर जनतेचें प्रेम कशा प्रकारचें होतें, याची कल्पना येते. रामराय वनवासांतून आल्यावर अयोध्येच्या नागरिकांनीं त्यांचें कशा प्रकारचें स्वागत केलें असेल, त्याची कल्पना लोकमान्यांच्या स्वराज्य मोहिमेच्या वेळीं बरोबर अजमावतां आली, व नोकरशाहीनें नानाप्रकारानें दडपशाही करून स्वराज्याची कल्पना रुजूं न देण्याबद्दल वाटेल तसा अट्टहास केला, तरी लोकमान्यांनीं स्वराज्याची कल्पना लोकांच्या अंतःकरणांत इतकी बद्धमूल करून टाकिली कीं, यापुढें लोकांची आकांक्षा दाबून ठेवणें नोकरशाहीलाही अशक्य वाटून हिंदी लोकांचें म्हणणें खरें काय, तें ऐकण्यासाठीं भारतमंत्री मि. मॉंटेग्यू यांची इकडे रवानगी केली.

मॉंटेग्यूसाहेब हिंदुस्थानांत आले, हिंदी राष्ट्रीय सभा, हिंदी स्वराज्य संघ वगैरे अखिल भारतवर्षीय संस्थांची मागणी काय, हें त्यांनीं ऐकून घेतलें; सर्व हिंदुस्थानभर हिंडून प्रांतानिहाय सर्व जबाबदार राजकीय संस्थांचें म्हणणेंही त्यांनीं ऐकून घेतलें व आले त्याप्रमाणें तोंड न हालवितां ते परत गेले. राष्ट्रीय सभा व स्वराज्य संघ यांनीं आपल्या मागणींत प्रांतिक सरकारांस पूर्ण स्वातंत्र्य व वरिष्ठ कौन्सिलांत लोकपक्षाचें मताधिक्य असून तो कारभारही लोकमतानें चालावा अशी मागणी केली होती. स्वराज्य संघ एवढी मागणी

करूनच स्वस्थ बसला नाहीं, तर आपल्यामागें लोकसंमतीही आहे, हें सिद्ध करण्यासाठीं लक्षावधीं लोकांच्या सह्यांचा अर्जही तयार करून, त्यांत स्वराज्याची मागणी करून संघानें तो मॉटेग्यूसाहेबांना सादर केला.

हिंदुस्थानानें महायुद्धांत साम्राज्याला केलेली अमोलिक मदत, बादशहांनी हिंदुस्थानाला स्वराज्य देणें हें आमचें ध्येय आहे असें दिलेलें जाहीर आश्वासन स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा झालेला उदय व छोट्या राष्ट्रांच्या रक्षणासाठीं आम्ही महायुद्धांत उडी घातली हा ब्रिटिश मुत्सद्यांचा जाहिरनामा, वगैरे कारणांनी हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्याचे जरी नाहींत तरी स्वराज्याच्या जवळचे हक्क मिळाल्याखेरीज राहणार नाहींत, अशी येथील जनतेची सामान्य समजूत होती व खुद्द विलायतच्या लोकांपुढें आपली स्वराज्याची मागणी केल्यास ती अगदींच निष्फळ होणार नाहीं असें जाणून, हिंदी स्वराज्य संघाचे अध्यक्ष बॅ. बॅप्टिस्टा यांस युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत विलायतेंत त्या कामगिरीवर रवाना केलें त्यांनीं परिस्थित्यनुरूप आपली कामगिरी योग्य प्रकारें बजाविली. त्यानंतर लागलीच हिंदी राष्ट्रीय सभा, हिंदी स्वराज्यसंघ, मवाळमंडळ यांची शिष्टमंडळेंही विलायतेस रवाना झालीं.

हीं शिष्टमंडळें जाण्यापूर्वीच हिंदी स्वराज्यसंघाचें शिष्टमंडळ विलायतेस जाण्यास कोलंबोमार्गानें रवाना झालें होतें. शिष्टमंडळ जाण्यास सरकारची लागणारी योग्य ती परवानगी, पासपोर्ट वगैरे सर्व देण्यांत आले. कोलंबोमार्गानें शिष्टमंडळाचा अपूर्व असा सत्कार करण्यांत येऊन हिंदुस्थानच्या वतीनें मोठ्या प्रेमभावानें त्याला निरोपही देण्यांत आला. त्याप्रमाणें शिष्टमंडळ कोलंबोस जाऊन पोहोंचलें व उद्यां विलायतेस निघणार इतक्यांत हिंदुस्थानसरकारच्या व विलायत सरकारच्या हुकुमावरून शिष्टमंडळास पुढें जाण्यास मनाई करण्यांत आली. लोकांत अत्यंत असंतोष उत्पन्न झाला. सरकारच्या या कृत्याचा सर्वत्र धिःकार करण्यांत आला. तेव्हां सरकारला आपली चूक उमगून कांहीं काळानें शिष्टमंडळास विलायतेस जाण्याची पुनः परवानगी देण्यांत आली. शिष्टमंडळें विलायतेंत पोहोंचतात तोंच महायुद्धही समाप्त होऊन विलायतेंत आनंदोत्सव चालू होते. या आनंदाच्या मंगल प्रसंगीं हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्याकडे विलायतेंतील मुत्सद्यांचें सहानुभूतिपर लक्ष लागेल अशी आशाही उत्पन्न झाली; व त्याप्रमा

प्रत्येक शिष्टमंडळानें हिंदी राष्ट्राची मागणी काय आहे, हें स्पष्ट व निर्भीडपणानें तेथें पार्लमेंटरी कमिटीपुढें मांडलें.

याखेरीज विलायतेंत व्याख्यानद्वारां, वर्तमानपत्रांतून, मुलाखती घेऊन, हिंदी लोकांच्या मागण्या काय आहेत, ब्रिटिश अमलापासून हिंदुस्थानची स्थिति कशी झाली आहे यासंबंधानें हजारों हस्तपत्रकें काढून विलायतेंत वाटलीं. पार्लमेंटच्या प्रत्येक सभासदास हिंदी राष्ट्राचें मागणें तरी काय आहे, याची माहिती देण्यासाठीं एक कैफियत काढून वांटली. एवंच, चळवळ करण्याचे आधुनिक राजकारणांत सनदशीर गणले गेलेले सर्व उपाय तेथें करण्यांत आले. या बाबतींत हिंदी राष्ट्राचें म्हणणें प्रे० विल्सन यांच्या कानांवर घालण्यासाठीं पारीस येथें जाण्याबद्दल लो० टिळक यांनीं परवानगी मागितली असतां ती त्यांस देण्याचें नाकारण्यांत आलें.

शिष्टमंडळाचें विलायतेंत काम चाललें असतांना येथें स्वराज्यजागृतीचें कामही मोठ्या उत्साहानें व नेटानें चाललें होतें. वर्तमानपत्रें, व्याख्यानें, हस्तपत्रकें यांना तर पूर लोटला; व लोकमान्यांनीं उपदेशिलेल्या स्वराज्यतत्त्वाचीं पाळें-मुळें जनतेच्या अंतःकरणांत खोल जाऊन रुजलीं. शिष्टमंडळें विलायतेहून परत आल्यावर लोकांकडून त्यांचा अपूर्व सत्कार करण्यांत आला. शिष्टमंडळाच्या कामगिरीवर लो० टिळक गेले असतां हिंदुस्थानच्या हितासाठीं परदेशांत जोरानें खटपट केली पाहिजे असा त्यांस अनुभव आला. व त्याप्रमाणें विलायतेंत राष्ट्रीय सभेचें 'इंडिया' पत्र याची त्यांनीं पुनर्घटना करून हिंदी हितसंबंधाला सर्वस्वी पोषक अशीच चळवळ त्यांतून केली जाईल अशी व्यवस्था केली. त्यांनीं कॉंग्रेसला शिष्टमंडळाच्या कामाचा अहवाल सादर केला त्यांतही परदेशी चळवळ करण्याची किती आवश्यकता आहे, व ती काय पद्धतीनें केली पाहिजे याचें साद्यंत विवरण केलें असून ते विद्यमान असेतोंपर्यंत त्यांनीं आपल्या हेतूप्रमाणें विलायतेंत चळवळ चालविलीही.

याप्रमाणें स्वदेशांत व परदेशांत स्वराज्याची चळवळ पूर्ण सनदशीर व शांत मार्गानें चालली असतां, युद्धांत हिंदुस्थानानें आपल्या शक्तीबाहेर मदत केली असतां, सैन्यभरतीच्या कामीं सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून अनेक प्रकारचे जुलूम होत होते. महायुद्धामुळें इतर नानाप्रकारच्या आपत्ति देशावर कोसळत होत्या त्याप्रमाणेंच देशांत अतिशय महर्गताही झाली गोरगरीबांचे फारच हाल होऊं लागले. जनता पूर्ण शांततेनें चळवळ करीत असतां नोकरशाही, लोक-

जागृति दडपून टाकण्याचा आपणांकडून सर्व प्रकारे प्रयत्न करीत होती. युद्धाच्या ऐन भराच्या वेळीं हिंदी लोकांना खूष करण्यासाठीं बादशहाच्या वतीनें भारत-मंत्र्यांनीं जें आश्वासन हिंदुस्थानला दिलें त्याची पूर्तता, युद्ध संपतांच करण्याबद्दल हिंदी जनता चळवळीची पराकाष्ठा करील अशी नोकरशाहीला योग्य प्रकारें कल्पना होतीच. व महायुद्धांत दोस्तराष्ट्रांस आकस्मिकपणें, अकल्पनीय असा विजय मिळाल्यानें येथील नोकरशाही जास्तच उन्मत्त झाली असल्यास त्यांत आश्चर्य काय! आपला तात्कालिक स्वार्थसाधण्यासाठीं नोकरशाहीनें वाटेल तशीं भरमसाट आश्वासनें दिलीं असलीं तरी पूर्वानुभवाप्रमाणें तीं किसपत सफल होतील याविषयीं हिंदी लोकही साशंक होते. व नोकरशाही अत्यंत धूर्त असल्यानें स्वराज्याविषयीं होणारी चळवळ दडपून टाकण्यासाठीं तिनें आपल्या हातीं एक हुकुमी असें नवें अस्त्र तयार करण्याचें ठरवून त्याच्या सिद्धीसाठीं एक कमिशन बसविलें व रौलट ॲक्ट नांवाचा एक कायदा या कमिशननें सुचविला व तो मार्च १८ सन १९१९ सालीं पसार झाला. हा कायदा कायदेमंडळापुढें येतांच पं. मदन मोहन मालवीय, मझरूल हक्क जिन्हा यांनीं राजीनामेच दिले, व बाकीच्या सर्व हिंदी सभासदांनीं एकमतानें या कायद्याचा निषेध केला. तरी कौन्सिलांत सरकारी नोकरांचेंच मताधिक्य असल्यानें सरकारनें तो हिंदी लोकांवर लादलाच!

राज्यक्रान्तिविषयक व राजद्रोहाच्या स्वरूपाच्या चळवळी तात्काळ बंद करतां याव्या यासाठीं सरकारच्या हातीं अनियंत्रित असें शस्त्र या कायद्यानें दिलें. या कायद्यानें कोणाचीही विना चौकशी किंवा आरोपीला बचावाची संधीही न देतां व निकालावर अपील करण्याला परवानगीही न देतां गुप्तपणें चौकशी करण्यांत येई, असें पंजाबमध्यें हा कायदा सुरू करण्यांत आल्यावर तेथें जी विकट व अनर्थावह स्थिति निर्माण करण्यांत आली त्यावरून दिसून आलें. मनुष्याचे निसर्गसिद्ध हक्क पूर्णपणें या कायद्यानें तुडवून टाकण्यांत आले. हिंदुस्थाननें एकमुखानें या जुलमी कायद्याचा धिक्कारपूर्वक निषेध केला, व ता. ६ एप्रिल या दिवशीं सर्व हिंदुस्थानांत अत्यंत कडक असा हरताळ पाडण्यांत येऊन त्या दिवशीं सर्व व्यवहार बंद ठेवण्यांत आले. प्रत्येक शहरात जाहीर सभा भरवून या कायद्याचा निषेध करण्यांत आला. हिंदुस्थानांतील इतर ठिकाणांप्रमाणेंच सर्व पंजाबप्रांतभरही हा हरताळ यशस्वीपणें व शांततापूर्वक पाळण्यांत आला. परंतु सर-

काळ्या कृत्यांबद्दल जनतेनें एकमुखानें केलेला निषेध नोकरशाहीला न खपून या शांत चळवळींतही तिला राजद्रोहाचें पिशाच थैमान घालीत असल्याचा संशय येऊन तिचें मन अस्वस्थ झालें.

मिषाखालीं तिनें पंजाबभर थैमान घातलें.

अमृतसर येथें डॉ॰ सत्यपाल व डॉ॰ किश्लु या हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या खटपटीनें हा हरताळ अत्यंत यशस्वीपणें पाळला गेला. त्याबरोबर नोकरशाहीनें नोटिशा काढून डॉ॰ सत्यपाल, किश्लु, पं॰ कोटुमल, पं॰ दीनानाथ, स्वामी अभयानंद यांस भाषणबंदी व वृत्तपत्रांत लेख लिहिण्याचीही बंदी करण्यांत आली. इतकें झालें तरी जनतेनें हरताळ कडकपणें पाळलाच व ता. ९ एप्रिलरोजीं रामनवमीचा दिवस असल्यानें त्या दिवशीं जंगी मिरवणूक निघाली. त्या सालीं मुसलमान वर्गही त्यांत सामील झाल्यानें तो समारंभ अवर्णनीय असाच झाला. सर्व समारंभ शांततापूर्वक पार पडला. परंतु नोकरशाहीला हा इष्ट प्रकार पाहवला नाहीं. तिनें डॉ॰ सत्यपाल व डॉ॰ किश्लु या दोघांसही एकदम पकडून कोठें अज्ञात अशा ठिकाणीं नेऊन ठेवलें. सर्व शहर माणसांनीं लोक जमून तेथे कमिशनरच्या बंगल्यावर जाण्यास निघाले. ते डे. कमिशनरकडे उभय पुढाऱ्यांच्या सुटकेबद्दल अर्ज करण्यास जात असतां त्यांस एकदम गराडा घालून लष्करी सैन्याकडून बंदी करण्यांत आली. लोकमत अगोदरच अगदीं क्षुब्ध झालेलें, त्यात आपली न्याय्य मागणी करण्यासाठीं जात असतां लावलेला प्रतिकार त्यांस खपला नाहीं. ते तसेच जाऊं लागतांच त्यांवर लष्करानें एकदम गोळ्या झाडल्या. त्यांत पुष्कळच लोक जखमी झाले व कांहीं मेले; यामुळें लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें. आणि या क्षुब्ध मनोवृत्तींत अमृतसरांतील कांहीं अविवेकी लोकांच्या हातून कांहीं अत्याचार घडले. पण त्या अत्याचाराच्या मानानें लोकांवर इतके भयंकर निघृण अत्याचार करण्यांत आले कीं, कोणत्याही सुधारलेल्या राज्यपद्धतीस त्यामुळें कलंकच लागेल !

निष्कारण लोकांवर असा जुलूम करून त्यांचे पुढारी अटक करून न्याव्हें ही गोष्ट लोकांस न रुचून या कृत्याचा निषेध करण्यासाठीं ता. १३ रोजीं जालियनवालाबागेंत जाहीर सभा भरण्याचें ठरलें. तत्पूर्वी अमृतसर येथील कारभार जनरल डायर या लष्करी अधिकाऱ्याच्या हातीं सोंपविण्यांत आला होता. अर्थात् त्यांनीं लष्करी पेशाप्रमाणें तेथें खराखुरा अंमल गाजविला. जालियनवालाबागेला प्रवेशद्वार एकच असून सभेसाठीं सुमारें वीस हजार लोक जमले

असतां त्या द्वारावर एक चिलखती मोटार व आंतील बाजूस सुमारें पन्नास लष्करी लोक नेऊन उभे केले. व लोकांस तेथून निघून जाण्यास संधीही न देतां एकदम गोळीबारास सुरुवात केली. सभेस लहान बाळगोपाळही बरेच आले होते. परंतु गोळीबारांत त्यांसुद्धां शेंकडों लोकांची आहुती पडली. शेंकडों जखमी होऊन पडले. पण डायरची रक्तपिपासा एवढ्यानेंही न थांबून त्यानंतर त्यानें धरपकडीचें सत्र सुरू केलें. जाहीर रीतीनें लोकांस फटके देण्यांत आले. मिस् शेरवुडवर ज्या गल्लींत हल्ला झाला तेथून जाणाऱ्या प्रत्येक इसमास पोटावर सरपटून जावें लाग. शहरांतील प्रतिष्ठित लोकांची अत्यंत अप्रतिष्ठा करण्यांत आली. कबुली मिळविण्यासाठीं अनुचित असा जुलूम करण्यांत आला. असेच प्रकार तारण-तारण, लाहोर, कासुर, गुजराणवाला, वझिराबाद, निझामाबाद, अकालगड, रामनगर, हाफिझाबाद, संगलाहिल, मनियानवाला, नवानपिंड, चुहरखाना, शेखपुरा, लयालपूर, गुजरात, जलालपूर जलन, मलाकवाला वगैरे ठिकाणीं व या गांवांच्या भोंवतालच्या अनेक ठिकाणीं 'शांतता, सुव्यवस्था व कायदा' या नांवाखालीं जे अनन्वित प्रकार करण्यांत आले त्यामुळें कोणाच्याही अंगावर शहारे आल्याखेरीज राहणार नाहींत. या प्रकरणांची चौकशी करण्यासाठीं कॉंग्रेसनें नेमलेल्या कमिटीनें जो साक्षीपुरावा गोळा केला आहे त्यामुळें वस्तुस्थितीवर उत्कृष्ट प्रकाश पडतो. या दुष्ट कृत्यांची चौकशी करण्यासाठीं सरकारनेंही हंटर-कमिशन म्हणून एक कमिशन नेमिलें; त्यांतही लष्करी अमलाखालीं ओडवायर-डायरप्रभृतींनीं लोकांवर किती जुलूम केले, याची सांगोपांग हकीगत आली आहे. परंतु नोकरशाहीच्या हातून वाटेल तसे अन्याय घडले असतां ते उचलून धरण्याची सरकारची नेहमींचाच प्रवृत्ति असल्यानें लोकांच्या मागणीप्रमाणें या प्रकारांतील अन्यायी लोकांचें शासन न करतां त्यांची एकप्रकारें बडेजावीच झाली. व अशा रीतीनें लोकमत सरकारनें पुनः पायाखालीं तुडवून टाकलें ! !

नंतर लोकांनींही आपल्या राजकीय हक्कांच्या मागणींबरोबर पंजाबच्या अन्यायांना प्रमुखस्थान दिलें. व नोकरशाहीच्या जुलुमाचें जिवंत स्मारक म्हणून जालियनवाला बाग हिंदी राष्ट्रानें सुमारें पांच लक्ष रुपयांस खरेदी करून हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या झगड्याचें स्मारक उभारिलें. अशा प्रकारचे अत्यंत गर्हणीय अन्याय केल्यानंतर थोड्याच दिवसांत हिंदी राजकारणांत प्रसिद्धीस आलेल्या मॉंटेग्यू-

चेम्सफर्ड सुधारणा बाहेर पडल्या ! फार दिवस गाजावाजा झालेल्या या सुधारणांत केवळ भुशाखेरीज कांहींच नसल्यानें हिंदी लोकमत जास्तच क्षुब्ध झालें. व त्यानंतर भरलेल्या अमृतसर येथील राष्ट्रीय सभेंत जनतेनें सुधारणा अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक आहेत असा त्यांवर शिक्का मारला. हिंदी लोकांच्या आकांक्षांवर अशा प्रकारें पाणी ओतलें गेलें तरीही प्रतियोगी-सहकारिता म्हणून त्या सोडूं नका, असा लोकमान्य टिळकांचा आग्रह होता. हातीं सांपडेल त्याचा उपयोग आपल्या फायद्याकडे करा, हा अत्यंत मुत्सद्देगिरीचा व शहाणपणाचा त्यांचा उपदेश होता. अमृतसर काँग्रेसमध्यें त्या स्वीकाराव्या किंवा नाहीं त्याचा अखेर निर्णय न होतां कलकत्ता येथें काँग्रेसचें जादा अधिवेशन भरवून तेथें निर्णय करावा असें ठरलें. परंतु लो॰ टिळकांनीं दूरदर्शीपणानें या सुधारणांचा आपल्या चळवळीस पोषक अशा प्रकारें उपयोग करून घेण्याचें ठरवून त्यासाठीं ‘काँग्रेस-लोकशाही पक्ष’ नांवाचा पक्ष स्थापन केला; व त्या पक्षाच्या द्वारें निवडणुकी लढवून सुधारलेलीं कौन्सिलें हस्तगत करण्याचें ठरविलें. पण मध्यंतरीं एक अकल्पनीय अशी गोष्ट घडून आल्यानें हिंदी राजकारणाची दिशा सर्वस्वीं बदलली.

विलायतेंतील शिष्टमंडळाचें काम आटोपून लो॰ टिळक हिंदुस्थानांत परत आले; परंतु तेव्हांपासून त्यांनीं एक पळही विश्रांति न घेतां देशांतील निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन, त्यांच्याशीं विलायतेंतील कामाबद्दल चर्चा करून व पुढील कार्याचें निश्चित धारण काय असावें याविषयीं वाटाघाट करून स्वराज्याचा गाडा पुढें ओढण्याची खटपट चालविली होती त्यासाठीं त्यांना अखिल हिंदुस्थानांत ठिकाणीं प्रवास करावा लागला, अनेक कष्ट सोसावे लागले, त्याचा परिणाम त्यांच्या वार्धक्यग्रस्त तनूवर होऊन जुलै १९१९ मध्यें ते साधारण आजारी पडले. परंतु त्या वेळीं प्रकृती विशेष काळजी करण्यासारखी वाटली नाहीं. आजारी असतांच कांहीं खासगी कामासाठीं ते मुंबईस गेले असतां तेथें कामाची विशेष दगदग पडल्यानें ते जास्तच आजारी झाले व त्यांच्या प्रकृतीनें एकाएकीं उलट खाऊन मानवी प्रयत्नांची शिकस्त चालली असतांही ते ता. १ आगस्ट रोजीं दिवंगत झाले!

लोकमान्यांनीं आजन्म केलेली अलौकिक देशसेवा, त्यासाठीं सोसलेले अत्यंतिक कष्ट व जनतेच्या दृष्टिपथांत आणून ठेवलेलें ध्येय—स्वराज्य, यामुळें जनतेच्या

हृदयसिंहासनावर त्यांचीं मूर्ति केव्हांच अधिष्ठित झाली होती. हिंदी राजकारणाला दर दिवसाला वेगळाच रंग चढूं लागल्यानें लोकमान्यांच्या मृत्यूनें अखिल राष्ट्राची झालेली हानी भरून येण्यास फार काळ लोटावा लागेल! लोकमान्यांच्या राजकारणांतील मुख्य विशेष हा कीं, जनतेस ते आपल्या बरोबर घेऊन जात; व त्यामुळेंच ते खरेखुरे लोकनायक होते. लोकमान्यांच्या मृत्यूनंतर जनतेनें त्यांचा केलेला अपूर्व सत्कार त्यांच्या देहाची काढलेली प्रचंड मिरवणूक, त्यांच्या दर्शनासाठीं जमलेला अलोट जनसंमर्द, वगैरे गोष्टी प्रत्यक्ष पाहण्याचें भाग्य ज्यांना लाभलें त्यांना या हिंदुस्थानच्या अनभिषिक्त बादशहानें जनतेचीं अंतःकरणें कशीं आकर्षण करून घेतलीं होतीं त्याची कल्पना येईल.

जनतेची आमरणान्त उत्कृष्ट प्रकारें सेवा करून आपलें कर्तव्यकर्म योग्य प्रकारें बजावून लोकमान्य गेले! स्वराज्याचा मंत्र आसेतुहिमाचल हिंदी जनतेकडून वदवून घेतला व शेवटीं आपलें इहलोकींचें कर्तव्य समाप्त करून आपली शिणलेली काया त्यांनी मृत्यूच्या स्वाधीन केली; त्यांनीं उत्पन्न केलेली दिव्य स्फूर्ति केव्हांही नष्ट होणें शक्य नाहीं.

त्यांचा देह नष्ट झाला असला तरी त्यांनी प्रदीप्त केलेली स्वातंत्र्याची ज्योत विझणें शक्य नाहीं. कांहीं संकटें आलीं तरी हिंदी राष्ट्र स्वराज्याचा मंत्र विसरणें शक्य नाहीं. स्वराज्य हा जनतेचा जन्मसिद्ध हक्क असल्यानें तो प्राप्त करून घेतल्याखेरीज हिंदी राष्ट्र स्वस्थ बसणें इतःपर शक्य नाहीं.

लोकमान्यांच्या मृत्यूनंतर अल्पावधींतच कलकत्ता येथें राष्ट्रीय सभेचें जादा अधिवेशन भरून अमृतसर काँग्रेसनें अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक म्हणून शिक्का मारलेल्या सुधारणा सर्वस्वी त्याज्य ठरवून त्यांवर पूर्ण बहिष्कार घालावा असें ठरविलें. केवळ सुधारणांवरच बहिष्कार घालावा असें राष्ट्रीय सभेनें न ठरवितां, सरकारशीं शक्य तितक्या रीतीनें पूर्ण असहकारिता करावी यासाठीं, सुधारलेल्या कौन्सिलांबरोबरच, सरकारी कोर्टें, सरकारी शिक्षणसंस्था यांवर पूर्ण बहिष्कार घालावा असें ठरवून विदेशी मालावरही बहिष्कार घालावा असें ठरविण्यांत आलें. या ठरावान्वयें देशांतील कांहीं स्वाभिमानी, स्वार्थत्यागी व राष्ट्रीय सभानिष्ठ अशा लोकांनीं कौन्सिलांवर बहिष्कार घातला, वकिल्या सोडल्या आणि कित्येक विद्यार्थ्यांनीं शाळाही सोडल्या. देशांत उडालेल्या या खळबळीनें नोकरशाहीचें मात्र धाबें दणाणलें. नवीं कौन्सिलें उघडण्यासाठीं बादशहांचे

काका आले, तेव्हां कौन्सिलें हांजीहजूरवाल्यांनीं भरलेलीं त्यांस आढळलीं. लोक त्यांच्याकडे ढुंकूनही पाहीनात. मग स्वागताची गोष्ट लांबच राहिली !

कलकत्त्याचे ठराव नागपुरासही कायम करण्यांत आले. या ठरावांची बजावणी कशी काय झाली, याचा अनुभव सर्वत्रांस असल्यानें त्या गोष्टींचें येथें चर्वित-चर्वण करण्याचें कारण नाहीं. अमृतसर कॉंग्रेसपर्यंत हिंदी राजकारणाचा जो धागा होता तो कलकत्त्यास तुटला जाऊन नागपूरनेंही तोच कित्ता गिरविला.

या राष्ट्रीयसभेंत दुसरा महत्त्वाचा असा केलेला ठराव म्हणजे, लो॰ टिळक यांच्या स्मरणार्थ टिळक स्वराज्यफंड नांवानें एक कोटी रुपयांचा फंड जमविणें हा होय ! लोकमान्यांची देशसेवा जशी अपूर्व त्याचप्रमाणें अवघ्या दोन महिन्यांत एक कोटी रुपये त्यांच्या नांवानें जमावे ही गोष्टही हिंदुस्थानच्या इतिहासांत अपूर्व अशीच गणली जाईल.

राष्ट्रीय सभेनें याप्रमाणें आपलें धोरण कायम केल्यानंतर नोकरशाहीनेंही प्रत्युत्तर म्हणून असहकारितेची चळवळ हाणून पाडण्याचा निश्चय केला व त्या-प्रमाणें दडपशाहीस सुरुवात झाली. सभाबंदी, भाषणबंदी वगैरे जुलमी कायदे देशांत सैर संचार करूं लागले. पुढाऱ्यांस खुल्या दिलानें आपले मनोगतही व्यक्त करण्याची मुष्काल पडूं लागली; व या मोहिमेंत प्रथमच अलीबंधु डॉ॰ किश्लु यांस सैन्यांत फितुरी, जातीजातींत द्वेष पसरविणें वगैरे आरोपांवरून गिरफदार करून दोन दोन वर्षांची शिक्षा ठोठावण्यांत आली. धारवाड, मालेगांव, नागपूर या शहरीं मद्यपानाच्या विरुद्ध चळवळ केल्याबद्दल गोळीबार करण्यांत येऊन अनेक निरपराधी लोकांस बळी पडावें लागलें व कित्येकांस कारागृ वास भोगावा लागला.

सर्व देशभर असा धुमाकूळ चालला असतां, अहमदाबाद येथें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरून तेथें म॰ गांधी यांना हिंदी राष्ट्रीय सभेचे सर्वाधिकारी नेमण्यांत आलें; व सरकारच्या दडपशाहीस उत्तर म्हणून स्वयंसेवकांची नोंद करणें, पिकेटिंग करणें वगैरे गोष्टी करण्याचें ठरून शिवाय महत्त्वाची गोष्ट कायदेभंग करण्याचा ठराव सदर कॉंग्रेसनें पास करून हिंदुस्थानांत येऊं घातलेल्या युवराजांच्या आगमनावर बहिष्कार घालण्याचा ठराव पसार केला ही होय ! व हा बहिष्कार कल्पनेच्या बाहेर यशस्वी झाला. कांहीं तोंडपुजे लोक युवराजांच्या पूजा प्रसंगांत सामील झाले असले, तरी सामान्य जनतेनें तो दिवस सुतकाप्रमाणें पाळला, व युवराज मुंबईस आले असतां हरताळच्या संधीचा फायदा घेऊन कांहीं

लोकांनीं असहकारितावाद्यांवर सूड घेऊन युवराजांच्या आगमनप्रसंगीं रस्त्याचें शिंपणें घालण्याचा मान मिळविला.

अहमदाबाद काँग्रेसपासून हिंदी राजकारणाला नवा जोर उत्पन्न होऊं लागला. व नोकरशाहीनेंही उग्र स्वरूप धारण केलें. स्वयंसेवकांची नोंद करणें गैरकायदा ठरविण्यांत आलें. लोकांच्या जन्मसिद्ध हक्कांची अशा प्रकारें पदोपदीं करण्यांत येत असलेली पायमल्ली स्वाभिमानी देशभक्तांस न खपून बंगाल, संयुक्त प्रांत आसाम वगैरे प्रांतांतील, दे० बं० दास, पं० मोतिलाल नेहरू, मालवीयबंधू यांसारख्या हजारों देशभक्तांस कारागृहांत टाकण्यांत आलें. परंतु 'कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें' या न्यायानें नोकरशाही जों जों दडपशाही करूं लागली तों तों हजारों स्वाभिमानी देशभक्त अहमहमिकेनें तुरुंगांत जाण्याचा अट्टहास करूं लागले. देशभक्तांच्या अशा अपूर्व स्वार्थत्यागानें जनतेची तुरुंगाची काल्पनिक भीति पार नाहींशी होऊन, नोकरशाहीचें हें अमोघ ठरलेलें अस्त्रही निकामी ठरून नोकरशाहीचे हिंदुस्थानांतील प्रमुख प्रतिनिधि लॉर्ड रीडिंग हे कांहीं तडजोड होणें शक्य आहे काय, म्हणून वाटाघाट करण्यास तयार झाले. व्हाइसरायांच्या अटींतील प्रमुख अटी अशा होत्या. स्वयंसेवकांची नोंदणी बंद करावी, युवराजांच्या आगमनाबद्दल बहिष्कार उठवावा व त्याचा बदला म्हणून उलट नोकरशाहीनें राजकीय कैद्यांची मुक्तता करावी.

अशा प्रकारें नोकरशाही तडजोडीस तयार झाल्याचें पाहून पं० मदनमोहन मालवीय, बॅ० जिन्हा वगैरेंनीं मुंबई येथें हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्षांची एक शांततापरिषद भरविली. या परिषदेनें पसार केलेले ठरावही नोकरशाहीनें कदाचित् मान्य करण्याचें आश्वासन दिलें असतें; परंतु राष्ट्रीय सभेचे सर्वाधिकारी म० गांधी यांस ती तडजोड मान्य न झाल्यानें मुंबईची शांततापरिषद अयशस्वी झाली; व त्यांनीं व्हाईसरॉयसाहेबांस सात दिवसांच्या नोटिशीनें एक निकराचा खलिना पाठवून, सर्व राजकीय कैद्यांची बिनशर्त मुक्तता, पंजाबांतील कृत्यांच्या अपराध्यांची चौकशी वगैरे गोष्टी मान्य करण्याबद्दल मागणी केली; व त्याप्रमाणें न केल्यास बारडोली येथें कायदेभंग सुरू करण्यांत येईल अशी धमकीही देण्यांत आली. म० गांधींनीं घातलेल्या अटी व्हाईसरॉयसाहेबांस मानहानीच्या वाटून त्याप्रमाणें करतां येत नाहीं असें म० गांधी यांस त्यांनीं स्पष्टपणें कळविलें.

आतां म० गांधी पुढें काय धोरण आंखतात, इकडे अखिल हिंदुस्थानचें लक्ष

घेतलें. बारडोलीचा कायदेभंग हा लोकांत अत्यंत स्फूर्तीचा व चर्चेचा विषय होऊन राहिला; व म॰ गांधींच्या आतांपर्यंतच्या बाणेदारपणामुळें हिंदुस्थानांत बारडोली म्हणजे हिंदी स्वराज्याच्या झगड्याचें कुरुक्षेत्र होईल अशी जनतेची स्वाभाविक कल्पना झाली. म॰ गांधींच्या सर्व चळवळींत शांती–अहिंसा या तत्त्वांना मुख्य स्थान असल्यानें त्यांची देशांत सर्वत्र शांतता असली तरच कायदेभंगासारखी गोष्टी करणें इष्ट आहे अशी दृढ श्रद्धा होती. परंतु बारडोली येथें कायदेभंग सुरू होण्यापूर्वी अकस्मात् चौरीचुरा येथें भयंकर दंगा झाला व त्यामुळें म॰ गांधी यांनीं बारडोलीची कायदेभंगाची चळवळ रहीत केली.

यानंतर देशांतील चळवळीस एक प्रकारें शैथिल्य आलें. लोकांतील उत्साहही थोडासा कमी झाला. अशा स्थितींत नोकरशाहीनें मार्च १९२२ मध्यें म॰ गांधी यांस राजद्रोही भाषणें केल्याच्या आरोपावरून पकडून सहा वर्षांची शिक्षा ठोठावली.

म॰ गांधींनीं असहकारिता करण्यासाठीं जे मार्ग घालून दिले, त्यांत बहिष्कार-त्रयी यांस अग्रमान दिला होता. अहमदाबाद काँग्रेसच्या अगोदरच अकोला येथें बृहन्महाराष्ट्र परिषद भरून तेथें असहकारितेच्या कार्यक्रमांत फेरफार होणें इष्ट आहे असा ठराव करण्यांत आला. असा फेर सुचविणारा वर्ग संख्याबलानें कमी असला, तरी त्यानें आपलें मत निर्भीडपणें वेळोवेळीं मांडलें व हळुहळू बहुजनसमाज आपल्या मताचा होईल अशी त्यांस दृढ आशाही होती. महात्मा गांधींना अटक झाल्यानंतर देशांतील पुढाऱ्यांत पुनः या कार्यक्रमासंबंधानें कुजबूज सुरू झाली. पण मोठ्यानें बोलण्याचें कोणांत विशेष धैर्य नसल्यानें महात्माजींच्या कार्यक्रमांतील मुख्य कलम जें कायदेभंग त्याप्रमाणें वागण्यास देश कितपत तयार आहे हें पाहण्यासाठीं एक चौकशी कमिटी नेमण्यांत आली. कमिटी सर्व देशभर हिंडून तिनें अनेकांच्या साक्षी घेतल्या, व शेवटीं असा निष्कर्ष काढला कीं, ‘देश कायदेभंगास तयार नाहीं.’ बहिष्कारत्रयीसंबंधानें मात्र कमिटींत दुमत झालें, व काँग्रेसमध्यें फूट पडण्याचें बीजारोपणही तेथेंच झालें, असें म्हणण्यासही हरकत नाहीं. कमिटीनें आपला रिपोर्ट १९२२ सालीं गया येथें भरलेल्या काँग्रेसपुढें ठेविला.

काँग्रेसमध्यें याच्या अगोदरच फेर व नाफेर असे भेद पडले होते. बहिष्कारत्रयी अयशस्वी झाल्याकारणानें ती काढून टाकून राजकारणांतील शस्त्र म्हणून

सुधारलेल्या कौन्सिलांचा उपयोग करावा असें फेरपक्षाचें म्हणणें; उलट म० गांधींनीं जो असहकारितेचा मार्ग आंखून दिला त्याबाहेर किंचितही जाणें अत्यंत पातक व देशद्रोहाचें आहे, यासाठीं त्यांत काडीचाही फेर होणें गैर होय, असें नाफेरवाल्यांचें म्हणणें. गया कॉंग्रेसमध्यें नाफेरवाल्यापक्षानें बहुमताच्या जोरावर आपलें म्हणणें खरें करून दाखविलें. व ज्या ठरावांची आपणास बजावणी करतां येत नाहीं असे ठराव केवळ भावनेला बळी पडून पास करणें ही गोष्ट अत्यंत अनुचित व सदसद्विचार बुद्धीला सोडून आहे असें फेरपक्षाला वाटून गया येथेंच फेरपक्षानें ' कांग्रेस-स्वराज्यपक्ष ' नांवाचा पक्ष स्थापन केला.

या पक्षानें कॉंग्रेसचें ध्येय मान्य केलें असून अनत्याचारी असहकारिता हा निर्जीव, निरसत्व सांप्रदाय होऊन बसणार नाहीं अशा सारासार विचारानें अनत्याचारी असहकारिता या धोरणाचा अवलंब करावयाचा व हें साधण्यासाठीं एका बाजूनें सरकारशीं चालू असलेली सहकारिता इतकी संकुचित करावयाची, कीं तिच्या अभावीं नोकरशाहीला आपलें अस्तित्व टिकविणें दुर्घट व्हावें; त्याचवेळीं दुसरीकडून नोकरशाहीशीं पदोपदीं विरोध उत्पन्न होईल अशी परिस्थिति निर्माण करून राष्ट्रीय मागणी व राष्ट्राची इभ्रत कमी न होऊं देतां नोकरशाहीला राज्यशकट हांकणें अशक्य करून सोडावयाचें हें स्वराज्यपक्षाचें ध्येय ठरून पक्ष स्थापन झाला. या पक्षांत देशांतील सर्व अनुभवी, स्वार्थत्यागी, कसलेले असे पुढारी असल्यानें एवढा वर्ग कॉंग्रेसपासून अलग झालेला पाहतांच कॉंग्रेसच्या अननुभवी अशा सूत्रचालकांच्या छातींत धडकी भरून कौन्सिल प्रवेशाची आडकाठी काढून टाकण्यासाठीं दिल्ली येथें मुद्दाम राष्ट्रीयसभेचें अधिवेशन भरवून कौन्सिलवरील बहिष्कार काढून घेण्यांत आला. व अमृतसर कॉंग्रेसनंतर तुटलेला चळवळीचा धागा पुनः एकवार सांधण्यांत आला.

यानंतर लागलीच स्वराज्यपक्षानें आपल्या चळवळीस जोरानें सुरुवात करून कौन्सिलें कार्बीज करण्याच्या मोहिमेस सुरुवात केली व गेल्या निवडणुकींत स्वराज्यपक्ष पूर्ण विजयी होऊन त्यानें उभे केलेले प्रांतिक व वरिष्ठ कौन्सिलांवरील बहुतेक उमेदवार निवडून आले. स्वराज्यपक्ष कौन्सिलांत स्वराज्याचा गाडा किती नेटानें पुढें ढकलतो हें पाहण्याचेंच आतां उरलें आहे.

# हिंदुस्थान व इतर देश.

Our voice is not the voice of authority with the power of arms behind it, but the voice of Suffering which can only count upon the power of truth to make itself heard.

*—Rabindranaath Tagore.*

येथपर्यंत हिंदी स्वराज्याच्या लढ्याचा इतिहास संक्षिप्तपणें निवेदन केला, व तत्पूर्वी हिंदी स्वराज्याच्या झगड्यांत व इतर देशांच्या स्वातंत्र्याच्या झगड्यांतील साम्यदर्शन लक्षांत येण्यासाठीं त्यांचेंही यथामति निवेदन केलें. हिंदुस्थान व तदितर राष्ट्रांच्या इतिहासांची तुलना करून आपला मार्ग आंखण्यापूर्वी प्रथमत: फार कसोशीनें आत्मनिरीक्षण केलें पाहिजे. अमेरिका, हंगेरी किंवा स्वातंत्र्याच्या झगड्यांत नुकताच विजयी झालेला आयर्लंड घ्या, किंवा स्वातंत्र्यपथ आक्रमण करीत असलेला इजिप्त देश घ्या, प्रथमतः ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे की, स्वातंत्र्यसंपादन करण्यासाठीं आवश्यक अशा गोष्टी त्यांना जितक्या अनुकूल तितक्याच हिंदुस्थानला त्या प्रतिकूल. विस्तारानें, लोकसंख्येनें हे देश हिंदुस्थानच्या मानानें किती तरी लहान! हिंदुस्थानांतील एखादा प्रांतही त्यांच्यापेक्षां किती तरी मोठा असेल; शिवाय, तेथें एक भाषा, एक धर्म, एक संस्कृति असल्यानें स्वराज्यप्राप्त्यर्थ करावयाच्या संघटनेलाही फार सोपें. याप्रमाणें सर्वतोपरी तेथें अनुकूल परिस्थिति; याच्या उलट हिंदुस्थानाकडे पाहतां, अनेक राष्ट्रांचा एक प्रचंड समूह असा तो बनलेला असून, विस्तारानेंही इतका अफाट कीं त्याच्या पोटांत रशियाखेरीज सर्व युरोप समाविष्ट होईल. अनेक भाषा, अनेक धर्म, अनेक पंथ, प्रत्येक विभागाला त्याची अशी विशिष्ट संस्कृति, या सर्वांची संघटना करून हिंदी राष्ट्राचें साध्य स्वराज्य प्राप्त करून घ्यावयाचें ही गोष्ट इतिहासांत तरी अभूतपूर्व म्हणूनच नमूद केली जाईल.

हिंदुस्थानावर इंग्रजी साम्राज्य स्थापित झाल्यापासून जर एखादा फायदा झाला असेल तर तो एवढाच कीं, अखिल हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली! ही भावना उत्पन्न झाली असली तरी, सर्व प्रांतांत असावें तितकें जिव्हाळ्याचें प्रेम नसल्यानें परकीय राजसत्ता स्थिर होण्याला आवश्यक अशी दुही उत्पन्न करून तिच्या जोरावर नोकरशाही शिरजोर बनली.

सुधारलेल्या कौन्सिलांचा उपयोग करावा असें फेरपक्षाचें म्हणणें; उलट म० गांधींनीं जो असहकारितेचा मार्ग आंखून दिला त्याबाहेर किंचितही जाणें अत्यंत पातक व देशद्रोहाचें आहे, यासाठीं त्यांत काडीचाही फेर होणें गैर होय, असें नाफेरवाल्यांचें म्हणणें. गया कॉंग्रेसमध्यें नाफेरवाल्यापक्षानें बहुमताच्या जोरावर आपलें म्हणणें खरें करून दाखविलें. व ज्या ठरावांची आपणास बजावणी करतां येत नाहीं असे ठराव केवळ भावनेला बळी पडून पास करणें ही गोष्ट अत्यंत अनुचित व सदसद्विचार बुद्धीला सोडून आहे असें फेरपक्षाला वाटून गया येथेंच फेरपक्षानें 'कांग्रेस-स्वराज्यपक्ष' नांवाचा पक्ष स्थापन केला.

या पक्षानें कॉंग्रेसचें ध्येय मान्य केलें असून अनत्याचारी असहकारिता हा निर्जीव, निरसत्व सांप्रदाय होऊन बसणार नाहीं अशा सारासार विचारानें अनत्याचारी असहकारिता या धोरणाचा अवलंब करावयाचा व हें साधण्यासाठीं एका बाजूनें सरकारशीं चालू असलेली सहकारिता इतकी संकुचित करावयाची, कीं तिच्या अभावीं नोकरशाहीला आपलें आस्तित्व टिकविणें दुर्घट व्हावें; त्याच वेळीं दुसरीकडून नोकरशाहीशीं घडोघडीं विरोध उत्पन्न होईल अशी परिस्थिति निर्माण करून राष्ट्रीय मागणी व राष्ट्राची इभ्रत कमी न होऊं देतां नोकरशाहीला राज्यशकट हांकणें अशक्य करून सोडावयाचें हें स्वराज्यपक्षाचें ध्येय ठरून पक्ष स्थापन झाला. या पक्षांत देशांतील सर्व अनुभवी, स्वार्थत्यागी, कसलेले असे पुढारी असल्यानें एवढा वर्ग कॉंग्रेसपासून अलग झालेला पाहतांच कॉंग्रेसच्या अननुभवी अशा सूत्रचालकांच्या छातींत धडकी भरून कौन्सिल प्रवेशाची आडकाठी काढून टाकण्यासाठीं दिल्ली येथें मुद्दाम राष्ट्रीयसभेचें अधिवेशन भरवून कौन्सिलवरील बहिष्कार काढून घेण्यांत आला. व अमृतसर कॉंग्रेसनंतर तुटलेला चळवळीचा धागा पुनः एकवार सांधण्यांत आला.

यानंतर लागलीच स्वराज्यपक्षानें आपल्या चळवळीस जोरानें सुरुवात करून कौन्सिलें काबीज करण्याच्या मोहिमेस सुरवात केली व गेल्या निवडणुकींत स्वराज्यपक्ष पूर्ण विजयी होऊन त्यानें उभे केलेले प्रांतिक व वरिष्ठ कौन्सिलांवरील बहुतेक उमेदवार निवडून आले. स्वराज्यपक्ष कौन्सिलांत स्वराज्याचा गाडा किती नेटानें पुढें ढकलतो हें पाहण्याचेंच आतां उरलें आहे.

*

# हिंदुस्थान व इतर देश.

Our voice is not the voice of authority with the power of arms behind it, but the voice of Suffering which can only count upon the power of truth to make itself heard.

—*Rabindrnaath Tagore.*

येथपर्यंत हिंदी स्वराज्याच्या लढ्याचा इतिहास संक्षिप्तपणें निवेदन केला, व तत्पूर्वी हिंदी स्वराज्याच्या झगड्यांत व इतर देशाच्या स्वातंत्र्याच्या झगड्यांतील साम्यदर्शन लक्षांत येण्यासाठीं त्यांचेंही यथामति निवेदन केलें. हिंदुस्थान व तदितर राष्ट्रांच्या इतिहासाची तुलना करून आपला मार्ग आंखण्यापूर्वी प्रथमतः फार कसोशीनें आत्मनिरीक्षण केलें पाहिजे. अमेरिका, हंगेरी किंवा स्वातंत्र्याच्या झगड्यांत नुकताच विजयी झालेला आयर्लंड घ्या, किंवा स्वातंत्र्यपथ आक्रमण करीत असलेला इजिप्त देश घ्या, प्रथमतः ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, स्वातंत्र्यसंपादन करण्यासाठीं आवश्यक अशा गोष्टी त्यांना जितक्या अनुकूल तितक्याच हिंदुस्थानला त्या प्रतिकूल. विस्तारानें, लोकसंख्येनें हे देश हिंदुस्थानच्या मानानें किती तरी लहान! हिंदुस्थानांतील एकादा प्रांतही त्यांच्यापेक्षां किती तरी मोठा भरेल; शिवाय, तेथें एक भाषा, एक धर्म, एक संस्कृति असल्यानें स्वराज्यप्राप्त्यर्थ करावयाच्या संघटनेलाही फार सोपें, याप्रमाणें सर्वतोपरी तेथें अनुकूल परिस्थिति; याच्या उलट हिंदुस्थानाकडे पाहतां, अनेक राष्ट्रांचा एक प्रचंड समूह असा तो बनलेला असून, विस्तारानेंही इतका अफाट कीं त्याच्या पोटांत रशियाखेरीज सर्व युरोप समाविष्ट होईल. अनेक भाषा, अनेक धर्म, अनेक पंथ, प्रत्येक विभागाला त्याची अशी विशिष्ट संस्कृति, या सर्वांची संघटना करून हिंदी राष्ट्राचें साध्य स्वराज्य प्राप्त करून घ्यावयाचें ही गोष्ट इतिहासांत तरी अभूतपूर्व म्हणूनच नमूद केली जाईल.

हिंदुस्थानावर इंग्रजी साम्राज्य स्थापित झाल्यापासून जर एखादा फायदा झाला असेल तर तो एवढाच कीं, अखिल हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली! ही भावना उत्पन्न झाली असली तरी, सर्व प्रांतांत असावें तितकें जिव्हाळ्याचें प्रेम नसल्यानें परकीय राजसत्ता स्थिर होण्याला आवश्यक अशी दुही उत्पन्न करून तिच्या जोरावर नोकरशाही शिरजोर बनली.

परसत्तेशीं स्वातंत्र्यासाठीं झगडून ज्या राष्ट्रांनीं स्वातंत्र्य संपादन केलें, त्यांच्या अनुभवाचा उपयोग येथें करावयाचा असल्यास हिंदी राजकीय चळवळींत, मुख्य धोरणाला बाधक न होतांही, आपली पद्धति थोडीशी बदलावी लागेल. आज हिंदुस्थानच्या राजकारणाचीं सूत्रें राष्ट्रीय सभेच्या द्वारानें हालविलीं जात आहेत. ही गोष्ट योग्य व इष्ट अशीच आहे व या पुढेंही हिंदुस्थानांतील चळवळीचीं सूत्रें याच मध्यवर्ती संस्थेकडे असणें इष्ट आहे. परंतु प्रांतिक बाबतींत मात्र, मध्यवर्ती संस्थेच्या ध्येयाला बाधक होत नसेल तर मध्यवर्ती संस्थेनें केव्हांही ढवळाढवळ करतां कामां नाहीं. या बाबतींत उदाहरणच द्यावयाचें तर अमेरिकेचें किंवा जर्मनीचें देतां येईल. प्रत्येक संस्थानाला आपल्या संस्थानचा कारभार करण्यास, त्यांत इष्ट ती सुधारणा करण्यास पूर्ण मोकळीक असून अखिल साम्राज्याचा प्रश्न येईल त्व्हां मात्र त्याचा निवाडा मुख्य मंडळाच्या संमतीनें करावयाचा. या पद्धतीवर हिंदी राजकारणाचें गाडें गेल्यास त्याला बऱ्याच अंशी इष्ट अशी गती मिळेल. आज हिंदी राजकारणाची स्थिती सर्वांशानें याच्या उलट आहे. कॉंग्रेसनें एक हुकूम काढावयाचा, त्याची बजावणी होणें कित्येक प्रांतांस स्थानिक अडचणींमुळें अशक्य असलें कीं, तो प्रांत लागलीच कॉंग्रेसच्या दृष्टीनें देशद्रोही ठरतो; किंवा कित्येक ठिकाणीं मूळ ध्येयाला पोषक अशी चळवळ करणें आवश्यक वाटलें तरी कॉंग्रेसची मंजुरी नसल्याकारणानें ती करतांही येत नाहीं. कॉंग्रेसनें आपलें मुख्य ध्येय स्वराज्य हें कायम करून तें साध्य करून घेण्यासाठीं प्रांतिक स्वायत्तता दिल्यास त्या त्या प्रांताला आपल्या परिस्थितीप्रमाणें इष्ट व योग्य तो मार्ग आंखून त्याप्रमाणें त्यास सर्व राष्ट्रीय स्वराज्याच्या झगड्यांत खुल्या दिलानें समाविष्ट होतां येईल. कॉंग्रेसच्या राजकारणांत अशा तऱ्हेचा वाव नसून नानाप्रकारचीं बंधनें घातलीं गेल्याकारणानेंच अगोदरच दुहीनें बुजबुजाटलेल्या देशांत आणखी दुहीची भर पडली, ही गोष्ट अत्यंत अनिष्ट अशीच झाली!

याप्रमाणें सामान्य स्थिति मांडल्यानंतर हिंदुस्थाननें स्वराज्यविषयक चळवळ कशी केली व इतर राष्ट्रांचें व त्याचें कोठें कोठें जमतें तें पाहूं.

हिंदुस्थानांत सुधारणा कायदा सुरू करण्याचें जाहीर होतांच कॉंग्रेसनें त्यांवर अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक असल्याचा छाप मारून टाकला. हिंदुस्थानला भूक लागलेली स्वराज्याची; अर्थातच असल्या फुसक्या सुधारणांनीं जनतेचें केव्हांही समाधान होणें शक्य नव्हतें हें उघडच आहे; व म्हणूनच

लो• टिळकांनीं अत्यंत दूरदर्शीपणानें मिळेल तें खिशांत घालून बाकीच्यासाठीं भांडत राहणें, किंवा प्रतियोगी सहकारिता म्हणून या सुधारणांना उत्तर दिलें. निःशस्त्र स्थितींत आपलें उद्दिष्ट साध्य करून घेण्याला याखेरीज अन्य मार्गच नसतो. परंतु लोकमान्यांचें हें प्रतियोगी सहकारितेचें तत्त्वही कित्येकांना त्या वेळीं बंडखोरपणाचें वाटून त्यांनीं भर कॉंग्रेसमध्यें त्यांचा निषेधही केला. परंतु देशांतील बुद्धिमत्ता त्या वेळीं सुप्तावस्थेंत नसल्याकारणानें लोकमान्यांचें तत्त्वच मुत्सद्दीपणाचें ठरून तें सर्वमान्य झालें. प्रतियोगी सहकारिता याचा अर्थच 'द्याल तसें घ्याल' किंवा 'जशास तसें' व सर्व जगांतील खऱ्या मुत्सद्यांनीं त्याला नेहमींच मान्यता दिलेली आहे.

हें तत्त्व उचारून त्याची बजावणी करण्यासाठीं कॉंग्रेस-लोकशाही पक्षाची स्थापना करून फार काळ लोटला नाहीं तोंच भारताच्या दुर्दैवानें लोकमान्य दिवंगत झाले; व ज्यांना प्रतियोगी सहकारितेचें तत्त्व उच्चारणेंही अक्षम्य असें वाटलें होतें त्यांनींच सर्व सुधारणा त्याज्य अतएव त्यांवर बहिष्कारच घातला पाहिजे, इतकेंच नव्हे, तर या सैतानी सरकारशीं सर्वतोपरी असहकारिता केली पाहिजे असा ठराव पसार करून घेतला. व त्याप्रमाणें कौन्सिलें, कोर्टें, शाळा यांवर बहिष्कार घालण्याचा ठराव जाहीर करण्यांत आला.

वास्तविक असहकारिता हें तत्त्व अत्यंत उत्कृष्ट आहे, त्यांत गैर असें कांहींच नसून निःशस्त्र लोकांनां निःशस्त्र प्रतिकाराच्या जोरावर आपलें ध्येय साध्य करून घेण्याला यासारखा दुसरा मार्ग नाहीं. परंतु नुसतें तत्त्व चांगलें असल्यानें भागत नाहीं; किंवा भावनेच्या भरांत नुसती शाब्दिक संमति मिळाल्यानेंही तें तत्त्व जनतेस पटलें असें होत नाहीं. लोकस्थिति पूर्णपणें अजमावून आपण केलेल्या ठरावाची बजावणी कितपत होणें शक्य आहे याची योग्य प्रकारें चिकित्सा करून मग ठराव करावयाचे असतात, नाहीं तर ते हास्यास्पद झाल्याखेरीज रहात नाहींत व दुर्दैवानें येथेंही तसाच अनुभव आला.

It is foolish to expect always a high standard of zeal and unselfishness from a whole people, even in the noblest causes. Enthusiasts often forget that they are dealing with flesh and blood which is the most fitful and most changable composition on earth ( अत्यंत पवित्र, उदात्त कार्य असलें तरी सर्व जनता उत्साहपूर्वक व निः-

स्वार्थतेनें त्यास मदत करील असें मानणें वेडेपणाचें आहे. उत्साही लोक उत्साहाच्या भरांत आपण रक्तमांसांच्या प्राण्यांशीं व्यवहार करीत आहोंत ही गोष्ट विसरतात.) हें आयरिश पुढारी के. आर. ओ'शील याचें म्हणणें किती सत्यपूर्ण आहे याचा येथें उत्तम अनुभव आला. जनतेची किंचितही तयारी नसतां बहिष्कारत्रयी पुकारण्यांत अत्यंत चूक झाली हें मोठया दुःखानें म्हणावें लागतें. या बहिष्कारत्रयीचे परिणाम काय झाले ते पाहूं.

हिंदुस्थानाखेरीज ज्या ज्या देशांत असहकारितेची चळवळ सुरू झाली, त्या त्या ठिकाणीं अशा प्रकारचे बहिष्कार घालून त्यावर नसते वादविवाद उत्पन्न करून निष्कारण कालापव्यय कोणीही केला नाहीं. परंतु उलटपक्षीं हंगेरी किंवा आयर्लंड यांनीं शक्य तेथें आपला शिरकाव करून घेऊन नोकरशाहीचें राज्ययंत्र काबीज करण्याचेच प्रयत्न केले; व जनताही स्वार्थत्यागाची किंमत जाणणारी असल्यानें दोन्ही देशांत खरेखुरे राष्ट्राचे प्रतिनिधी निवडले जाऊन ते सरकारचें राज्ययंत्र हस्तगत करून बसले. अर्थात् ज्या शक्तीच्या जोरावर नोकरशाही आपला कारभार चालविणार ती शक्ति लोकप्रतिनिधींच्या हातीं असल्यानें नोकरशाहीस नुसत्या सुधारणांच्या अमिषानें तेथें कारभार करितां येईनासा झाला; व याप्रमाणें अगदीं ग्रामसंस्थेपासून वरिष्ठ मंडळापर्यंत सर्वच जागा लोकप्रतिनिधी व्यापून बसल्यानें त्यांस सरकारी शाळांवर अगर कोर्टांवर बहिष्कार पुकारावा न लागतां त्यांनीं सरकारी शिक्षणसंस्थाच आपल्याशा करून त्यांतूनच राष्ट्रीय शिक्षण देण्याचा क्रम सुरू केला. शाळांच्या बहिष्कारासंबंधानें आयरिश पुढारी आर्थर ग्रिफिथ याचें तर असें स्पष्ट मत असे कीं, शाळांवर बहिष्कार घातल्यानें तितक्या दुसऱ्या राष्ट्रीय शाळा घालण्यास आज राष्ट्राजवळ द्रव्यबल नाहीं. अर्थात् आहेत त्याच संस्था राष्ट्रीय केल्या म्हणजे अनायासें काम भागेल. पण हिंदुस्थानांत याच्या सर्वतोपरी उलट स्थिति झाली. कायदेकौन्सिलवर म्हणजे जेथून कायदे निर्माण होतात त्या संस्थांवर बहिष्कार पुकारण्यांत आला, तरी त्या कायदेमंडळाच्या कायद्यान्वयें पूर्णतः चालणाऱ्या म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें वगैरे संस्था काबीज करणें ग्राह्य समजलें गेलें !

बरें; कौन्सिलांवर बहिष्कार पुकारल्यावर तीं ओस पाडण्याची कामगिरी झाली असती, तर बहिष्कार पुकारण्यांत कांहीं अर्थ तरी होता; परंतु या बहिष्कारानें देशांतील बुद्धिवंत, अनुभवी, कसलेला मुत्सद्दीवर्ग मात्र बाजूला

ाहून कौन्सिलें, अराष्ट्रीय अशा लोकांनीं एकही जागा रिकामी न राहतां, भरून ालींच. अशा प्रकारचे कागदी घोडे नाचविण्यापूर्वी जनतेची तयारी किती आहे ाचा अंदाज बांधला असता तर बहिष्कृत केलेलीं कौन्सिलें भरलेलीं पाहण्याचा ोग येताचना ! व राष्ट्रीय पक्षाचेच प्रतिनिधी सर्व निवडून येण्याची खात्री होती. याप्रमाणें जर निवडून येते, तर बादशहांच्या काकांनीं कोणाचीं कौन्सिलें उघडलीं असतीं ? या बाबतींत हंगेरीनें शिकविलेला धडा अनुकरणीय आहे. डाएटची नेवडणूक होण्याचें ठरतांच सर्व लोकपक्षाचे प्रतिनिधी उभे राहून ३३० जागां- र्कीं तीनशें प्रतिनिधी लोकपक्षाचे आले. त्यापूर्वी तालुका व जिल्हा कौन्सिलें ीं सर्वस्वीं लोकपक्षानें काबीज केलेलीं असून सर्व राज्यकारभार लोकतंत्री सुरू ोताच ! डाएटही हस्तगत केल्यानें देशांतील प्रमुख असें कायदेमंडळ—ज्याच्या जोरावर नोकरशाही आपली सत्ता गाजविणार—तेंच काबीज केल्यानें, जनतेच्या ातीं एक जबरदस्त असें शस्त्र सांपडलें; व वरपासून खालपर्यंत सर्व राज्ययंत्र लोकपक्षाच्या हातीं असल्यानें कायदेभंगाची चळवळही त्यांस अत्यंत यशस्वी- पणानें करितां आली. आयर्लंडनेंही या बाबतींत हुबेहूब हंगेरीचें अनुकरण केल्यानेंच स्वदेशी चळवळ व कोर्टावरील बहिष्कार यशस्वी करून दाखवितां आला ! जगांतील सर्व अनुभवी मुत्सद्यांनीं जें मिळेल तें स्वीकारून बाकीच्या- साठीं झगडणें, याच नीतीचा अवलंब केलेला आहे. इतकें कशाला, हिंदुस्थानांत बहिष्काराची चळवळ सुरू झाल्यानंतर इजिप्तमध्यें ज्या सुधारणा जाहीर करण्यांत आल्या, त्याही इजिप्शियन लोकांच्या आकांक्षा तृप्त करण्याला पुरेशा नाहींत; तथापि झगलूलपाशासारख्या देशभक्तानें त्या झिडकारून न टाकतां, त्या प्रथम कबज्यांत घेऊन जास्तीसाठीं तो झगडत आहेच ! परंतु हिंदुस्थानांत सर्वच गोष्टींचा अपूर्वाई ! ज्या गोष्टी इतरत्र सर्वमान्य म्हणून ठरल्या गेल्या त्या येथील वातावरणांत त्याज्य ठरून कोणीही आचरलेला नाहीं असा एक नवीनच मार्ग येथें आंखण्यांत आला व तो म्हणजे रुसण्याचा ! सुधारणा अपुऱ्या, असमाधान- कारक व निराशाजनक असा कागदी शिक्का त्याजवर मारल्यानें त्या जनतेवर लादल्या गेल्याशिवाय थोड्याच राहणार ! त्या खरोखरच लोकांच्या आकांक्षा तृप्त करण्यास पुरेशा नाहींत असें सिद्ध करण्याचा असा काय प्रयत्न करण्यांत आला, कीं त्यामुळें त्या लोकांवर लादावयाच्या राहिल्या ! देशांतील खरे पुढारी, खरे देशाभिमानी, खरे कार्यकर्ते अलिप्त राहिल्यानें नालायक व अराष्ट्रीय अशा

लोकांनीं कौन्सिलें व्यापून सुधारणा डोक्यावर लादावयाच्या त्या लादल्या गेल्याच व लोकप्रतिनिधी निवडणुकी होऊन कौन्सिलांत गेल्यानें आम्ही जनसंमतीच्या जोरावरच येथें राज्य करीत आहों असें नोकरशाहीलाही उजळमाथ्यानें सागतां आलें. आपण आपल्या घरीं स्वस्थ बसल्यानें, नोकरशाहीच्या मार्गांत अडथळे कसे उत्पन्न होतात, हें समजणें गूढ आहे. आपण निष्क्रिय राहिल्यानें नोकरशाही कशी वठणीवर येणार? देशांतील सर्व समाज एकसमयावच्छेदें- करून या तत्त्वाचा अवलंब करील, तर हा मार्गही दुःसाध्य नाहीं. परंतु तशी गोष्ट तेथें होणें कितपत शक्य, याचा अगोदर विचार केला पाहिजे.

गेल्या तीन वर्षांच्या अनुभवानें देशांतील बहुजनसमाजास बहिष्कारत्रयींत फरक करणें आवश्यक आहे असें वाटून हल्लीं हे सर्व बहिष्कार काँग्रेसनें काढून घेतल्यानें कौन्सिलांत शिरून तेथें नोकरशाहीची अडवणूक करावी, असें म्हण- णाऱ्या पक्षास तसें करण्याची संधी देण्यांत आली हें योग्यच झालें. राज- कारणांत अनेक पक्ष असले तरी सर्व पक्षांचें एकच साध्य असल्यास तें प्राप्त करून घेण्याचे प्रत्येक पक्षाचे मार्ग भिन्न असले तरी त्यांत गैर असें कांहींच नाहीं. राजकारणाच्या पोटांत या सर्वांचा समावेश होतो व प्रत्येक पक्षास आपल्या मार्गानें जाण्यास पूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे. एका बाजूस नोकरशाही व दुसऱ्या बाजूस नोकरशाहीस वठणीवर आणण्यासाठीं सज्ज झालेले अनेक पक्ष ही स्थिति फारशी असमाधानकारक खास नाहीं. हंगेरींतही राजकीय चळवळींत भाग घेणारे अनेक पक्षोपपक्ष होतेच; परंतु त्यांचें सर्वांचें ध्येय एकच असल्यानें परस्परांचे मार्ग भिन्न होते; तरी मुख्य ध्येयसिद्धीस त्यापासून धक्का पोहोंचला नाहीं. हीच गोष्ट इजिप्तची. तेथेंही जहाल मवाळ वगैरे अनेक पक्ष आहेतच; पण खास राजघराण्यापासून सर्व राजकीय पक्षांचें ध्येय एकच ठरलें असल्यानें त्यांच्या मार्गांत विविधता दिसली तरी उद्दिष्ट एकच होतें. मात्र ढळले नाहींत.

देशांत केवळ राजकारणी पुरुष निर्माण झाले म्हणजेच देशाची उन्नति होते असें नाहीं. राजकारणाबरोबरच उत्कृष्ट ग्रंथकार, कवि, यांत्रिक, शिल्पी, रसा यनज्ञ, शोधक वगैरे सर्व प्रकारच्या गुणी जनांची अपेक्षा असते व सर्वांच्या गुणसमुच्चयानें राष्ट्राचें महत्व व लौकिक वाढतो; त्याप्रमाणें राजकारणांत अमुक एका मार्गानें मनुष्य गेला म्हणजे तोच तेवढा देशभक्त व राजकारणी

हें म्हणणें चुकीचें ठरेल. आपल्या शक्तिबुद्धीप्रमाणें प्रत्येकास राजकारणाचा भार उचलण्यास मुभा असावयास पाहिजे; व इतका सोशिकपणा उत्पन्न झाल्या-खेरीज आत्मकलह न होतां राजकारण चालविणें कठीण होऊन जाईल. 'साधनानाम् अनेकता' हें राजकारणांतील सूत्र पाहिजे. व साधनांसंबंधीं कोणाचा किंचित् मतभेद असला तरी त्यासंबंधीं रणें माजवून ध्येयच्युत होणेंही गैर आहे; व अशा धोरणानें राजकारण चालल्यास विनाकारण उत्पन्न होणारा मतभेद न होतां नोकरशाहीवर चोहोंबाजूंनीं हल्ले करण्यास सवड राहील.

परतंत्र देशांनीं स्वतंत्र होण्यासाठीं केलेल्या झगड्यांत एक प्रकारचें विलक्षण साम्य आढळून येतें हें अमेरिका, हंगेरी, आयर्लंड, इजिप्त, कोरिया या देशांच्या इतिहासावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. त्याचें पृथक्करणच करावयाचें तर तें खालीलप्रमाणें करतां येईल:—

१ ( कोणत्याही कारणानें असो ) राष्ट्रस्वातंत्र्यवंचित होणें.

२ त्यामुळें जित लोकांत असंतोष उत्पन्न होणें.

३ तो दडपण्यासाठीं जोराचा प्रतिकार.

४ लोकमत तात्कालिक शांत झालेंसें वाटलें तरी लोकक्षोभ थांबत नाहींसें पाहून सोयीप्रमाणें आश्वासनें देणें.

५ आश्वासनाची पूर्तता करण्याबद्दल जनतेचा तगादा.

६ आश्वासनांची पूर्तता, गळ्याशीं भिडल्याशिवाय करावयाचीच नसल्यानें, सभाबंदी, भाषणबंदी, लेखनबंदी, लोकाग्रणीस अटक, हद्दपाऱ्या, प्रसंगीं गोळीबार वगैरे दडपशाहीचे उपाय करणें.

७ अशाप्रकारें नानाप्रकारचे अत्याचार केल्यानंतरही लोकमत शांत होत नाहींसें पाहून मॉंटेग्यू-चेम्सफर्डसारख्या, किंवा इजिप्तमधील फेब्रुवारी १९२२ प्रमाणें सुधारणा जाहीर करणें.

या पुस्तकांत ग्रथित केलेल्या देशांच्या इतिहासाचें साम्य येथपर्यंत जमतें व यानंतर त्यांतून अमेरिका, हंगेरी व आयर्लंड हा गट वेगळा पडतो; व दुसऱ्या गटांत इजिप्त, कोरिया व हिंदुस्थान हे देश येतात. दुसऱ्या गटांतील राजकीय चळवळी पृथक्करणांत दाखविलेल्या मर्यादेपर्यंत येऊन बसलेल्या असून त्यांतून पार पडून त्यांस अद्यापि पहिल्या गटांत समाविष्ट व्हावयाचें आहे व त्यासाठीं त्या त्या देशांत चळवळीही चालल्या आहेत.

जेत्या राष्ट्रांनीं जित राष्ट्रांशीं काय पद्धतीनें व्यवहार केला, हें वरील पृथकरणांत दर्शविलें आहे. आतां जित राष्ट्रांच्या चळवळींत साम्य कोठें आहे हें पाहूं:—

१ परकीय सत्तेची जाणीव.

२ पूर्ण सनदशीरपणें स्वराज्य संपादन करण्याविषयीं चळवळ.

३ अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळें.

४ बहिष्कार, स्वदेशी चळवळ.

जित राष्ट्रांच्या प्रतिकारक्रियेंतही वरील सर्व प्रकारचें साम्य आढळतें.

त्यांतल्या त्यांत हिंदुस्थाननें त्यांपैकीं कांहीं मार्गांचा अद्यापि उपयोग केलेला नाहीं. तो केल्यास हल्लींच्या स्वावलंबनाच्या चळवळीस बराच जोर चढेल. आयर्लंडनें आपल्या स्वावलंबनाच्या चळवळींत सर्व विदेशी बँकांवर विशेषतः इंग्रजी बँकांवर बहिष्कार घालून स्वतःच्या देशी बँका उघडल्या. त्यांमुळे देशांतील पैसा देशांतच राहून त्यायोगें उद्योगधंदे सांवरले. कर-नामंजुरीसारखे निष्फळ ठराव करण्यापेक्षां विदेशी बँकांवर वहिष्कार घालण्याची-लोकांच्या-स्वाधीनची चळवळ केली तर त्यांत कांहीं स्वारस्य तरी आहे! दुसरी करतां येण्यासारखी व सामान्य जनतेला तात्काल फायदा दर्शविणारी चळवळ म्हणजे निर्यात-प्रतिबंधाची. हिंदुस्थानांतील बंदरांतून कसलेंही धान्य, गळिताचीं धान्यें, कापूस यासारखा कच्चा माल परदेशीं पाठविण्याच्या प्रवृत्तीस आळा घालणें, विधायक कार्यक्रमाला. याला जर ही चळवळ जोडल्यास तो कार्यक्रम जास्त जोमदार व तेजस्वी होईल.

हिंदुस्थानांतील जनता आपल्या जन्मसिद्ध हक्कास पूर्ण जागृत झाली असून आतां नोकरशाहीनें कितीही दडपशाही केली, तरी ती आपलें उद्दिष्ट साध्य केल्या-खेरीज राहणार नाहीं; व जनतेच्या पुढाऱ्यांनीही लोकांची आकांक्षा व शक्ति पाहून व गतेतिहास लक्षांत घेऊन योग्य असा मार्ग आंखल्यास स्वराज्य दूर नाहीं; कारण त्यांचा मार्ग सत्याचा व न्यायाचा असल्यानें त्यांस यश मिळणारच, अशी इतिहासाची साक्ष आहे.

**संपूर्ण.**